श्री सयाजीसाहित्यमाला पुष्प १५६
( विज्ञानगुच्छ )

# संक्षिप्त
# अर्वाचीन मराठी वाङ्मय.

( १८०५–१९२७ )

संपादक आणि प्रकाशक.

**गणेश रंगनाथ दंडवते.**

लायब्रेरियन, सेंट्रल लायब्ररी, बडोदें,

व

प्रगति, बडोद्याचें मराठी साहित्य, कादंबरीची गोष्ट
इ. पुस्तकांचे कर्ते.

' आर्य सुधारक प्रेस–बडोदें. '

सन १९२९ | किं. १–१०–०. | प्रथमावृत्ति
संवत १९८५ | | ५०० प्रति.



धी आर्य सुधारक प्रेस–मोदीखाना भुतडी झांपा–बडोदे येथे
मणिभाई मथुरभाई गुप्ते यांनी प्रकाशका करितां छापून
प्रसिद्ध केले. ता. ५–३–२९.



श्री.

# जाहिरात

आपल्या देशी भाषेच्या साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें पतितपावन श्रीमंत सरकार महाराज साहेब श्री सयाजीराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहादुर, जी. सी. एस. आय., जी सी आय. ई., एल. एल. डी., ह्यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपायांची जी रक्कम अनामत ठेविली आहे, तिच्या व्याजांतून 'श्री'सयाजीसाहित्यमालें'तून विविध विषयांवर पुस्तकें तयार करविण्यांत येत असतात.

तदनुसार " संक्षिप्त अर्वाचीन मराठी वाङ्मय " या नांवाचें पुस्तक रा. रा. गणेश रंगनाथ दंडवते, बडोदें, ह्यांचेकडून तयार करवून तें उक्त मालेंतील विज्ञानगुच्छांत एकशेपंचावनावें पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

भाषांतरशाखा,
विद्याधिकारी कचेरी,
बडोदें ता. २८-२-२९.

नं. के दीक्षित
भ. भा. महेता विद्याधिकारी
भा. म. बडोदें राज्य.

( अ )

# प्रस्तावना.

अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा संक्षिप्त इतिहास वाचकांच्या हातीं देत असतां बऱ्याच दिवसाचा आमचा प्रयत्न सफल होत असल्यामुळें आज आम्हांस खरोखरीच आनंद होत आहे.

वाङ्मयांत वाङ्मयेतिहासात्मक ग्रंथांचें महत्व काय ? त्यांचा उपयोग कोणता ? इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें तज्ज्ञांनीं योग्य स्थळीं द्यावयाचीं आहेत. येथें फक्त एवढेंच नमूद करणें जरूर आहे कीं, असले ग्रंथ मग ते कोणत्याही भाषेंतील असोत—योग्य काल आल्याखेरीज सहसा तयार होत नाहींत.

आणि आर्वाचीनाची गोष्ट कशाला ?—कै. वि. ल. भावेकृत 'महाराष्ट्र सारस्वत' हा मूल्यवान ग्रंथ प्रसिद्ध होईपावेतों आपल्या प्राचीन मराठी वाङ्मयाची देखील आपणास कितीशी माहिती होती ? आणि प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास उपलब्ध होण्यास त्याच्या प्रारंभकालापासून ज्या अर्थीं पांचसहाशें वर्षांचा अवधी लागला आहे, त्या अर्थीं अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या संक्षिप्त इतिहासास त्याच्या जनन कालापासून निदान शंभर वर्षांचा तरी अवधि लोटणें अवश्य होतें.

आजपर्यंत या दिशेनें कांहींच प्रयत्न झाले नाहींत, असें नाहीं. कै. रा. भि. जोशीकृत ‘ मराठी वाङ्मय विवेचन ’ व प्रो. द वा. पोतदारकृत ‘ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ’ हीं दोन पुस्तकें याच मासल्याचीं असून, पहिल्याच्या ‘ मराठी भाषेची घटना ’ या पुस्तकांत व्याकरणविचार जरी अधिक झाला असला तरी शेंवटची माहिती उपयुक्त आहे.

त्याचप्रमाणें कै. वि. मो. महाजनी, वि. का राजवाड, कै. ह. ना. आपटे इत्यादि गत आणि चिं. वि. वैद्य, न. चिं. केळकर. ल. रा. पांगारकर, वा. ना. देशपाडे इत्यादि विद्यमान विद्वानांनी अर्वाचीन मराठी वाङ्मयविषयक वेळोवेळीं उत्कृष्ट चर्चा केली आहे. तथापि, मासिक पुस्तकांतून अथवा व्यासपीठावरून केलेल्या चर्चेस मर्यादा असते आणि तीही पुस्तकरूपानें उपलब्ध असतेंच, असें नाहीं.

आमची उडी देखील फार उंच नाहीं. अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या गेल्या शंभर वर्षांचा संक्षिप्त इतिहास अथवा त्याचीं साधनें वाचकांपुढें ठेवतां आल्यास तेवढ्यानेंच आमचे मनोरथ पूर्ण झाले असें आम्हीं समजतों, आणि विस्तृत इतिहास तयार होईपर्यंत ‘ दुधाची तहान ताकानें ’ या न्यायानें हा ग्रंथ महाराष्ट्रीयांच्या आदरास पात्र होवो असें इच्छितो.

आमच्या सोयीसाठीं आम्हीं या पुस्तकाची संपादनखंड व चरित्रखंड अशा दोन भागांत विभागणी केली आहे व ती तज्ज्ञान मान्य होईल अशी अशा आहे. धर्मसंस्थापकांची चरित्रें ज्याप्रमाणें धर्म सदराखालीं वर्ग करावीं लागतात त्याप्रमाणे ग्रंथकारांचीं चरित्रें वाङ्मय सदरांत वर्ग करण्याची वहिवाट आहे. आणि वर्गीकरणाची ही परंपरा लक्षांत घेतां कालानुक्रमानें दिलेलीं मराठी ग्रंथकारांचीं चरित्रें वाङ्मयेतिहासाचीही कालानुक्रमें रूपरेषा आखण्यास मदत करतील अशी उमेद आहे. हीं चरित्रें मिळविण्यांत आम्हीं आमच्या-कडून कसूर केली नसूनही कांहीं चरित्रें अनेक कारणांमुळें वेळीं हस्तगत झालीं नाहींत हें आम्हीं येथें दिलगिरीनें नमूद करतो. तथापि दुसऱ्या आवृत्तीचें सद्भाग्य या ग्रंथास लाभल्यास तिच्यांत इतर सुधारणांबरोबर ग्रंथकारांचीं राहिलेलीं चरित्रें समाविष्ट करणें अशक्य नाहीं. ग्रंथदोष विपुल राहिले आहेत आणि मुद्रणदोष तर अक्षम्य आहेत. पण मनावर घेतल्यास सहृदय वाचकांस त्यांच्याकडे दुर्लक्ष करणें शक्य आहे.

बडोदें ता. २३-२-१९२९ संपादक



# अनुक्रमणिका.



## संपादनखंड.



| | विषय. | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | प्रथमकाल | १ |
| २ | मध्यकाल–पूर्वार्ध | २९ |
| ३ | मध्यकाल–उत्तरार्ध | ५५ |
| ४ | उत्तरकाल | ७३ |
| ५ | वर्तमानपत्रें | १४६ |



## चरित्रखंड.


ग्रंथकारांचीं संक्षिप्त चरित्रें — स्वतंत्र पृष्ठें १–१९८




संक्षिप्त

# अर्वाचीन मराठी वाङ्मय.

## लेखांक १.

## प्रथम काल.

( सन १८०५-१८५६ )

इ. स. १८०५ हें साल अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखें आहे. ज्या मराठी वाङ्मयाचा पाया मुकुंदराज आणि ज्ञानदेव यांनीं घातला, ज्याचें संगोपन नामदेव, एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास, श्रीधर व महिपति यांनीं मोठ्या प्रेमानें केलें, ज्यास मोरोपंत आणि वामनपंडित या सत्कवींनीं आपल्या रचनाकौशल्यानें सजविलें. व ज्याला रामजोशी, अनंतफंदी, होनाजी-बाळा इत्यादि शाहिरांनीं अष्टपैलु बनविलें, त्या प्राचीन मराठी वाङ्मयास हल्ली इतके प्रसारक्षम करण्याचें व तसेच अर्वाचीन मराठी वाङ्मयाची मुहुर्तमेढ रोवण्याचे श्रेम ज्या मुद्रणकलेकडे येते, तिचा शोध पाश्चात्य देशांत जरी पांचशे वर्षांपूर्वीं झाला असला तरी मराठी अक्षरांचे ठसे तयार होऊन त्यांच्या साह्याने पुस्तके छापण्याचा उप-क्रम सन १८०५ सालींच झाला असल्यामुळें हें साल अर्वाचीन

मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत खरोखरींच सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखें आहे.

ज्या मुद्रणकलेनें साऱ्या जगांतल्या घडामोडींत एवढी क्रांति घडवून आणली तिनेंच अर्वाचीन मराठी वाङ्मयास जन्म दिला आहे, हे कोणासही नाकबूल करतां येणार नाहीं. आम्हीं तर थोडें यापुढें जातों आणि असें म्हणतों कीं, पाश्चात्यांनीं जर आपणाबरोबर इकडे मुद्रणकला आणली नसती तर आपलें मराठी वाङ्मय अद्यापि शे सवाशें वर्षे मागें रेंगाळत राहिलें असतें, आणि आगगाड्याच्या अभावीं प्रवासाविषयीं किंवा पोस्टाच्या अभावीं पत्रव्यवहाराविषयींची आपली जी स्थिति असती तीच स्थिति आपल्या मराठी वाङ्मयाविषयींची मुद्रणकलेच्या अभावीं राहिली असती. मुद्रणकला इकडे आली किंवा आणली नसती तर आपण तत्त्वज्ञानाविषयीं ज्ञानेश्वरीवर, इतिहासचरित्राविषयीं श्रीधर महिपतीच्या ग्रंथांवर, कथाकाव्यांविषयीं वामन मोरोपंतांवर आणि लावणीपोवाड्याविषयीं फंदी रामजोश्यांवरच कदाचित् अवलंबून राहिलो असतो ! सारांश, आज आपल्या मराठी भाषेस जें उन्नत स्वरूप प्राप्त झालेलें दिसतें त्याचें अर्धे अधिक श्रेय मुद्रणकलेकडे येत असल्यामुळें मुद्रणकला इकडे न येती तर अर्वाचीन मराठी वाङ्मयच निर्मान होतें. मुद्रणारंभास एक प्रकारची सीमारेषा समजण्यांत येते. आणि म्हणूनच मुद्रणप्रवेशापूर्वीच्या वाङ्मयास 'प्राचीन' व मुद्रणारंभानंतरच्या वाङ्मयास 'अर्वाचीन' असें म्हणण्याचा योग्य प्रघात पडला आहे.

प्राचीन मराठी वाङ्मयाचा प्रारंभ मुकुंदराजाच्या विवेकसिंधु ग्रंथापासून करतात. तसा अर्वाचीन वाङ्मयाचा प्रारंभ कोणत्या ग्रंथापासून करतां येईल ? अथवा करणें इष्ट आहे ? अर्थात्‌च हिंदुस्थानांत छापलल्या पहिल्या मराठी ग्रंथापासून. आणि फिरून पहिल्या प्रथम छापलेला मराठी ग्रंथ कोणता ? असा प्रश्न केला असतां त्याचें उत्तर इ. स १८०५ त बंगाल्यांत श्रीरामपूर येथें केरी या मिशनऱ्यानें केलेलें मराठी भाषेचें व्याकरण असें द्यावें लागतें. कोठें महाराष्ट्र ! आणि कोठें मराठी व्याकरणाचा जन्म ! !

परंतु हें कसें झालें ? प्रारंभींच मिशनऱ्यांनीं मराठी व्याकरण कां व कसें तयार केलें ? असें सहजच मनांत येतें, व सन १८०५ सालापूर्वीं मराठी वाङ्मयांत मराठी भाषेचें व्याकरण नसावें हें आपणास कसेंसेंच दिसतें. दिसो कसेंही; परंतु केरीच्या व्याकरणापूर्वी आपण व्याकरणविरहीत होतो आणि आपल्याला वाटली नाहीं तरी केरीला मात्र मराठी व्याकरण तयार करण्याची आवश्यकता वाटली हें खास. अर्थात् केरीनें तरी इतर विषय सोडून पहिल्यानें व्याकरणच काय म्हणून लिहिलें. हें गूढ कळण्यासाठीं केरी हा कोण ? आणि याच्याकडून कोणत्या परिस्थितींत हें कार्य झालें तें पाहणें ओघानेंच प्राप्त होतें.

विल्यम केरी याचा जन्म अमेरिकेंत सन १७६१ या वर्षीं झाला. प्राथमिक शिक्षणानंतर वयाच्या १४ व्या वर्षी बापानें त्यास एका चांभाराच्या दुकानीं उमेदवारीस ठेविले होते. परंतु केरीचा ओढा

ल्हानपणापासून धार्मिक गोष्टींकडे विशेष असल्यामुळें दुकान सोडून तो लवकरच बॅप्टिस्ट मिशनमध्यें शिरला व सन १७८९ सालीं हिंदुस्थानांत येण्यास निघालेल्या बॅप्टिस्ट मिशनरीच्या पहिल्या तुकडीचा पुढारी झाला. मिशनऱ्यांची ही पहिली तुकडी सन १७९४ च्या सुमारास कलकत्त्यास दाखल झाली व तिनें सन १७९५ मध्यें मालदा नजीक असलेल्या मि युडेनच्या इंडिगो फॅक्टरीजवळ एक चर्च स्थापन केले. व नंतर मराठी वगैरे देशी भाषा शिकून या मंदिरांत केरीनें ख्रिस्तीधर्मविषयक प्रवचनें आरंभिलीं

या वेळीं ख्रिस्ती धर्म प्रसाराविषयीं केरीस ज्या दुसऱ्या अनेक अडचणी आल्या त्यांत येथील भाषाबाहुल्याची अडचण प्रमुख होती व ही अडचण त्यानें या वेळीं अमेरिकेंत आपल्या मित्राकडे पाठविलेल्या पत्रात वारवार लिहिली आहे. यानंतर श्रीरामपूर येथें केरीनें एक शाळा व एक छापखाना स्थापन करून पहिल्यानें मराठी आणि तामिल भाषेंतील ख्रिस्ती धर्मावि यक पुस्तकें छापलीं. पुढें सन १८०१ सालीं कलकत्यास स्थापन झालेल्या फोर्ट विल्यम कॉलेजांत केरीची नेमणूक झाली तरी मिशन आणि छापखाना हे त्याचे आवडते विषय असल्यामुळें या दोन्हीं संस्था त्यानें आपल्या प्रयत्नानें लवकरच भरभराटीस आणल्या. केरीनें हिंदुस्थानांतील सुमारें २६ भाषांत बायबलाचें भाषांतर करून शिवाय अनेक भाषाविषयक ग्रंथ व मराठी व्याकरण ( १८०५ ) संस्कृत व्याकरण (१८०६) पंजाबी व्याकरण ( १८१२ ) तेलंगी व्याकरण ( १८१४ )

भूतानी व्याकरण ( १८२६ ) इत्यादि व्याकरण ग्रंथ व मराठी कोश ( १८१० ) बंगाली कोश ( १८१३ ) व भूतानी कोश ( १८२६ ) इत्यादि कोशग्रंथ तयार केलें आहेत संस्कृतजन्य सर्व हिंदी भाषांचा एक कोश तयार करण्याची सामुग्रीही केरीनें तयार केली होती. परंतु ही सामुग्री सन १८१२ सालीं श्रीरामपूर येथें मोठी आग लागून त्या आगींत अग्नीनारायणाचें भक्ष्यस्थानी पडली. केरीनें रामायणही तीन भागांत छापलें होतें. केरींचे मराठी व्याकरण अथवा त्याचे इतर ग्रंथ आजच्या परीक्षकांच्या कसोटीस उतरणार नाहींत व त्याला झालें तरी पं वैजनाथशास्त्री या महाराष्ट्र पंडिताच्या साह्यानेंच हीं कामें करतां आलीं, हें जरी खरें असलें, तरी तेवढ्यावरून केरीच्या यशांत कांहीं कमीपण येइलसें आम्हांस वाटत नाहीं.

इ. स. १६१४ त गोमाक प्रांतीं ‘ ख्रिस्तपुराण ’ रचणारा फादर स्टीफन्स यानेंही एक मराठी व्याकरण लिहिलें असल्याचें वाचनांत आहे. परंतु उपलब्ध संदर्भग्रंथांत त्याचा उल्लेख आढळत नाहीं व यामुळें सबळ विरुद्ध पुराव्याच्या अभावीं ज्याप्रमाणें मराठींतील पहिलें पुस्तक छापण्याचा मान तसाच मराठी व्याकरणाच्या पहिल्या कर्तृत्वाचा मानही केरीकडेच जातो ! आणि केरी काय किंवा स्टीफन्स काय, दोघेही परकेंच असल्यावर या परप्रेरितपणाचा कोणास खेद होणार नाहीं ?

आणि पुढें झालें तरी ग्रंथमुद्रणाच्या मुळाशीं शालोपयोगी पुस्तकें तयार करण्यापलीकडे कोणाचा कांहीं विशेष हेतु होता असें दिसत नाहीं

आणि हा हेतूही सरकारच्याच मनानें घेतलें तेंव्हां सिद्धीस गेला. कारण हिन्दी लोकांना शिक्षण द्यावयाचें तें त्यांच्या जुन्या ग्रंथांचें द्यावें किंवा पाश्चात्य विद्येचे द्यावें हा वाद लवकरच संपून पाश्चात्य शिक्षणाचा विजय झाल्यावर सरकारास जुन्या सस्कृत ग्रंथांचें मुद्रण करण्यापेक्षां नवें, लहान व सोपे मराठी ग्रंथ तयार करून छापणें हेंच अधिक इष्ट व आवश्यक वाटले. आणि याप्रमाणें शिक्षण प्रसाराच्या प्रयत्नांतन अर्वाचीन मराठी वाङ्मय निर्माण झालें.

शिक्षणप्रसाराच्या या हेतूच्या सिध्यर्थ सन १८२२ सालीं मे. एलफिन्स्टन साहेबांच्या प्रयत्नानें मुंबईस नेटीव्ह एज्युकेशन सोसायटीची स्थापना झाली व पुस्तके छापण्यासाठीं एक मराठी छापखानाही काढण्यांत आला. सोसायटीच्या मराठी शाळेचें काम तपासण्यास सदाशिव काशीनाथ छत्रे व जगन्नाथशास्त्री क्रमवंत यास नेमलें होतें आणि छापखान्याची देखरेख कॅप्टन जर्विसकडे सोपविली होती.

केरीच्या कोशानंतर महाराष्ट्र वाङ्मय सूचीवरून असें दिसतें कीं पं वैजनाथ यांनीं हितोपदेश ( १८१५ ). जर्विसनें कर्तव्य भूमिती ( १८२६ ) क्षेत्रफळ घनफळ ( १८३८ अंकगणित ( १८५० ) इत्यादि पुस्तकें तयार केली हरी केशवजी यांनीं पदार्थविज्ञान ( १८३३ ) रसायनशास्त्र ( १८३७ ) इंग्लंदचें वर्णन ( १८३५ ) व यात्रिकक्रम ( १८४१ ) ही पुस्तकें तयार केली. बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर यांनीं भूगोलशास्त्र ( १८२६ ) व हिंदुस्थानचा इतिहास ( १८४६ ) हीं दोन पुस्तकें लिहिलीं, आणि दादोबा

पांडुरंग यांनीं मराठी भाषेचें व्याकरण ( १८३६ ) लिहिलें. जगन्नाथ शास्त्री क्रमवंत, बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके सखाराम जोशी दाजीशास्त्री शुक्ल व परशरामपंत गोडबोले इत्यादि सोसायटीच्या मंडळींनी महाराष्ट्र भाषेचा कोश (१८२९ ) तयार केला व तो कॅप्टन जर्विसनें संपादून प्रसिद्ध केला. सदाशिव काशिनाथ छे यांनीं इंग्रजी भाषेंतून बाळमित्र, इसापनाति, व गुजराथी भाषांतरावरून वेताळपंचविशी इत्यादि पुस्तकें तयार केलीं येथूनच मराठी शालोपयोगी पुस्तकें छापण्याचा पाया पडला व येथूनच मुंबई इलाख्यांतील सर्व शाळांचा उगम झाला

एवंच अर्वाचीन मराठी वाङ्मयास महाराष्ट्राच्या अर्वाचीन सरकारानेंच जन्म दिला असून त्याची प्रारंभींची निगेवानीही परकी यासच करावी लागली आहे !

या दिशेनें झालेल्या खासगी प्रयत्नासंबधाने पाहूं गेल्यास असें दिसून येतें कीं मुंबईच्या गणपत कृष्णाजी नांवाच्या भंडारी गृहस्थानें प्रथम छापकाम करण्याचा उद्योग आरंभिला सनत्र १८३० सालीं त्या वर्षाचें मराठी पंचाग त्यानें शिळेवर छापलें ह्या पहिल्या पचांगाची किंमत त्यानें प्रत्येक प्रतीस ८ आणे ठेवली होती ! परंतु " त्या पूर्वी मराठी छापील पंचांग कोणासच ठाऊक नव्हतें आणि याचें पंचांग शुद्ध असून नीट छापलेलें पाहून ब्राम्हण लोक जरी छापील पुस्तकास शिवावयास कांकू करीत असत तरी तेही संतोषानें हीं पंचांगें विकत घेऊन ह्याच पचांगांवरून संव

त्सर प्रतिपदेचे दिवशीं वर्षफळ वाचूं लागले " असें गोविंद नारायण यानें आपल्या 'मुंबईचें वर्णन' या पुस्तकांत जें म्हटलें आहे, त्यावरून यावेळीं मुद्रणाविषयीं आमची कल्पना किती अनुदार होती हे चांगलेंच निदर्शनास येतें. सन १८३६ सालीं दादोबा पांडुरंग यांनीं आपलें व्याकरण गणपत कृष्णाजी यांचें छापखान्यांतच छापलें. पुढें सात वर्षांनीं त्यांनीं टाइपाचा कारखाना व छापखाना सुरू केला. त्यांच्या हयातींत व नंतर छापखाने पुष्कळच निघाले, परंतु त्यांनी केलेल्या कायम ठशांच्या स्वतंत्र वळणाच्या योगानें त्यांचें नाव अद्यापी लोकांच्या तोंडीं आहे. हें वळण डौलदार असून गणपत कृष्णाजींचें स्मारकच होय विशेष शिक्षण नसतां स्वावलंबन व महत्त्वाकांक्षा या दोन गुणांनी ज्यानें आपलें नांव उदयास आणलें असा गृहस्थ 'महाराष्ट्राचा कॅक्स्टन+' या पदवीस पात्र झाला हें योग्यच आहे

मुंबईप्रमाणें पुण्यासही सन १८२१ सालीं विश्रामबाग वाड्यांत सरकारी संस्कृत पाठशाळा स्थापण्यांत आली व तिच्या करितां दक्षिणाफंडातून पन्नास हजाराची रक्कम बाजूस काढून ठेवण्यांत आली. बाजीरावशाही समाप्त झाल्यानंतर एलफिन्स्टन साहेबानें रमण्यांत ब्राम्हणांची कोंडी करून दक्षिणा देण्याची पूर्वींची चाल बंद

+ विल्यम कॅक्सटन, पहिला इंग्रज प्रिंटर. याचा काळ सन १४२२–१४९१ हा धरतात. यानें The Recuyell of the Histories of Troy हें आपलें पहिलें पुस्तक सन १४७४ त छापलें.

केली; तथापी इतर देवस्थानांच्या उत्पन्नाबरोबर दक्षिणेचा खच त्यानें पुढेंही चालू ठेवला. मात्र त्यानें त्याचें वरील प्रमाणें रूपांतर केलें. एक दोन वर्षांत या पाठशाळेंत सुमारे दीडशें विद्यार्थी शिकूं लागले संस्कृत शास्त्र ग्रंथांबरोबर धर्मशात्र व गणित हे विषय शिकविण्याची तेथें विशेष व्यवस्था झाली. पुढें मुंबईप्रमाणें पुण्यासही एज्युकेशन सोसायटी स्थापन झाल्यावर सन १८४२ सालीं याच पाठशालेला इंग्रजी शिक्षणाचा वर्ग जोडण्यांत आला.

पुण्यांच्या पाठशालेमुळें मुंबईतील शाळांस व लोकांस मोठाच लाभ झाला. पुण्यांत तयार झालेल्या कित्येक शास्त्र्यांच्या नेमणुका मुंबईतील पाठशाळेवर होऊं लागल्या व तेथील विद्यार्थी मुंबईतील पाठ शाळेंत जाऊन इंग्रजीचा अभ्यास करूं लागले व मुंबईचे विद्यार्थी पुण्यास जाऊन संस्कृत व मराठी शिकूं लागले. विशेषतः पुण्यास सन १८५१ सालीं ‘ पूना कॉलेज ’ स्थापन झाल्यानंतर तर मुंबई पुण्यांतील पाठशाळांचा निकट सबंध जडला

आणि खरोखरीच असा प्रकार घडला नसता म्हणजे शिक्षण-प्रसारासाठीं म्हणून सरकाराकडूनच पुढाकार घेतला गेला नसता तर मराठीच काय, पण कोणत्याही भारतीय वाङ्मयास इतक्या त्वरेने व हल्लींइतका पल्ला खचित गांठतां आला नसता. अशा स्थितीत पाश्चात्य संस्कृतिविशिष्ट व परकीय सत्तेच्या अमदानींत वाढलेल्या आमच्या अर्वाचीन मराठी वाङ्मयास मराठीच्या एका विद्वान् लेखकानें “ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ” या नांवानें संबोधावें हें योग्यच आहे. असो.

समाजाच्या एकंदर आयुष्याचा त्याचें वाङ्मय हा एक भाग असून समाजाप्रमाणें वाङ्मयासही बाल्य कौमार्य, तारुण्य व प्रौढत्व या अवस्था लागू आहेत. अर्वाचीन मराठी वाङ्मयाचें आयुष्य आजमित्तीस सुमारें सव्वाशें वर्षांचें असून हल्लीं ते चतुर्थावस्थेचा उपभोग घेत आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या या सव्वाशें वर्षांच्या आयुष्याचे भाग आपणांस पुढील-प्रमाणें पाडतां येतील. इ. स. १८०५ ते स. १८३५ हा काल वाङ्मयाचा बाल्यकाल समजूं. सन १८३६ ते सन १८५६ या कालास आपण वाङ्मयाचा कौमार्यकाल म्हणूं. सन १८५७ ते सन १९०० च्या कालास आपण त्याच्या तारुण्याची संज्ञा देऊं व सन १९०१ नंतरच्या कालास आपण त्याचा प्रौढकाल ठरवूं.

हें आपण कसें ठरवणार ? अर्थातच त्या त्या कालांत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांवरून. उदाहरणार्थ, सन १८०५ ते १८३६ चाच काल घ्या. या कालांत फक्त दहा मराठी पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. तीस वर्षांत अवघीं दहा मराठी पुस्तकें प्रसिद्ध होणें आज आपणास चमत्कारिक दिसतें. परंतु इतकें चमत्कारिक तें नाहीं. कारण बाल्यकाल हाच अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा जननकाल आहे.

सन १८३६ ते १८५६ या कालांत प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या कौमार्यवस्थेंत शोभण्यासारखींच आहेत. या कालांत इतर कोणत्याही विषयावरील ग्रंथापेक्षां शालोपयोगी

पुस्तकें तयार करण्याची आवश्यकता विशेष होती व म्हणूनच या काळांत शालोपयोगी व इतर बालवाङ्मय निर्माण झालें. शिक्षण-प्र ाराबरोबर यांचें क्षेत्र वाढत चाललें व जसजसें हें क्षेत्र वाढत चाललें तसतसें वाङ्मयाचें स्वरूप पालटत व वाढत चाललें.

म. वा. सूचीत सन १८३६ ते १८४४ पर्यंत प्रत्येक वर्षीं पुढील प्रमाणें एकएका पुस्तका ी नोंध आढळते. सन १८३६ त विष्णु वामन बापट यांच्या 'बालोपदेश कथा,' सन १८३८ त मिसेस फरार हिच्या 'बालबोध गोष्टी' व 'जागती जोत' हीं दोन पुस्तकें सन १८३९ त 'कित्येक जनावरांचें वर्णन', सन १८४० 'नामदेवाचे अभंग', सन १८४२ त 'फदुक वही'. सन १८४३ त विनायक शास्त्रीकृत 'शब्दसिद्धी निबंध' व सन १८४४ त 'नीतिकथा' इत्यादि.

सन १८४५ साला पासून हें मान बदललें आहे. या वर्षीं 'काशीखंड', 'गणपतीचे श्लोक.', 'पाळणें' 'बैठक चा डी' 'भूपाळ्या', 'वृंदसतसई'. 'व्यंकटेशस्तोत्र', 'शिवलीलामृत', 'शिवस्तुति', 'हरिपाठ'. व 'ज्ञानेश्वरी' इत्यादि धार्मिक पुस्तकें प्रसिद्ध झालीं. सन १८४७ त 'बकासुराची' व 'भागवताची बखर' 'रामविजय', 'हरिविजय' व संसार चोपडी' हीं पुस्तकें बाहेर पडलीं आणि सन १८४८ ते सन १८५० पर्यंत 'खगोल विद्या' 'विद्योपक्रम' 'पालीची कारिका', 'शुचिर्भूतपणा', 'ऋण-निषेध'. 'भीमरूप', 'राज्यव्यवहार कोश', हेमाद्रीची लेखन-पद्धति' व 'शालोपयोगी नीतिनिबंध' हीं पुस्तकें छापलीं गेलीं.

सन १८५० सालानंतर आपल्या वाङ्मयानें आपलें पाऊल थोडें अधिक उचललेलें दिसतें. कारण या वेळीं ग्रंथकर्तृत्वास साह्य-भूत अशा दुसऱ्या चळवळी देशांत सुरू झाल्या. पुण्यास ‘ज्ञानप्रकाश’ व मुंबईस ‘ज्ञानोदया’सारखीं वर्तमानपत्रें निघूं लागलीं. छापखान्यांची संख्या वाढत चालली व शिक्षणप्रसाराबरोबर हळूं हळूं ग्रंथ-प्रकाशनांत विविधता डोकावूं लागली.

सन १८५१ त विश्वनाथ नारायण मंडलिक यांचा ‘हिंदुस्थानचा इतिहास’, ‘पंचोपाख्यान’, ‘भारतखंडपर्व’, ‘भाव-चंद्रिका’. ‘शब्दालंकार’ इत्यादि पुस्तकें पुढें येतात व सन १८५२ त ‘काशीप्रकाश’, ‘नाना फडणविसाची बखर’, ‘विचारलहरी’, सदाशिव काशीनाथ छत्रेकृत ‘वेताळपंचविशी’, कृष्णशास्त्री चिपळूणकरकृत ‘साक्रेटिसाचा इतिहास’ इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं दिसतात.

सन १८५३ ते सन १८५६ पर्यंत वरील पुस्तकांपैकीं कित्येकांचें पुनर्मुद्रण झालें व ‘सिंहासनबत्तिशी,’ ‘स्त्रीचरित्र,’ ‘न्यायाब्धिसेतु’ ‘जनावरांच्या’ व ‘हत्तीच्या गोष्टी’ ‘कप्तान कुकचा इतिहास,’ ‘ध्रुवाख्यान,’ ‘वाटसरांच्या गोष्टी,’ ‘कोलंबसाचा वृत्तांत’ वगैरेसारखीं नवीं पुस्तकें छापलीं गेलीं. याप्रमाणें सन १८०५ पासून सन १८५६ पर्यंत म्हणजे अर्वाचीन वाङ्मयाच्या पहिल्या शतकार्धांत सुमारें शेंदीडशें मराठी पुस्तकें छापून प्रसिद्ध झालीं.

सारांश केरीच्या बऱ्यावाईट मराठी व्याकरणानें जन्म घेतल्या-नंतरही अर्वाचीन मराठी वाङ्मयाचें बीजारोपण मुख्यत्वेंकरून सरकारच्या प्रेरणेनेंच केलें गेलें आणि पुढेंही एक दीर्घकालपर्यंत त्याच्या प्रणेत्यांत केवळ सरकारच्या कक्षेंतील लोकांचाच भरणा असे.

आतां थोडें या कालच्या ग्रंथांच्या अंतरंगासंबंधानें विचार करूं.

गद्यग्रंथांत पहिला लौकिकग्रंथ प. वैजनाथकृत 'प्रतापादित्याचें चरित्र' हा होय. परंतु हा ग्रंथ हल्लीं उपलब्ध नाहीं ही मोठ्या दिलगिरीची गोष्ट आहे दुसरें व तिसरें पुस्तक डॉ मेक्लिनानकृत अनुक्रमें 'निदान' व 'औषधीकल्पनाविद्या' हें होय. यानंतर एज्युकेशन सोसायटीचें 'बोधवचन' पुढें येतें आणि तदनंतर म्हणजे सन १८३३–३५ सालांत हरि केशवजी पाठारे यांचीं 'पदार्थ-विज्ञान', 'रसायनशास्त्र' व 'इंग्लंडचें वर्णन' हीं पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं दिसतात

इग्रजी शिक्षण मिळवून मराठी भाषेंत विविध विषयांवर ग्रंथ-रचना करणारे पहिले महाराष्ट्रीय ग्रंथकार हरि केशवजी पाठारे हेच होत. हे गृहस्थ त्यावेळीं ठाणें अदालतींत नोकर असून एज्युकेशन सोयायटीच्या भाषांतर कमेटीचे सभासद होते. यांच्या हातून विपुल लेखन झालें असून यांच्या ग्रंथांवरून मुंबईतील त्या वेळच्या सुशि-क्षितांची भाषा चांगली दिसून येते.

आमच्यापुढें आज यांचा पदार्थविज्ञानशास्त्र हा ग्रंथ असून त्याव-रून आम्हांस या ग्रथाविषयीं पुढीलप्रमाणें माहिती देतां येते. या

ग्रंथाचें नांव 'सिद्धपदार्थविज्ञानशास्त्रविषयक संवाद' असें असून कर्त्यानें तो त्या विषयावरील एका इंग्रजी ग्रंथावरून तयार केला आहे. पुस्तकाच्या अर्पणपत्रिकेवर "रैट हनराबल जान अर्ल अफ् क्लेर आणि मुंबईचे गवरनर यां प्रति परम विनयतेनें आर्पला असे" असें म्हटलें असून याची प्रस्तावना ग्रंथकारानें ठाणें येथें ता. ११ ऑगष्ट सन १८३२ या तारखेस लिहिली आहे हा ग्रंथ नेटिव्ह एज्युकेशन सोयायटीनें आपल्या शिळामुद्रालयांत छापून प्रसिद्ध केला असून त्यांत विषयानुरूप शंभर चित्रेंही दिलीं आहेत; इतकेंच नव्हे, तर विषयानुक्रमणिका, चित्रांची सूचि, शब्दपरिभाषा, शुद्धीपत्रक इत्यादि सदरेंही जीं प्रस्तुतसारख्या ग्रंथरचनेच्या उत्कर्षकालींहीं उपेक्षिलेलीं आढळून येतात तीं हरी केशवजींच्या वरील पुस्तकांत यथास्थित दिलेलीं पाहून त्यांच्या कृतीविषयीं खरोखरीच आदर उत्पन्न होतो.

पुस्तकाच्या अर्पणपत्रिकेंतच कर्त्यानें म्हटलें आहे कीं, 'इंग्लिश भाषेचें व सिद्धपदार्थविज्ञानशास्त्राचें जें मला यत्किंचित् ज्ञान आपले देशीचे परोपकारी व कलाविद्यादि गुणांस आश्रय देणारे विद्वज्जन, त्यांपासून प्राप्त झालें, तें एतद्देशीय लोकांचें नीतिरूप वर्तनास, कला विद्यादिकांत प्रवेशास व प्रपंचादि सुखास अमोघ साधन असें समजून तें यांस प्राप्त व्हावे अशी इच्छा स्वभावत: माझे ठायीं उत्पन्न झाली; आणि ती माझे मित्रांचे सहाय्येंकरून आणि रैट हनराबल मौंट स्टुवार्ट यलफिस्टन साहेबानें आपल्या प्रौढ बुद्धीनें जी परमोपयोगी शिक्षामंडळी संस्थापित केली आणि जीचे सिर जान मालकम व

आपण उदार रीतीनें संरक्षण केलें, तिचा आश्रय करून हा ग्रंथ माझे हातून झाला, तेणेंकरून कांहीशी पूर्ण झाली.'

यावरून हा ग्रंथ जरी एज्युकेशन सोसायटीच्या मदतीनें तयार झाला तरी विषय कर्त्याच्या आवडीचा होता हें उघड दिसतें. पुस्तक एकंदर अठरा प्रकरणांत विभागिलें असून, विषयविवेचन सुलभ होण्यासाठीं गुरुशिष्यातील संवादपद्धतीचा स्वीकार केला आहे. पुस्तकास पुढें दिल्याप्रमाणें ' अथ प्रथम संवादः ' नें प्रारंभ करून तें ' इति अष्टादशसंवादः ' नें समाप्त केलें आहे.

## अथ प्रथम संवाद

### पदार्थांचे सामान्य धर्मांविषयीं.

" कृष्णनामा आणि. गोपाळनामा असे दोघे बन्धु होते. त्यांतील वडील कृष्णनामा कोणे एके गुरूस शरण जाऊन म्हणत आहे कीं, महाराज, मी आपल्या कनिष्ट बन्धूस विद्वान करीन अशी प्रतिज्ञा केली होती. परंतु तें कर्म सुगम नव्हे, परम दुस्तर असें मला आतां कळूं आलें. तर तें कर्म माझ्या हातून सिद्धीस जावयास कृपा करून मला अनुकूल व्हावें. सामान्य मुलें जशी शिकतात तसे तो शिकता तर माझ्यानें त्यास सांगवते. परंतु तो लहान असून असा पृच्छक आहे कीं, त्यास ज्या ज्या शंका प्राप्त होतात त्यांचीं यथा-योग्य उत्तरें मिळाल्यावाचून त्याचें समाधान होत नाहीं; आणि त्यानें प्रश्न केला असतां तसें उत्तर द्यावयास मला तर समयीं सुचत नाहीं.

आज पहा कसें झालें तो म्हणत असे ही पृथ्वी सपाट आहे. मी त्यास सांगितलें कीं, ही सपाट नाहीं, गोलाकार आहे. आणि वायूनें सभोंवती ती वेष्टिली आहे. तेव्हां त्यानें विचारलें कीं, तिला आधार कशाचा आहे ? त्यावर तिला आधार कशाला पाहिजे ? असें म्यां त्याला प्रत्युत्तर दिलें असें आहे तर ती अन्य पदार्थासारखी पडत कां नाहीं ? असें तो विचारूं लागला. इतके शब्द ऐकतां मी केवळ कुंठित झालो. कां तर पृथ्वी वायूत लोंबते असा मला बोध होऊन मी निःसंशय राहिलों होतों परंतु तिजवर सर्व पदार्थांचा भार आणि स्वयेंही ती अत्यंत जड असतां वायूंत लोंबत आहे हें केवळ विपरीत असें म्या कधींही मनांत आणिलें नव्हतें.

असें त्या कृष्णशिष्याचें भाषण ऐकून गुरु त्यास बोलतो, अरे बाबा, या तुझे शंकेची निवृत्ति करावयास मी समर्थ आहे. तुझें वय तेरा वर्षांचें आहे. यास्तव पृथ्वी कोण्या कारणामुळें निराधार राहिली याचा तुला बोध होईल. आणखी ज्या ज्या नियमांनी सृष्टीचा व्यवहार घडत आहे. त्याचेंही तुला सामान्य ज्ञान होईल. परंतु तुझा जो गोविंद नामा तिसरा कनिष्ठ बन्धु त्यासारखी ज्यांची बालबुद्धी त्यास हें ज्ञान बहुतकरून दुष्प्राय आहे.

कृष्णाशिष्य म्हणतो महाराज, ज्या कारणामुळें पृथ्वी निराधार राहिली आहे तें जाणण्याची जशी मला आवड आहे तशी दुसऱ्या कोणत्याही विषयाची नाहीं. परंतु माझे इतक्या अल्पवयांत त्या विषयाचें अध्ययन करणें केवळ अवघड असें मला वाटत होतें.

गुरु म्हणतो, सुलभ रीतीनें सांगितलें असतां कांहीं अवघड नाहीं. आणि जर तूं स्थिर बुद्धीनें चित्त देऊन ऐकशील तर मला जें कळतें तें मी यथाशक्ति तुला शिकवीन त्या विषयांत कांहीं सार नाहीं असें तुला कदाचित् पहिल्यानें वाटेल. परंतु या सृष्टीचा व्यवहार ज्या नियमांनी घडत आहे, ते नियम मी तुजपाशीं कथन करूं लागेन, तेव्हा तुला केवळ त्या विषयाचें ज्ञान प्राप्त होईल असें नाहीं तर त्या विषयेंकरून तुझें मनोरंजनही होईल '’

वरील उताऱ्यांतील भाषेवरून जरी आपण पंचतंत्र कालीन मराठी वाङ्मयांत वावरत असल्यासारखें आपणास वाटतें तरी पदार्थ विज्ञानासारख्या शास्त्रीय विषयावर वरील प्रमाणें अठरा संवादांचा व सहाशें पृष्ठांचा ग्रंथ लिहिणें त्या वेळच्या मानानें पाहतां हरी केशवजींच्या जबर व्यासगाचें द्योतक ठरतें.

हरि केशवजी हे गृहस्थ पाठारे प्रभू असून शिवाय ते मुंबईचे रहिवासी असल्याकारणानें त्यांची भाषा कांहींशी मुंबई वळणावर गेलेली दिसते हें उघड आहे

आतां याच सुमारास पुण्यास तयार झालेल्या गद्यग्रंथाचा नमुना पहावयासही लांब जावयास नको. या वेळीं पुण्यास तयार होऊन प्रसिद्ध झालेला ‘ भूगोल आणि खगोलविषयक संवाद ( १८३२ ) हा ग्रंथ आज पाहवयास उपलब्ध आहे. तथापि या ग्रंथाचा कर्ता अनिर्दिष्ट आहे हें नमूद करणें अवश्य आहे. हा ग्रंथही पुढील

प्रमाणें नित्यानंद आणि परमानंद या उभयतांत संवादरूपानें लिहिला आहे:—

## छापण्याचे युक्तीची उत्पत्ति

नित्यानंद—माझे मनांत दुसरा एक प्रश्न करावयाचा आहे; तो हा कीं, या शहरांतील कित्येक शाळामध्यें छापलेलीं पुस्तकें मी पाहिलीं आहेत, आणि दुसरीं अनेक भाषांत सांप्रत छापीतही आहेत या उपायेंकरून विद्येचा प्रसार बहुत होतो म्हणोन हा काळ फार उत्तम आहे असें जाणतो; परंतु या देशांत पूर्वी असें कांहीं नव्हतें. या करितां या छापण्याचे विद्येची उत्पत्ति जर कृपा करून सांगशील तर मजवर मोठा उपकार होईल.

परमानंद—छापण्याचे विद्येची गोष्ट थोडी आहे. सुमारें सन १४३०त हालंड देशांतील हेर्लेम गावांत राहणारा लारेनशस नामें पुरुष होता. तो कोणे एके समयीं मौजेनें वृक्षाचे सालीवर चाकूनें अक्षरें कोरीत असे. त्यांत त्याणें शाई भरून, त्यावर कागद घातला तों छाप उटला, हें पाहून तो लाकडावर अक्षरें कोरूं लागला, आणि या रीतीनें त्यानें छापणें चालविलें. नंतर तो लांकडाचें वेगळे वेगळे तुकड्यांवर अक्षरें कोरून ते तुकडे एकीकडे जोडून पुस्तकें छापूं लागला. प्रथम विद्या या रितीची उत्पन्न झाली. त्या लाकडांचे अक्षरांनीं छापायास इतका वेळ लागे कीं, सहासात वर्षांत एखादें पुस्तक तयार होत असे या प्रथमेचे शोधानंतर बारा वर्षांनीं म्हणजे सन

१४४२ त या कारखान्यांतले फाष्टस नामें पुरुषानें अक्षरांचा व सामानाचा एक जोड घेऊन मेंत्स शहरांत एक छापायाचा कारखाना चालविला. पुढें दोन तीन वर्षांनीं लांकुडांची अक्षरें लवकर खराब होतात असें पाहून लाकडांचें ठिकाणीं शिशाचा प्रयोग करूं लागले यानंतर पंधरा वर्षांनीं म्हणजे सन १४५७त स्काफर या नावाचा पुरुष फाष्टस् बरोबर भागीदार होऊन प्रथम अक्षरें ओतायाची युक्ति योजिता झाला पूर्वीं लांकडावर किंवा शिशावर अक्षरें कोरावयास फार श्रम पडत; म्हणोन त्यानें पोलादाचे एके आवतावर अक्षरें कोरिलीं, आणि तें आऊत तांब्याचे पत्र्यावर ठोकून तेथें तीं अक्षरें उमटाविलीं. नंतर त्या उमटलेल्या अक्षरांत शिशांचा रस करून ओतला. या रीतीनें जितकीं अक्षरें पाहिजेत तितकी लवकर होऊन गेलीं. शिशांत कठीणपणा नाहीं म्हणोन त्यांत सुरम्याचा रस करून घातला तेव्हां तें कठीण झालें. ही या विद्येविषयीं शेवटची कल्पना निघाली ही विद्या उत्पन्न झाल्यावर बत्तीस वर्षांनीं जर्मनदेशचे एके राजानें सन १४६१त मेन्स शहर घेतलें; तेव्हां छापणार लोक व तीं यंत्रें चहूंकडे पसरलीं; तेणेंकरून दुसरे देशांतही त्या विद्येचें ज्ञान झालें; आणि युरोखंडाचे सर्व भागांत छापण्याचे कारखाने सुरू झाले. परंतु या विद्येची मूळ उत्पत्ति हालंड देशांतच झाली असें म्हटले पाहिजे' अलीकडे वीस पंचवीस वर्षांत दुसरी एक छापखान्याची युक्ति निघाली आहे, तिचें नांव शिला छाप

तूं लक्ष्यांत आण कीं, ईश्वरानें या विद्येचे उत्पत्तीच्य द्वारानें मनुष्यमात्रावर बहुत कृपा करून प्रगट केली आहे. कारण कीं, याचे

पूर्वीं जर कोणी ग्रंथ केला तर लिहून घेतल्यावाचून त्याच्या प्रति तयार होत नसत. म्हणोन एका देशांतली विद्या दुसरे देशांत प्रवृत्त होण्यास मोठें संकट पडे. या कारणामुळें युरोपदेशचे लोक पूर्वीं शेकडों वर्षेंपर्यंत अज्ञानांत राहिले होते. परंतु या विद्येचा शोध लाग तांच पुस्तकें सर्वत्र पसरूं लागलीं आणि अज्ञानांधकाराचा नाश होऊन ज्ञान उत्पन्न झाले. या प्रकारचे बहुत चांगले हित या विद्ये पासून हाते; म्हणोन ही फार उत्तम असें मानावें परत ही गोष्ट लक्ष्यांत ठेवावी कीं, मनुष्याचे दुर्वृत्ततेंकरून हीजपासून फार वाईटही होतें. कारण कीं, चांगलीं पुस्तकें वाचून जशी मनाच्या ठायीं विशेष योग्यता येते, तशीच वाईट ग्रंथ वाचल्यानें स्थिर दुष्टता उत्पन्न होते. म्हणोन हा सिद्धांत कीं, वाणी हें एक बहुत चमत्कारिक ईश्वरीदत्त होय. जर आपण चांगले शब्द बोललो तर दुसऱ्याचे बहुत हित होतें; आणि तसेंच जर वाईट बोललों तर आपण त्यास नाशाचे मार्गांत नेतो."

परतु या भाषेवरही प्राचीनतेचें पटल आहे हें उघड दिसतें आणि तें पचतत्रकालीन वाङ्मयाइतकें दाट नसलें तरी बखरकालीन वाङमयाइतकें जून तरी खास आहे

हें पटल दूर करण्याची व अर्वाचीन मराठी वाङ्मयास हल्लींचें सात्विक व शुद्ध वळण लावण्याची जबाबदारी ज्यांचे अंगावर येऊन पडली व ती ज्यांनीं प्रसंशनीय रीतीनें बजाविली अशा यावेळच्या साहित्य सेवकांत मुंबईकेंद्रीं सदाशिव काशिनाथ छत्रे, परशुराम

बल्लाळ गोडबोले, दादोबा पांडुरंग तर्खडकर, भास्कर दामोदर पाळंदे इत्यादि चार साहित्य भक्तांची चतुर्विध सेवा पहिल्यानें रुजू होते व ह्मणूनच आह्मांसही यांचा निर्देश पहिल्यानें करावा लागतो.

उदाहरणार्थ, छत्र्यांचा ' बाळमित्र ' आज चार पांच पिढ्या अक्षरक्षः बाळमित्र झाला आहे गोडबोल्यांच्या नवनीताचे घुटके अद्यापि देखील आपणास पूर्वीइतकेच गोडी देतात दादोकृत मराठी व्याकरणावरून तर आपण आज देखील मराठी शिकतो आणि पाळंदेकृत ' रत्नमालेशी ' आपला इतका निकट संबंध नसला तरी ईश्वरभक्तिपर काव्य म्हणून या काव्यास मोरोपताच्या केकावलीच्या जोडीस बसविलें असतां कांहीं बाबतात तर तें केकावलीसही मागें सारील अशी त्याची योग्यता आहे.

उदाहरणार्थ, छत्र्यांच्या बालमित्रांतील पुढील सुंदर व हृदयस्पर्शी चुटका वाचून कोणत्या बालकास प्रथमित्राशीं मैत्री करावीशी वाटणार नाहीं ?

## चिमणी *

" गोदावरीबाई ह्मणून एक शाहाणी, भली आणि मायाळू बायको होती; तिची वडील मुलगी गंगा म्हणून होती; तिनें एके दिवशीं कांहीं अन्याय केला म्हणून आईनें तीस ममतेनेंच धमकाविलें. आईचे ते मायाळू शब्द ऐकून व आपला अन्याय स्मरून गंगा रडूं

* बाळमित्र ' भाग पहिला, नवी आवृत्ति पुणें सन १८५९.

लागली. तें पाहून तिची लहान बहीण चिमणी ( जी ) तीन वर्षांची होती, तिनें हळूच मागून येऊन एका हातानें परकराचा पदर घेऊन आपल्या बहिणीचीं आसवें पुसलीं आणि दुसऱ्या हातानें आपल्या तोंडातला खडीसाखरेचा खडा तिचे तोंडांत घातला

मला असें वाटतें कीं, कोणी चांगल्या चिताऱ्यानें ह्या प्रसंगाचें चित्र काढिलें असतां तें काय ( मनो ) वेधक होईल ! ”

वरील चुटक्यावरून छत्र्यांचा ‘ बाळमित्र ’ बालमित्र कां झाला हें तर कळतेंच. पण त्या बरोबरच मराठी गद्यानें इंग्रजी पेहराव केव्हा व कसा धारण केला ? अथवा प्राचीन ओबडधोबड वळण टाकून मराठी गद्यास अर्वाचीन कालीन स्वाभाविक वळण केव्हां व कसें लागले ? या मुद्यावरही चांगलाच प्रकाश पडतो.

छत्र्याइतकीच गोडबोल्यांची कामगिरी महत्वपूर्ण आहे छत्र्यांनीं गद्याची बाजू संभाळिली तर गोडबोल्यांनी पद्याचा पक्ष घेतला व आपल्या नवनीताचे द्वारें प्राचीन कवींची ओळख करून देत अर्वाचीन मराठी कवितेचा पाया घातला. इतरांप्रमाणें गोडबोल्यांच्य कामगिरीचाही यथायोग्य निर्देश याच पुस्तकाच्या चरित्रखडांत होणार आहे पण अर्वाचीन कवितेच्या जनकपदारूढ झालेल्या या कवीची खरोखरीच तशी योग्यता होती ही गोष्ट गोडबोल्यांच्या पुढील लहानशा कवितेवरून कोणासही पटण्यासारखी आहे. जनकवात्सल्याच वर्णन करीत असतां ते म्हणतात.:– -

**दिंडी.**

बाई माझे लाडके सिताबाई ।
बाळपणींचें कौतूक वदूं काई ॥
तुझें पाहतसे बाळपणीं मूख ।
होय मजला तैं काय वदूं सूख ॥
विनाकारण रोदन हास्य यावें ।
तिहीं वदनातें फार शोभवावें ॥
थोडथोड्या कोवळ्या दंतपंक्ती ।
जयामाजीं उगवल्या शुभ्र कांती ॥
जयापासुनी बोबडे बोल गोड ।
निघुन माझे पुरविती सर्व कोड॥

जनकवात्सल्याविषयींचे किती अमोल बोल हे ! हे ऐकून कोणत्या जनकाचें हृदय वात्सल्यप्रमाणें उचंबळून येणार नाहीं ? व कोणत्या कवीच्या काव्यरचनेच्या कसोटीस या ओळी उतरणार नाहींत ?

परंतु गोडबोल्यांच्या कार्याची व्यापकता एवढ्यानेंच चांगलीशी कळून येत नाहीं. ती यथायोग्य रीतीनें कळून येण्यासाठीं आम्हीं त्यांचीं पुढील दोन पद्यें मुद्दाम देतो आणि मग त्यावरून आपली नाट्यकविताही तात्यांच्या कृतींची किती ऋणी आहे हें दाखवितो. उदाहरणार्थ, त्यांच्या

**उपजाति.**

दारिद्र्य मित्रा वससी शरीरीं ।
माझ्याच तूं मानुनि सौख्य भारी ॥

तुझ्याविशी हें मज दु:ख मोठें ।
मेल्यास मी जाशिल सांग कोठें ।।

आणि

वसंततिलका

आनंदले नटति पाहुनि ज्यास मोर ।
त्रासोनि हंस नच ठाकति ज्या समोर ।।
तें हें अकालिकचि दुर्दिन होय भारी ।
कामी जनांस गगनासहि रोधकारी ।।

या दोन पद्यांवरून त्यांच्यानंतर पन्नास वर्षांनीं जन्म पावलेल्या गोविंद बल्लाळ देवल यांच्या संगीत मृच्छकटिक नाटकांतील " सौख्य मानुनि बहु वससि मम शरीरीं । कींव मित्रा परि येत तुझी भारी । पुढें कालानें मरण मला येतां । कुठें जासिल तूं हीच मनीं चिंता ।। ही दिंडी व त्याच नाटकाच्या चौथ्या अंकांतील " आनंदें नटती " हें मल्हाररागांतील वर्षावर्णनपर उत्कृष्ट पद ऐकिलें असतां तें त्यांच्याच वरील अनुक्रमे पहिल्या व दुसऱ्या पद्याचें नामी अनुकरण आहे असें कोणास वाटणार नाहीं ? असो.

तिसरे गृहस्थ तर्खडकर होत. पण यांच्याविषयीं तर कांहींच बोलावयास नको कारण ' शुद्ध कसें बोलावें व शुद्ध कसें लिहावें ' हें आपणास मुळीं दादोकृत मराठी लघु व्याकरणावरूनच कळतें. परंतु पाळंद्यांची योग्यता समजण्यास त्यांची रत्नावलीच वाचिली पाहिजे कारणः --

**पृथ्वी.**

प्रभो, प्रणतवत्सला ! बहुत पातकी दीन मी,
निराश्रित अजाणता तुज सदैव चित्तीं न भी;
चुके तर पदोपदी; पण न भी नसे घाबरा,
क्षमाच करशील तूं भरवसा मला हा बरा.

अशीं तिच्यांतील किती रत्नें आम्हांस येथें देतां येणार ?

बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर हे देखील याच प्रथमकालांतील एक औध्वर्यु समजले आतात. परंतु यांच्या लेखनाचे बिषय कांहीं अंशी शास्त्रीय स्वरूपाचे असल्यामुळें म्हणा किंवा ते अल्पायु निपजल्यामुळें म्हणा यांच्याकडून संस्मरणीय अशी कांहीं कृति आपल्या वाट्यास आली नाहा हें खास.

विश्वनाथ नारायण मंडलिक, माधव चंद्रोबा डुकले, गोविंद नारायण माडगांवकर, भाऊ दाजी लाड वगैरे लेखकही मुंबईकेंद्रींच मोडले जातात आणि भाऊ महाजन, मोरोबा कानोबा विजयकर, विष्णु परशुराम पंडित, विष्णुबुवा ब्रह्मचारी वगैरे मंडळी निराळ्या श्रेणीची असली तरी यांनाही मुंबई केंद्रींच दाखल करतां येते.

सारांश, कँडी—जर्विस प्रभृति आंग्ल पंडितांचा पुढारीपणा नाममात्र असून मुबईकडे अर्वाचीन मराठी वाङ्मयाचें बीजारोपण मुख्यत्वेंकरून उपरनिर्दिष्ट महाराष्ट्रीय विद्वानांच्या प्रयत्नानें केलें गेलें असून यांची कामगिरी मराठी वाङ्मयेतिहासांत चिरस्मरणीय आहे.

मुंबईकेंद्राइतकेंच पुणेंकेंद्र महत्वाचें आहे. पुणेंकेंद्रीं याबेळच्या वाङ्मयप्रवर्तकांत ज्यांचीं नावें सुचविलीं जातात त्यांच्यांत कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचें नांव अग्रस्थानीं जाऊन बसतें

पुणेंकेंद्रीं पहिल्यानें ह्यांच्यावरच वाङ्मयप्रवर्तनाची व वाङ्मय-नियमाची जबाबदारी कशी येऊन पडली व ती शास्त्रीबुवांनी किती उत्कृष्टपणें पार पाडिली हें सर्वविश्रुत आहे. शास्त्रीबुवांच्या विविध अशा ग्रंथलेखनाशी परिचित असल्यामुळें नव्हें, तर वाचनपाठमालें-तील त्यांचे साधे शुद्ध. प्रौढ व गोड भाषासरणीचे पाठ वाचीत असतां मिळालेला आनंद विसरले नाहींत, असे कैक लोक आजमि त्तीस देखील आपणांत आढळतील. निबंध आणि व्याकरण, काव्य आणि कादंबरी चरित्र आणि शास्त्रीय विषय इत्यादी वाङ्मयाच्या विविध शाखांवर त्यांचा सारखाच ताबा असे. उदाहरणार्थ. पुढील आर्या सप्तक शास्त्रीबुवांच्या उत्कृष्ट काव्यरचनेचा नमूना म्हणून देतां येईल.

आर्या.

कोण दरिद्री ? ज्याच्या हृदयीं तृष्णा सदा विशाल वसे ।
श्रीमान कोण म्हणावा ? जो तर संतुष्ट चित्त नित्य असे ॥ १ ॥
असुनि जिवंतहि मेला कोण ? असे जो सदा निरुद्योगी ।
उत्साह रहित ज्याचें मन किंवा जो असे सदा रोगी ॥ २ ॥
कोण सदा दुःखी ? जो झुरे मनी पाहुनी परोत्कर्ष ।
कोण सुखी ? पावे जो हर्षित दुसऱ्यास देखुनी हर्ष ॥ ३ ॥

सुकृति कोण ? जयाचें परोपकारीं शरीत नित्य झिजे ।
पापी कोण म्हणावा ? जो पीडा देऊनी परास रिझे ॥ ४ ॥
कोण महाशूर ? मना जो आकळुनी सदा स्ववश ठेवी ।
भीरू कोण ? भयानें मूढ जनांचा कुमार्ग जो सेवी ॥ ५ ॥
कोणा अंध म्हणावें ? न दिसे सन्मार्ग उघडही ज्यास ।
कोण बधिर ? जो नाहीं परिसत केल्या हितोपदेशास ॥ ६ ॥
रोगांत कोणता वद रोग भयंकर ? मनांतली चिंता ।
औषध काय अनुत्तम ? भोजननिद्रादिकांत परिमितता ॥ ७ ॥

महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णाशास्त्री राजवाडे, गणेश सदाशिव लेले, कृष्णशास्त्री गोडबोले वगैरे शास्त्रीमंडळही कृष्णशास्त्री यांचे समकालीनच होत व या मंडळींकडूनही बहुमोल कामगिरी झाली आहे.

याच मंडळीचे समकालीन पण ‘ लोकहितवादी ’ यांचा संप्रदाय निराळा, बाबापदमजी यांचा निराळा व जोतीराव फुले यांचा त्याहून निराळा ! सारांश, मुंबईप्रमाणें पुणेंकेंद्रही आरंभापासूनच चांगलें गाजूं लागलें व मुंबईप्रमाणेंच तेथेंही निरनिराळें संप्रदाये प्रचारांत आले, व कालेंकरून यांनांही अनेक फाटे फुटले.

## लेखांक १ परिशिष्ट १

**सन १८०५–१८५६ या कालांतील प्रमुख मराठी मासिक पुस्तकें.**

उपदेशचंद्रिका १८४४

त्रैमासिक पत्र सं. गोविंद विठ्ठल महाजन मुंबई सं. १८५५

तारप्रसारक सं. हरी केशवजी मुंबई स. १८५०

दिग्दर्शन सं. बाळशास्त्री जांभेकर मुंबई स. १८३७

प्रबोधचंद्रोदय स. १८५१

प्रभाकर सं. भाऊ महाजन मुंबई स. १८४०

प्रभोदय स. १८५६

मराठी ज्ञानप्रसारक स १८५०

विचार लहरी सं. कृष्णशास्त्री चिपळूणकर पुणें स. १८५२

सद्धर्मदीपिका स. १८५६

ज्ञानचंद्रोदय स. १८४२

ज्ञानदर्शन स. १८५४

ज्ञानप्रसारक स १८५०

## लेखांक २.

# मध्यकाल पूर्वार्ध.

## ( सन १८५७-१८८५ )

---

अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा जन्म कां व कोणत्या परिस्थितींत झाला ? वाङ्मयोत्पादनाची केंद्रें प्रथम पुणें व मुंबई हीं दोन शहरें कशीं बनलीं ?, त्याचे पहिले प्रवर्तक कोण ?, आणि स्थूल पणें त्याचें स्वरूप कशा प्रकारचें होतें ? इत्यादि गोष्टींविषयीं पहिल्या लेखांकावरून आपणांस थोडीबहुत अटकळ बांधतां आलीच आहे. आता त्यानें सन १८५७ ते १८८५ या कालखंडांत कसा प्रवेश केला व या कालांत त्यास कोठवर मजल गांठतां आली हें पाहूं.

कारण अर्वाचीन मराठी वाङ्मयानें नुस्तें जन्मास येणें पुरेसें नव्हतें व तसेंच त्याच्या बाल्यकौमार्यावस्थेनेंही ते प्रशंसापात्र होणें शक्य नव्हते. मराठी अक्षरांचे ठसे तयार झाले व त्याच्या साह्यानें दहावीस ग्रंथकारांची शंभर दोनशे मराठी पुस्तकें छापून निघाली, एवढ्यानेंच मराठी वाङ्मय कृतकृत्य होणें शक्य नव्हतें जन्मास येऊन लालनपालन झाल्याप्रमाणें मराठी वाङ्मयास तरुण व्हावयास पाहिजे होतें त्याच्या विकासानेंच तें आतां शोभायमान दिसणार होतें. या वेळीं हिंदुस्थानांतील बंगाली, हिन्दी, तामिळ इत्यादि वाङ्मयें पुष्ट व सुदृढ बनत चाललीं असतां मराठी वाङ्मयाचें यापुढें कौमार्यांतच गुरफटून राहणें त्यास कमीपणा आणणारें होतें

परतु विचाऱ्यास कौमार्यकालाचेंच उल्लंघन करण्यास पन्नास वर्षांचा अवधि लागला व ते उल्लंघन करण्यापूर्वीही त्यास एका अकल्पिक भयंकर दिव्यांतून पार पडावें लागलें ! हें भयकर दिव्य कोणतें ?

हें भयंकर दिव्य म्हणजे सन १८५७ सालचें शिपायाचें बंड होय. कारण ज्या विश्वविद्यालयाच्या व्यापक शिक्षकाचें महाद्वार सरकारनें या पूर्वी पहिल्यानेंच उघडें करून हिंदुस्थानांतील इतर देशी वाङ्ममयाप्रमाणें मराठीं वाङ्मयाच्या अभ्युदयास गति देण्याचा उपक्रम केला तें द्वार, नेमक्या याच सालीं पेटलेल्या शिपायांच्या बंडांतील वणव्याच्या ठिणग्या, वणव्याच्या जोरानें उडू लागल्यामुळें, बद होण्याची भीती सर्वत्र प्रतीत होती आणि असें झालें असतें तर आपलें मराठी वाङ्मय कदाचित् जागच्याजागीं विरामही पावलें असतें ! मग त्यास तारुण्य प्राप्त होण्याची वार्ताच कशाला ?

परंतु असें व्हावयाचें नव्हतें. मराठी वाङ्मयाची भवितव्यता इतकी कनिष्ट नव्हती. मे एल्फिन्स्टन साहेब आणि मेजर कॅंडी या मराठी वाङ्मयाच्या आद्य इंग्रज कैवाऱ्यांचें अथवा हरी केशवजी, बाळशास्त्री जभेकर, सदाशिव काशिनाथ छत्रे, दादोबा पांडुरंग, परशुरामपंत गोडबोले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, गोविंद नारायण माडगांवकर भास्कर दामोदर पाळंदे विष्णुबुवा ब्रह्मचारी, गणेश सदाशिव लेले, कृष्णशास्त्री राजवाडे. व महादेवशास्त्री कोल्हाटकर इत्यादि आद्यवाङ्मय प्रवर्तकांचें परिश्रम वायां जावयाचें नव्हतें. लव

करच सर्वत्र शांतता नांदूं लागली आणि अपकारक होऊं पाहणारें बंडाचें वावटूळ मराठी वाङ्मयास पुढें उपकारकच झालें.

कालपरत्वें आणि देशपरत्वें या किंवा अशा प्रसंगाचे परिणाम लोकस्थितीवर काय घडतात, हें ठरविण्याचें हें स्थल नव्हें व महाराष्ट्राचा या विचित्र घटनेशी कसा नाजुक संबंध पोंहचत होता, याचीही येथें चर्चा करीत बसण्याचें कारण नाहीं. आम्हांस येथें येवढेंच दाखवावयाचें आहे कीं, शांततास्थापनेनंतर असे प्रसंग वाङ्मय निष्पत्तीस पहिल्यानें कारणीभूत होतात. या एका घटनेवर देशी विदेशी सर्व भाषांत ग्रंथरचना झाली आहे. हिचा इतिहास तयार झाला आहे, हिच्यावर झीनामत महाल, हंबीरराव आणि पुतळाबाई इ. कादंबऱ्या आणि कवनें झाली आहेत, इतकेंच नव्हे तर या एका सतावन सालच्या बंडानंतर नुसत्या आमच्या मराठी वाङ्मयांत 'बायकांचें बंड', 'पुरुषांचें बंड', 'तोतयाचें बंड', 'भिक्षुकशाहीचें बंड', 'मुलांचें बंड' इत्यादि पांच मोठीं बडें झालीं आहेत! 'पोटाचें बंड', 'चहाचें बंड' इत्यादि किरकोळ बंडें तर निराळींच. असो

बंडाचें वावटूळ नाहींसें होऊन पूर्ववत शांतता नांदू लागल्यानें विश्वविद्यालयाच्या व्यापक व उच्च शिक्षणाचा लाभ सर्वांस मिळण्याची बंडापूर्वी केलेली योजना अमलांत येऊन, अनुक्रमें कलकत्ता, मद्रास व मुंबई येथें विश्वविद्यालयें स्थापण्यांत आली. मुंबई युनिव्हर्सिटी शेवटीं स्थापन झाली व तिचें पहिलें कॅलंडर सन १८६१ साली प्रसिद्ध झालें. सन १८५७ सालीं मुंबई युनिव्हर्सिटीची

स्थापना झाल्यानंतर शाळा पाठशाळा याजवरील जुन्या पंडितांचा अधिकार संपून त्या युरोपियनाच्या हाताखालीं देण्यांत आल्या. जुने पंडित निवळ मराठी जाणणारे ह्मणून त्यांना संस्कृत ग्रथांचीं भाषतरें करण्याकडे नेमिले व कृष्णशास्त्री चिपळूणकर, केरोपंत छत्रे, महादेव शास्त्री कोल्हटकर यांच्यासारखे जे इग्रजी भाषाही शिकले होते त्यांना प्रिन्सिपाल, रिपोर्टर, व क्युरेटर अशा वरिष्ट प्रकारच्या जागा देण्यांत आल्या.

सन १८५९ सालीं मॅट्रिक्युलेशनची पहिली परीक्षा झाली तेव्हांपासून महाराष्ट्राच्या सुशिक्षित लोकांच्या पाहिल्या पिढीपासूनची माहिती मिळते. व ह्या माहितीवरून महाराष्ट्राच्या इतर चळवळीं-प्रमाणें त्याच्या वाङ्मयविषयक चळवळींविषयींही बोधप्रद अनुमानें बांधतां येतात.

मॅट्रिक्युलेशनच्या या पहिल्या परिक्षेंत मुंबईच्या शाळेंतून राम-कृष्णपंत भांडारकर, महादेव गोविंद रानडे, वामन आबाजी मोडक. महादेव नारायण परमानंद, खंडेराव चिमणाजी बेदरकर, बाळ मंगेश वागळे, व जनार्दन सखाराम गाडगीळ वगैरे मंडळी आणि पुण्याच्या शाळेंतून बाबा गोखले, व्यंकटराव रामचंद्र व विष्णु बाळकृष्ण सोहनी वगैरे मंडळी पास झाली

सन १८६१ सालीं झालेल्या पहिल्या बी. ए. च्या परिक्षेंत पहिल्या वर्गांत महादेव गोविंद रानडे व रामकृष्णपंत भांडारकर, आणि दुसऱ्या वर्गांत बाळ मंगेश वागळे व वामन आबाजी मोडक

हे चार महाराष्ट्रिय गृहस्थ उत्तीर्ण झाले. पुढें सन १८६३ त ३, १८६४ त ५, १८६५ त ७, १८६६ त ७. व ११६७ त ११ गृहस्थ पास होऊन त्यांनीं पहिल्या पांचच वर्षांत वरील चारांची संख्या चाळीस केली. नतर १८६८ त २०, सन १८६९ त २ व सन १८७० त १८ मडळी पास झाली व त्या योगानें वरील संख्येची पुन्हां दुप्पट होऊन पहिल्या आठ वर्षांत आमच्या पदवीध-रांची सख्या ८० वर गेली.

मुंबई विश्वविद्यालयाच्या या पहिल्या आठ वर्षाच्या कारकिर्दीत बी. ए. च्या अभ्याक्रमांत मराठी भाषेचा समावेश होता मॅट्रिकच्या मराठी परिक्षेसाठीं परशुरामपंत गोडबोले कृत नवनीत महिपतिकृत भक्तिविजय, कृष्णशास्त्री चिपळुणकरकृत अनेकविद्यामूलतत्वसंग्रह व दासबोधाची कांहीं दशके आणि बी. ए च्या परिक्षेसाठीं मंडलिककृत हिंदुस्थानचा इतिहास, विद्येचा उद्देश लाभ आणि संतोष, सृष्टिजन्य ईश्वरज्ञान, व मुक्तेवर मोरोपंतांची कांहीं पद्यें नेमलेलीं असत. यावेळी मराठी भाषेच्या परिक्षक मडळींत पहिल्या पहिल्यानें डॉ. विल्सन, डॉ. हौ, मेजर कँडी वगैरे इंग्रज गृहस्थ व नंतर वि. ना. मंडलिक, दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळुणकर वगैरे एतद्देशीय गृहस्थ व त्या नंतर म. गो. रानडे, म. मो. कुंटे व वि. ना पाठक वगैरे पदवीधर नेमीत.

या आठ वर्षांतील ८० पदवीधरांपैकीं वामन आबाजी मोडक, खंडेराव चिमणाजी बेदरकर, रामचंद्र विष्णु माडगांवकर, महादेव

मोरेश्वर कुंटे, केशव बापुजी बाळ, श्रीराम भिकाजी जठार, जनार्दन सखाराम गाडगीळ, बळवंत सिताराम नाईक, काशिनाथ रामचंद्र गोडबोले, रामचंद्र गोविंद ओक, नारायण विनायक साठे, बळवंत भिकाजी वखारकर, महादेव चिमणाजी आपटे, कृष्णराव गोपाळ देशमुख, सीताराम विश्वनाथ पटवर्धन, कृष्णराव अंतोबा चेंबुरकर, सदाशिव विश्वनाथ धुरंधर, नरहर गदाधर फडके, दामोदर भिकाजी जठार, रामचंद्र गोविंद अनगळ, आनंदराव सखाराम बर्वे, हरि भागवत केसकर व बाळाजी बापूजी साने इत्यादि तेवीस गृहस्थ मराठी भाषा घेऊन बी. ए चीं परिक्षा पास झाले.

सन १८६२ सालीं झालेल्या बी ए. च्या परिक्षेत मराठीचे परीक्षक डॉ बिल्सन व डॉ. हौ या पाश्चात्य पंडितानीं मराठीचा पुढील नमूनेदार पॅरेग्राफ भाषांतराकरितां दिला आहे.

“ जर घड्याळाचा कांटा दिवसाचा तास दाखवितो आणि नियमाने आपल्या मार्गाने जातो असें आपण पाहिलें तर आपण निश्चय करितों कीं त्या काट्याचा नियम करणारी जी कळा आहे ती कळा उत्पन्न करणारा कोणी कुशळ प्राणी होता. या रातीनें सूर्य चंद्र आणि दुसरे अतरिक्षांतील जड पदार्थ निमामित काळीं भ्रमण करितात. ऋतूचे भेद नियमाने उत्पन्न करितात, आणि जड विश्वास आयुष्य आणि एकरूपता देतात, असें जेव्हां आपण पाहतों तेव्हां ते सूर्यादिक एके मोठ्या कारणापासून, अपार बुद्धीपासून, अपार शक्तीपासून उत्पन्न झाले या विषयीं आपल्या मनांत संशय राहत नाहीं. जसें

साफ न केलेल्या धातूचे कित्येक खरखरीत तुकडे मिळून आपाप चाकें आणि कमाणी होतील आणि आपाप जसें नियमित चमत्कारिक यंत्र घडले जाईल हे मानणे जसें असंभाव्य आहे, तसेच अंतरिक्षांतील जडांमध्यें आणि दिवस, महिने व वर्ष ही पुनः पुनः येतात यामध्ये जो चमत्कारिक बंदोबस्त अनुक्रम आणि एकरूपता दिसूं येतात ती कोणी तरी त्याप्रमाणें योजिल्यावांचून होतात असें मानणेंही असंभाव्य आहे. ”

परंतु पुरे. आजच्या आपल्या कानास कटु लागणारा हा पॅरेग्राफ संपविण्याचे कारण नाहीं जुन्या पंडितांचा अधिकार सपून शिक्षक-परीक्षकाचें काम युरोपियन विद्वानाकडे गेल्या मुळें येथें मराठी भाषा अशा विकृत स्वरूपांत आपणास दिसत आहे हें उघड आहे परंतु सुदैवानें ही अनवस्था फार दिवस चालली नाहीं आणि सुदैवानें सन १८६०–६३ साली मराठी परिक्षकांचे काम माधवरावजी रानड्याकडे आलें माधवराजींकडे आलेली ही कामगिरी त्यांनीं दीर्घकाल इतक्या उत्कृष्ट रितीनें बजाविली आहे कीं, महाराष्ट्र वाङ्मय नियामकांच्या पहिल्या जागीं ते शोभतात. उदाहरणार्थ सन १८६२–६३ सालीं झालेल्या मॅट्रिकच्या परिक्षेंत माधवरावजींनी भाषांतराकरितां पुढील मजकूर दिला आहे.

## झोंप.

“ आपणास न कळतां आपणांस झोंप लागतें, हें ईश्वराच्या शहाणपणाचें प्रमाण होय. झोंप लागण्याच्या प्रकारचा विचार जर

आपण करावयास लागलों, तर त्यानेंच झोंपेचें निवारण होतें. आपण विचार करण्याचें काम सारें बंद केल्यावांचून आपणास झोंप लागावयाची नाहीं झोंप न बोलावितां येते, ह्या अवस्थेंत विचाराचा कांहीं संबंध नाहीं.

" ह्या विचार अंमळ पुढें चालवून , झोंप लागल्यावर आपली किती चमत्कारिक अवस्था होते ती पहा ! जागृत असतां जे जे पदार्थ आपण पाहतों ते ते पदार्थ नाहींतसे होतात. आणि आपण जिवंत असून जिवंत आहों हें आपणास समजत नाहीं. हृदयाचें उडणें, रक्ताचें वाहणें, भक्षिल्याचें पचणें, निरनिराळ्या रसांचें उत्पन्न होणें, अशी शरीरांतील सर्व कामें खळ न पडतां व अव्यवस्था न होतां यथास्थित चालतात. आपला जीवात्मा झोंपेंत अगदीं स्तब्ध, म्हणजे व्यापारशून्य होतो; आणि जागृत अवस्थेमध्यें जे विषय मनांत भिन्न भिन्न रूपांनीं भासत असतात, ते विषय जशी जशी झोंप लागत जाते तसे तसे एकमेकांत मिसळत जातात. इंद्रियें मंद होत होत आपला व्यापार सोडितात. स्नायूंची गति मंद होतां होतां शेवटीं शरीराचा सर्व ऐच्छिक व्यापार बंद राहतो. एकूण झोंपीं गेलेल्या मनुष्याची अवस्था सर्व प्रकारें चमत्कारिक आहे. तितकी चमत्कारिक दुसरा अवस्था मनुष्यास मिळावयाजोगी बहुतकरून एकच राहिली आहे. जो कोणी ह्या झोंपेचा विचार करील त्याला त्या दुसऱ्या अवस्थेची आठवण होईलच होईल. ती दुसरी अवस्था कोणती म्हणाल तर महानिद्रा, म्हणजे मृत्यु होय. त्याच्या येण्याच्या पूर्वी आपण

तयार असावें; राहिलेल्या वेळांचें सार्थक्य करावें, आणि आपलीं चित्तें ज्ञानमार्गाकडे वळतील असा आपण आयुष्याचा दिवसांचा सुमार पहावा. ”

किती उत्कृष्ट रचना ही ! व तसेंच किती मननीय विचार हे !

माधवरावजी रानडे यांचा मराठीवरील अधिकार मोठा होता. माधवरावजाकडून एखाद्या स्वतंत्र बहुमोल ग्रंथाची भर मराठींत पडली नाहीं, या मुद्यावर त्यांच्याकडे येणारें अर्वाचीन मराठी वाङ्मयाचे धुरीणत्व कांहीं लोक हिराऊन घेऊं पाहत त. परंतु ही त्यांची चूक आहे. कारण हा मुद्दा ग्रहण केल्यास या मुद्यावर कै. कृष्णशास्त्री चिपळुणकर, कै. काशिनाथपंत छत्रे, हरि केशवजी वगैरे विद्वांनासही अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या जनकपदावरून खालीं ओढतां येईल.

ज्ञानदेव आणि मुकुंदराज हे आमचे व्यासवाल्मिकी असतील, दादोबा पांडुरंग आमचा पाणिनी आणि कृष्णशास्त्री चिपळुणकर आमचे जगन्नाथ–कालिदास असूं शकतील, विष्णुशास्त्री चिपळुणकर आमचा जॉन्सन आणि राजवाडें गिबन धरतां येतील, शंकर मोरे रानडे आमचा बिल्हण आणि हातवळणे व जोशी कात्यायन ठरवितां येतील तर कै. माधवरावजी रानडे हेही अर्वाचीन मराठी वाङ्मयाचे या वेळचे शंकराचार्य खास होत. मराठी वाङ्मयास प्रशांत व पद्धतशीर वळण पहिल्यानें माधवरावजीनींच लावून दिलें आणि अर्वाचीन वाङ्मयाची पहिली मोजदादही माधवरावजींनींच केली. हें काम

त्यांनीं सरकारी हुकुमावरून मराठी ट्रान्सलेटर या नात्यानें सन १८६६ त केलें व त्या वेळींच मराठी वाङ्मयाविषयीं त्यांनीं " सध्यांची मराठी भाषेची स्थिती पुढील उत्कर्षाची सूचक आहे आणि अर्वाचीन हिंदुस्थानांतील सुप्रगल्भ भाषांमध्यें मराठीस पहिलेंच स्थान थोड्याच काळांत मिळेल असा सर्वस्वी संभव दिसतो " असा शेरा दिला. सारांश, अर्वाचीव मराठी वाङ्मयावर रानड्यांचे उपकार अगणित आहेत. किंबहुना लो. टिळक म्हणतात त्या प्रमाणें " महाराष्ट्रांतील तेज अनेक कारणांनी सर्वस्वी नष्ट होऊन तो एक थंड गोळा बनला असतां, त्यांत फिरून जिवंतपणाची ऊब कशी येईल, व तो गोळा आपले हातपाय कसे हालवूं लागेल याचा रात्रं-विचार करून, आणि तें दुर्धर काम स्वतः अंगावर घेऊन त्याकरितां जिवापाड जर कोणी मेहनत केली असेल तर ती प्रथम माधवरावजींनींच केली " असल्यामुळें आपल्या वाङ्मयविषयक प्रयत्नांच्या प्रेरणेचें श्रेय रानड्यांकडेसच जातें. आणि महर्षीचा आशिर्वाद कां कोठें फुकट जाणार आहे ?

दुसरी मंडळीही माधवरावजींच्या मागें नव्हती. नव्हे—कित्येक त्यांची बरोबरी करीत होते तर कित्येक त्यांच्या पावलावर पाऊल टाकून महाराष्ट्र वाङ्मयक्षेत्राचा मार्ग आक्रमीत होते उदाहरणार्थ, पहिल्यानें पदवीधरांचीच गोष्ट घ्या. मुंबई युनिव्हर्सिटीच्या पहिल्या आठ वर्षांच्या कारकिर्दींत बी ए. झालेल्या ८० ;हगृस्थांत ज्या २३ गृहस्थां नामराठा भाषा घेऊन बी. ऐची परिक्षा

उत्तीर्ण केली व ज्यांचा या काळच्या वाङ्मयाशी विशेष संबंध येतो असे बरेच गृहस्थ आहेत. तथापि त्यांतल्या त्यांत वामन आबाजी मोडक महादेव मोरेश्वर कुंटे, आबाजी विष्णु काथवटे आणि आनंदराव सखाराम बर्वे, महादेव चिमणाणी आपटे, श्रीराम भिकाजी जठार इ. नांवें आपणापुढें अपोआप उभीं राहतात.

मराठीप्रमाणें संस्कृत किंवा दुसरी भाषा घेऊन पदवीधर झालेल्या या कालच्या दुसऱ्याही कित्येक विद्वनांचे मराठीविषयींचे प्रयत्न चिरस्मरणीय झाले आहेत. अशा गृहस्थांत शंकर पांडुरंग पंडित, अण्णा मोरेश्वर कुंटे, शांताराम अनंत देसाई, कान्होबा रणछोडदास कीर्तिकर, शंकर मोरो रानडे व विष्णुशास्त्री चिपळूणकर वगैरे मंडळी प्रमुख आहेत.

हें पदवीधरसंबंधानें झालें. परंतु या वेळीं उसळलेली साहित्यसेवेची ही लाट फक्त पदवीधरांसच स्फूर्ति देणारी होती असें नाहीं. पदवीधरांइतकें इंग्रजीचें ज्ञान मिळवून पदवीधरांपेक्षांही जास्त साहित्यसेवा करणाऱ्या व अर्वाचीन मराठी वाङ्मयांस ललामभूत अशा अनेक व्यक्तींचीं नांवें आम्हांस देतां येतील.

उदाहरणार्थ, सखाराम अर्जुन राऊत, विनायक कोंडदेव ओक, रामचंद्र भिकाजी गुंजीकर, गोविंद शंकर बापट, जनार्दन बाळाजी मोडक, कृष्णाजी पांडुरंग गाडगीळ, बाळाजी प्रभाकर मोडक, इत्यादि ग्रंथकारांची; सोकर बापूजी त्रिलोकेकर, विनायक जनार्दन कीर्तने व बळवंत

पांडुरंग किर्लोस्कर इत्यादि नाटककारांचीं; सूर्याजी सदाशिव महात्मे, नारो केशव रिसबुड, लक्ष्मण मोरेश्वर हळवे, व केशव लक्ष्मण जोरवेकर सारख्या कादंबरींकारांची व नारायण हरी भागवत सारख्या प्रहसन कारांचीं, बजाबा रामचद्र प्रधान, बापूसाहेब कुरुंदवाडकर, पांडुरंगशास्त्री पारखी, नारायण धोंडदेव खांडेकर आणि विठ्ठल भगवंत लेभे इत्यादि कवींचीं; हरी माधव पडित सारख्या उत्कृष्ट निबंधकारांचीं; अथवा तुकाराम तात्या पडवळ, जावजी दादाजी चौधरी व रावजी श्रीधर गोंधळेकर या मुद्रणविश्वांतील यशस्वीं कारखानेदारांचीं नांवें आणि त्यांनीं केलेली कामगिरी कोणास माहीत नाहीं ?

तसेंच जोतीबा फुले यांनीं प्रारंभ केलेला 'सत्यशोध' या कालांतील नारायण मेधाजी लोखंडे, धोंडिराम नामदेव, कृष्णराव भालेकर, गणपत सखाराम पाटील डॉ. संतूजी रामजी लाड माधवराव घाटवळ, दर्याजीराव थोरात व भाऊ पाटील वगैरे मंडळींनीं चालू ठेवला होता हे त्यांस भूषणावह नव्हतें असें कोण म्हणेल ?

सन १८५७ ते सन १९१७ पर्यंतचा कालच अर्वाचीन मराठी वाङ्मयेतिहासांतील अत्यंत महत्वाचा काल आहे. पहिल्या ४५–५० वर्षांशीं दुसऱ्या ४५–५० वर्षांची तुलना केल्यास या दुसऱ्या कालांतील मराठी वाङ्मयानें गांठवेला पल्ला त्यास निःसंशय भूषणावह होता. 'अर्वाचीन मराठी वाङ्मय' या प्रौढ नामाभिधानाची सार्थकता करणाऱ्या वाङ्मयाचा पाया याच कालांत विशेष मजबूत झाला.

हें काम यांतील जितकें पहिल्या पंचवीस वर्षांतील लेखकांकडून तितकेंच तें दुसऱ्या पंचवीस वर्षांतील लेखकांकडून झालें आहे पहिल्या पंचवीस वर्षांतील लेखकांनी, पूर्वींच्या पिढींतील ग्रंथकारांनीं तयार केलेला अर्वाचीन मराठी वाङ्मयशकट ताज्या दमानें चालविण्यास सुरुवात केली न केली, तोंच दुसऱ्या पंचवीस वर्षांतील लेखकांनी त्यास विलक्षण वेगवान करण्याचें श्रेय घेतलें व दोघांनीं मिळून अर्वाचीन मराठी वाङ्मयाचें सुदर व गोजिरवाणें मंदिर उभें केलें.

मध्यकलीन पूर्वार्धांतील साहित्य सेवकांच्या साहित्यसेवेचा मध्य-काळ अदमासें सन १८५७ ते १८८५ हा धरतां येतो आणि भारतीयांच्या दृष्टीनें हा काल १९ व्या शतकांतील अत्यंत महत्वपूर्ण काल समजला जातो. हा काल जसा वाङ्मयेतिहासांत तसाच तो महाराष्ट्राच्या समाजेतिहासांतही संस्मरणीय आहे. किंबहुना या काळच्या वाङ्मयाविषयीं महाराष्ट्राच्या तत्काली सामा-जिक व राजकीयन परिस्थितीसच जबाबदार धरणें योग्य होईल. या कालांत अखिल भारतवर्षांत व त्यांतल्यात्यांत महाराष्ट्रांत लोकसंग्रह अथवा लोकक्षोभ करणाऱ्या अनेक घडामोडी झाल्या आहेत व या सर्व घडामोडींचें प्रतिबिंब या वेळचा वाङ्मयांत स्पष्टपणें दिसून येतें. उदाहरणार्थ. सार्वजनिकसभा, राष्ट्रीयसभा या सारख्या सभांची व आर्यसमाज, प्रार्थनासमाज व सत्यशोधकसमाज या सारख्या समाजांची स्थापना, न्यू इंग्लिश स्कूल, फर्ग्युसन कॉलेज व डेक्कन कॉलेज या सारख्या शिक्षण संस्थांची स्थापना, पुनर्विवाहाची व [illegible] गमनाची

चळवळ, निबंधमाला, केसरी व सुधारक यांसारख्या नियतकालिकांस अवतार सन १८७६-७७ सालांतील दुष्काळ व वासुदेव वासुदेव बळवत फडके यांचें बंड, श्री मल्हारराव गायकवाड यांची पदच्युति व श्री. सयाजीराव महाराजांचें राज्यारोहण, हिंदुस्थानांतील प्लेग, रँडसाहेबांचा खून, पंडिता रमाबाई आणि त्यांचें शारदासदन, शिवाजी उत्सव, गणपतीचे मेळे, राजद्रोहाचे खटले व लोकांची धरपकड इत्यादि गोष्टीस वाङ्मयापासून अलिप्त ठेवणें केवळ अशक्य होते अर्थात याच खळबळींतून राजकीय, सामाजिक, शैक्षणिक, औद्योगिक वगैरे अनेक विषय निघाले व त्यांची बरीवाईट चर्चा होत असतानाच अर्वाचीन मराठी वाङ्मयास तारुण्य प्राप्त झालें

विशेषतः विश्वविद्यालयाच्या व्यापक, उदार आणि उच्च शिक्षणाचा प्रसार अधिकाधिक होऊं लागून, तें जों जों आमच्या पचनीं पडूं लागलें तों तों पाश्चात्य तत्ववेत्त्यांनी, पाश्चात्य इतिहासवेत्त्यांनीं, पाश्चात्य राजशास्त्रवेत्त्यांनी, पाश्चात्य कवींनीं आणि कादंबरीकारांनीं—सारांश, पाश्चात्य विचारपद्धतीनें—आमच्या दुसऱ्या व तिसऱ्या पिढींतील सुशिक्षितांच्या आचारविचारांत जबरदस्त परिवर्तन घडवून आणिलें.

या परिवर्तनाचा परिणाम अर्वाचीन मराठी वाङ्मयावर तदनुरूप प्रगमनशील झाला व बाल्यकौमार्यांत संगोपान पावलेले त्याचे स्नायु आता कोठें बळकट दिसूं लागल, व मिळालेल्या नवजीवनामुळें ते त्यास शोभूंही लागले. बाल्यांतील बालिशतेस व कौमार्यांतील शालीनतेस आतां त्यास झुगारून द्यावें लागलें. तारुण्याची धडाडी

त्यास निर्भय करूं लागल्यामुळें, असाध्य असें त्यास आतां कांहींच वाटेनासें झालें. या वेळीं त्याची जबाबदारी वाढली, कर्तव्यक्षेत्र वाढलें, महत्वाकांक्षा वाढली, अवलोकनशक्ति वाढली, स्वाभिमान वाढला, इतकेंच नव्हें तर यथेच्छ कोड पुरविणारे पालक मिळाल्यामुळें आता आमच्या वाङ्मयाचें सर्वच प्रकार वाढलें. आतां त्याची रुचि व रसिकता वाढली त्याचीं सुखें वाढलीं व तशीच दुःखेंही वाढली. आता तें क्षणांत एक आणि दुसरें करूं लागलें! क्षणांत वेदांताचा गंभीर आव आणूं लागलें! क्षणांत धर्मशील होऊं लागलें! क्षणांत साहित्यचर्चा तर क्षणांत काव्यशास्त्र विनोद करूं लागलें! कधीं कलहप्रिय बनूं लागलें, जिकडे जाऊ नये तिकडे जाऊं लागलें व करूं नये तें करूं लागले

सारांश, या वेळच्या मराठी वाङ्मयास त्याच्या तारुण्याची उपमा देतां येते ती त्याच्या या वेळच्या अशा लक्षणांवरूनच.

परंतु असें साक्षेपयुक्त सांगण्यापेक्षां या कालांतील वाङ्मयाच्या निरनिराळ्या शाखांविषयींचा पुढीलप्रमाणें आम्हांस थोडक्यांत उपसंहार करतां येईल.

**कथावाङ्मय**—पौराणिक कथावाङ्मय सोडून या कालांतील कथावाङ्मय म्हणजे वेताळपंचविशी, सिंहासनबत्तिशी अथवा भोज-कालिदास व ठगसेन राजपुत्राच्या गोष्टीसारख्या पुस्तकांचें बनलेलें होतें, व त्यांत स्त्रियांबद्दल अनुदार कल्पना, चतुर प्रधान व मूर्ख राजा यांचीं चेष्टितें व व्यवहारचातुर्याचे धडे या शिवाय फारसा

अर्थ नसे पण हळबे यांच्या ' मुक्तमाला ' ( १८६१ ) या कादंबरीपासून कादंबरीच्या धर्तीवर लिहिलेल्या पुस्तकांस सुरुवात झाल्यावर मुक्तामालेस लवकरच मंजुघोषा ' ( १८६८ ), ' ' विचित्रपुरी ' ( १८७० ), ' विश्वासराव ' ( १८५० ) ' वसंतकोकिला ' ( १८७६ ) ' मित्रचंद्र ( १८८० ) वगैरे अद्भुत लीला दर्शविणाऱ्या वहिणी झाल्यामुळें वरील सारख्या पोरकट वाङ्मयास थोडा आळा बसलाच. पण गुंजीकराच्या ' मोचनगड ' ( १८७१ ) ह्या कादंबरीनें अद्भुत कादबऱ्यांची आवड कमी करून ऐतिहासिक कादंबऱ्यांची अभिरुचि प्रथम उत्पन्न केली. ' हंबिरराव आणि पुतळाबाई ', ' शिरस्तेदार ' ( १८८१ ), ' शिक्षक ' (१८८३), ' नारायणराव आणि गोदावरी ' ( १८८४ ) व ' पुण्यग्रामरहस्य ' वगैरे वस्तुस्थितिनिदर्शक व चांगल्या कादंबऱ्या या कालांत झाल्या. परंतु अरेबिनाइट्सच्या अनुकरणामुळें उत्पन्न झालेल्या त्या वेळच्या पर्शियन, चीनी व जर्मन नाइट्स व स्त्रीपुरुषांच्या दुराचरणासंबंधाच्या गोष्टींचीं दसकड्यांनीं मोजतां येणारीं चोपडीं पाहून त्या वेळच्या लोकाभिरुचीबद्दल वाईट मत होतें.

' रासेलस ' ( १८७३ ), ' हरि आणि त्रिंबक '(१८७५), ' कुटुंबवत्सल ' ( १८५९ ) व ' गलिव्हरचा वृत्तांत ' वगैरे भाषांतरित बालोपयोगी कथावाङ्मय या काळांत पुष्कळ झालें

**नाटक.**—या सदराखालीं पुष्कळ चांगलीं पुस्तकें प्रस्तुत काळांत नमूद करतां येतील. परशुरामपंत तात्या यांचीं ' उत्तररामचरित्र '

' मृच्छकटिक ', ' वेणीसंहार ' व ' शाकुंतल '; राजवाडे यांची ' मुद्राराक्षस ' व ' विक्रमोर्वशीय ', लेलेशास्त्री यांचीं ' जानकीपरिणय ' ( १८६६ ) व ' मालविकाग्निमित्र ( १८६७ ) ही संस्कृत नाटकांची गद्यपद्यात्मक भाषांतरे. ' मनोरमा ' ( १८७१ ), ' स्वैरसकेशा ' ( १८७१ ), ' सौभाग्यरमा इ. नाटकें आणि ' डाक्टर व वैद्य ' ( १८८० ), मोर एल. एल. बी.' ( १८८२ ) ' पुनर्विवाहदुःखदर्शन ' ( १८८४ ) व ' दिवाणी कोर्टापासून परिणाम, या सारखीं सामाजिक सुधारणांचें मंडन अगर खंडन करणारीं प्रहसनें कीर्तन्यांचें ' टेम्पेस्ट ' (१८७५) महाजनींचे ' तारा ' ( १८७९ ) हॅम्लेटचे ' विकारविलसित ' ( १८८३ ), वीरसेन ( १८८३ ) व ' हिंमतबहादर ' हे तीन अवतार. ' भ्रांतिकृतचमत्कार ' (१८७७) वगैरे शेक्सपियरच्या नाटकाचीं भाषांतरें;—आणि ' नळदमयंती ' ( १८७९ ), शाकुंतल, सौभद्र, रामराज्यवियोग वगैरे आद्य संगीत नाटकें या काळच्या जमेस आहेत. ऐतिहासिक नाटकांत कीर्तन्याचा ' माधवराव ' ( १८६१ ) व त्यानंतर खरेकृत ' गुणोत्कर्ष ' ही दोनच नाटकें नांव देण्यालायक आहेत.

चटोर नाटकें तसल्याच गोष्टीप्रमाणें या काळांत फारच फैलावलीं होतीं. पौराणिक कथांवर जवळ जवळ शंभर नाटकें या काळांत झालीं; तशींच कांहीं ऐतिहासिक नाटकें व पंचवीस एक प्रहसनें झालीं. शंकर मोरो रानडे यांचे ' नाट्यकथार्णव ' ( १८७९ ) हे या शाखेचे या वेळचें मुखपत्र समजले जाईल.

काव्य—कुंट्यांच्या ' राजा ' ' शिवाजी ' ( १८६९ ) या काव्यानें आधुनिक कवितेचें शिंग फुकलें तरी गंगानदीवरील तीन काव्यें, ' शिवाजीचरित्र ' ' उच्छ्वप्रकाश ' ( १८७४ ) ' अकबर ' ( १८७९ ) ' पार्वतीप्रकोप ', ' गणपतीनिधनविलाप ' (१८८०), पद्यरत्नावली, ( १८६९ ), ' देवसेनी ' ( १८६७ ), ' रघुवंश ', ' षडऋतुवर्णन ' ( १८८२ ), ' समुद्र ' (१८८४), ' महाराष्ट्र जनविलाप ' ( १८८४ ), ' पद्यसुधा ' ( १८८२ ), ' बोधसुधा ' ( १८८२ ) हीं जुन्या धर्तीचीं काव्यें या काळांत झालींच. ओकांचे 'काव्यमाधुर्य' ( १८८४ ) याच काळाच्या जमेस आहे आणि त्यांच्याच प्रयत्ननें चाललेल्या ' काव्येतिहाससंग्रहास ' ( १८७८ ) या विषयाचें प्रमुख नितयकालिक समजतां येतें किरकोळ काव्यवाङ्मय पुष्कळ झालें, जमीन मोजण्यावर व मरेच्या इतिहासातील ठळक गोष्टींवर देखील कविता झाल्या !

चरित्र—रामदास ( १८७१ ), एकनाथ ( १८७२ ), विष्णुबुवा ब्रम्हचारी ( १८७३ ), पाळंदे ( १८७८ ) नाना फडणविसाचा वृत्तांत (१८५९) बाजीराव बल्लाळ (१८७९), बापू गोखले ( १८७७ ) परशुरामभाऊ पटवर्धन ( १८८२ ), इत्यादि चरित्रें लिहिलीं गेलीं. सहस्रबुध्यांचें एकनाथ चरित्र व बापटांचें बाजीराव हीं पुस्तकें कादंबरीवजा आहेत व भाषेच्या दृष्टीनें जितकीं महत्वाचीं आहेत तितकीं सत्याच्या दृष्टीनें नाहींत. ज्या दृष्टीनें हंसांचा वामनपंडित ( १८८४ ) अप्रतिम आहे त्याच दृष्टीनें

विष्णुशास्त्री चिपळूणकरांचे ' कविपंचक ' उत्कृष्ट आहे. राजा राममोहनराय ( १८५८ ) हें एकच काय तें परप्रांतीयाचें चरित्र या काळांत झालें. परकीय युरोपियन पुरुषांचीं चरित्रें मात्र पुष्कळ झालीं

**इतिहास**---हें सदरही अगदीं दरिद्री होतें असें म्हणतां येणार नाहीं. ग्रँड डफची मराठ्यांची बखर ( १८५३–५७ ) प्रसिद्ध होतांच नी ज. कीर्तनें यांनी फार मार्मिकपणें त्याच ' मराठ्यांच्या इतिहासाचे निरीक्षण ' ( १८६८ ) केलें व महाराष्ट्राच्या इतिहास संशोधनाकडे अभ्यासकांची दृष्टी वळविली. शिंदे, होळकर, प्रतिनिधी, विंचूरकर, आंग्रे इ. घराण्यांचे इतिहास लिहिले गेले व तसेंच गोमांतकाचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास, लोकहितवादींच्या ऐतिहासिक गोष्टा ( १८७७-८० ) कुर्गचा इतिहास ( १८८५ ) सीलोनचा इतिहास ( १८८५ ) हीं स्वतंत्र व शोधपूर्वक लिहिलेलीं पुस्तकें या काळांत झालीं. सोहनीकृत पेशव्यांची बखर व गोडसे यांचा ' माझा प्रवास ' हीं पुस्तकें याच काळांतील. तथापि सत्यान्वेषणास कचरण्याची अथवा इतिहासाच्या नांवावर मनःकल्पित गप्पा झोडण्याची संवय अजून नष्ट झाली नव्हती असें शिवाजी व दादोजी वगैरे पुस्तकांवरून दिसून येतें.

**प्रवास व स्थलवर्णन**---या सदरांत राणीचें पुस्तक(१८७१) **मुंबईचें वर्णन** (१८६३ ) **इंग्लंडचा प्रवास** ( १८८३ ) **पुणेंवर्णन** ( १८६८ ), विजापूरवर्णन (१८८४), यात्रा कल्पलता (१८८४),

तीर्थयात्राप्रबंध व डोंगरीच्या तुरुंगांतील १०१ दिवस ( १८८२ ) हीं निवडक पुस्तकें येतात.

**निबंध**--या सदरांत येणाऱ्या या काळच्या सर्व वाङ्मयांत विष्णुशास्त्री यांच्या निबंधमालेचें ( १८७४-८० ) नांव, त्यांची ओजस्वी वाणी व देशभक्तिप्रवर्तक विचारसरणी यांच्या योगें अग्रगण्य झालें. या काळांत नोकरशाही, वर्णशाही व रूढिशाही यांच्या विरुद्ध चिपळूणकर, फुले व लोकहितवादी यांचे हल्ले चढत होते व चढाईंत त्या त्या पक्षाचे लोकही सामिल होत होते 'विविध' ज्ञानविस्तार, ( १८६८ ), जोशी यांची निबंधचंद्रिका ( १८८३ ), आठल्ये यांचा ' पुष्पगुच्छ ' ( १८८० ) व दंभहारक (१८७१), ज्ञानसंग्रह ( १८७३ ) इत्यादि मासिकें निबंधात्मक वाङ्मस प्रसिद्ध करीत होते व नांवलांवरील मराठ्याचा निबंध ( १८७२ ), सर टी. माधवराव यांच्या कारभारासंबंधी अनेक निबंध, लघुनिबंधमाला व ब्रिटिश राज्यव्यवस्था वगैरे निबंध या काळांत झाले.

**तत्वज्ञान व धर्म**--धार्मिक विषयांवर या कालांत पुष्कळ वाङ्मय निर्माण झालें. या कालांत ख्रिस्ती धर्मानें हिन्दुधर्मावर निकराचा हल्ला चढवून आमचे अनेक विद्याविभूषित मोहरे आपल्या ताब्यांत घेतले व शिपाईप्यादे तर असंख्य जिंकिले; त्यामुळें हिंदुधर्माभिमान्यांसही हा हल्ला परतविण्यासाठीं आपलीं शस्त्रें परजावीं लागलीं आणि याच चकमकींत कांहीं चांगलीं पुस्तकें निर्माण झालीं. बाबा पदमजी यांचें ' अरुणोदय ' हें पुस्तक अशिक्षित हिंदु समाजाची धार्मिक

स्थिति समजावून देतें. विष्णुबुवा ब्रम्हचारी यांच्या धर्मपर व्याख्यानां-प्रमाणें त्यांच्या वेदोक्त धर्मप्रकाशानें सनातन हिंदुधर्माचा पुष्कळ बचाव केला. तथापि जोतीराव फुले यांच्या ‘ गुलामगिरी ’ ( १८७३ ) सारखीं पुस्तकें ब्राम्हणद्वेषाची मशागत करीत होती, तर ‘ जातिभेद विवेकसार ( १८६१ ), ‘ भिक्षुक ’ ( १८७७ ), गुंजीकरांचें सरस्वति मंडळ ( १८८४ ) भागवतशास्त्र्यांचें त्याबांलि उत्तर, ‘ स्वर्णकारद्विजत्वखंडन ’ ( १८७७ ) इत्यादि पुस्तकें जातिद्वेषास वारा घालीत होतीं.

कुंट्यांची ‘ षट्दर्शनचिंतानिका ’ ( १८७७–७८ ) व पंडितांचा ‘ वेदार्थयत्न ’ ( १८७६ ) याच कालच्या जमेस आहेत आणि ‘ न्यायभारती ’ ( १८८२ ) ‘ न्यायशास्त्र ’ ( १८८२ ) यांसारखीहि कांहीं पुस्तकें या कालांत झालीं.

**नीति**—स्वाध्याय ( १८८० ) ‘ नीतिमंदिर ’ ( १८८० ) ‘ सद्वर्तन ’ (१८८?) ‘ स्त्रीधर्मनीति ’ (१८८५), ‘वधूदर्पणमाला’ (१८८५) व विद्यार्थी इ. पुष्कळ पुस्तकें या सदरांत झालीं तरी त्यांपैकीं पुष्कळ भाषांतरें असून तीं थोरापेक्षां बालोपयोगी आहेत, पण भाषेच्या दृष्टीनें वाचनीय आहेत. ओक व सिमियन बेंजामिन यांचीं अनेक चोपडीं नीतिपर आहेत. ‘ चाणक्यसूत्र ’ ( १८८३ ) यासारखीं्हीं एक दोन पुस्तकें झालीं.

**विज्ञान व कला**—या सदरांत अश्वविद्या, यंत्रकला, दारूकाम, जादूटोणा वगैरेवर जीं लहान लहान पुस्तकें झालीं, त्यांत

नौकानयनाचा इतिहास ( १८७२ ) व काणेकृत भूस्तर विद्येचीं मूलतत्वें ( १८७५ ) यासारखीं एक दोन पुस्तकें उल्लेखनीय आहेत. सखाराम अर्जुनकृत ' वैद्यतत्व ' ( १८६९ ), वैद्यकृत 'शस्त्रवैद्यक' (१८६९) व 'न्यायवैद्यक' ('८७१) भाटवडेकरकृत 'अबलासंजीवन' (१८८४) आणि 'बालसंगोपन' (१८८०) ही नोंदण्याजोगी आहेत. संगीतांत पुणें गायन समाज सीरीज मार्फत बरींच चांगलीं पुस्तकें लिहिलीं गेलीं व कायद्यावर तर या काळांत हल्लींच्यापेक्षां फारच पुस्तकें झालीं. देशी भाषेंत काम चाले त्याचा हा परिणाम होता

**कोशादिग्रंथ**—रघुनाथशास्त्री गोडबोले यांचा ' हंसकोश ' (१८७६); तळेकर—कँडी इत्यादिकांचे शद्बकोश, कांहीं व्याकरणांचीं पुस्तकें, 'व्युत्पत्तिप्रदीप' ('८८५) शद्बसिद्धिनिबंध ('८६६), 'अलंकारादर्श' (१८८५) वगैरे वाङ्मयोपयोगी साहित्य याच कालांत निर्माण झालें

* * * *

सारांश, अर्वाचीन मराठी वाङ्मयास तरुण बनविण्याचें श्रेय कांहीं झालें तरी अर्वाचीन शिक्षणाकडे जातें. सन १८,८ सालीं एल्फिन्स्टन साहेबांच्या कारकिर्दींत महाराष्ट्राच्या आचार—स्वातंत्र्याचा लोप होऊन याच साहेबांच्या कारकीर्दींत पुढें सन १८२२ सालीं महाराष्ट्राच्या विचार—स्वातंत्र्याचा पाया पडावयाचा होता. आणि पहिल्या गोष्टीमुळें आपणास हळहळावें लागल्यास दुसरीच्या देणगीनें एल्फिन्स्टन साहेबानें आपणास उपकृत करून ठेवलें आहे ही गोष्ट

महाराष्ट्रास विसरणें केव्हांही शक्य नाहीं. नव्हे—याच विचारस्वातंत्र्याचे बळावर आमचें गेलेलें आचारस्वातंत्र्य आम्हांस फिरून मिळवून देण्यासारखें करण्याची श्रेष्ठ अपेक्षा यानें ठेवली होती, ही गोष्ट साहेब मजकुरास खरोखरीच भूषणावह आहे.* आणि सन १८२२ तील ही त्याची अपेक्षा सन १९२२ सालकालीं थोडीबहुत सिद्धीस गेलेली पाहून एलफिन्स्टनचें अनुमान बरेंच बिनचूक होतें हें प्रत्ययास येऊन त्याबद्दल साहेबबहादुरांचें कौतुक वाटतें.

---

* लेफ्टनंट ब्रिग्ज हे एकदां मौंट स्टुअर्ट एलफिन्स्टनच्या भेटीस गेले असतां जवळच नवीन छापलेलीं मराठी पुस्तकें पडलीं होतीं. तीं पाहून ब्रिग्ज यानें विचारलें कीं ' हीं पुस्तकें कशाला " ? त्यावर एलफिन्स्टन साहेबानें उत्तर केलें कीं, " मराठे लोकांना सुशिक्षित करण्याला. पण लक्षांत ठेवा कीं, हें सुशिक्षण म्हणजेच आम्ही आपलें चंबूगबाळें आंवरून परत युरोपांत जाण्याचा राजमार्ग ठरणार ! "

न. चिं. केळकरकृत लो. टिळक यांचें चरित्र पृ. ९२

## लेखांक २ परिशिष्ट ( १ ).

इ. स १८५७-१८८५ या कालांतील प्रमुख मराठी मासिक पुस्तकें.

अबलामित्र—स रावजी हरी आठवले अलीबाग, १८७६.

आर्यमित्र—सं. वासुदेवशास्त्री केमकर, १८८४.

उपयुक्त ज्ञानसागर—सं. का. म. थत्ते, पुणें १८७८.

ऐतिहासिक नाटकमाला—सं. रा. ह आठवले, अलिबाग, १८८०.

कथाकल्पतरू—सं. कृष्ण याज्ञवल्की, मुंबई, १८७५.

कथारत्नावली ( जुनी ) सं. विनायक नीलकंठ, मुंबई, १८७४.

कादंबरीकलाप—सं. गो. ब. देवल, व श्री. भि. सरदेसाई, पुणें, १८८४.

काव्येतिहाससंग्रह सं. ज. बा. मोडक १८७८.

कुटुंब करमणूक सं. गो मो. कार्लेकर. १८८३.

गुलजार गुल्हौशी स. विठ्ठल गोविंद, १८८३.

चित्रदर्शन सं. नारायण शिवराम माळवणकर, रत्नागिरी, १८८३

तत्वविवेचक सं. एस. व्ही. केळकर, पुणें, १८८३.

दंभहारक सं. सदाशिव रामचंद्र १८७१.

धन्वंतरी स. परशुराम नारायण पटवर्धन, पुणें, १८८५.

नाट्यकथार्णव सं शंकर मोरो रानडे, मुंबई, १८७९.

निबंधचंद्रिका सं. रा. भि. जोशी, रत्नागिरी १८८३.

निबंधमाला सं. विष्णु कृष्ण चिपळुणकर, पुणें, १८७४.

निबंधसार सं. बळवंत आण्णाजी लट्टू, पुणें, १८७८.
नीत्युपदेश सं. सीमियन बेंजामिन मुंबई, १८८५.
न्यायदीपिका सं. वामन रामचंद्र ओक, १८७०.
न्यायाश्रय सं. त्रिंबक नारायण राजमाचीकर, १८६६.
पुणें सार्वजनिक सभेचे मा. पुस्तक सं सी. ह. चिपळुणकर, १८८१
पुष्पगुच्छ स. कृ. ना. आठल्ये मुंबई, १८८०.
बालबोध—सं. विनायक कोंडदेव ओक, मुंबई, १८८१.
बाल्सुमित्र—सं. शं. दा. पदे, मुंबई, १८८४.
भारतवर्ष—सं. दत्तात्रय बळवंत पारसनीस, पुणें, १८७९.
मालिका—सं. बळवंत रावजी पाटील, पुणें, १८८३.
राजहंस स. अनंत वामन बर्वे, १८८२.
लोकहितवादी—सं. गोपाळराव हरी देशमुख, १८८२.
वऱ्हाडशालापत्रक—१८७६.
विद्याकल्पतरु—सं. रावजी केशव सांबारे, ठाणें व बडोदें, १८६८.
विबुधप्रिया—सं. गोविंद विठ्ठल सिरपाट, १८८४.
विविधकलाविस्तार—बडोदें, १८८५
विविधज्ञानविस्तार—सं. रा. भि. गुंजीकर, मुंबई. १८६८.
वीरपत्नी—सं. बाळाजी के. रघुनाथ, मुंबई, १८८१.
वेदांतसमूह—सं. वासुदेव शिवराम जोशी, पुणें, १८७८.
वेदार्थयत्न—सं. शंकर पांडुरंग पंडित, मुंबई, १८७६.
वेदोक्तसद्धर्मविचार—सं. विष्णुबुवा ब्रम्हचारी, मुंबई, १८७५.
शालापत्रक—सं. कृष्णशास्त्री चिपळूणकर पुणें, १८६३.

शिल्पकलासंग्रह—सं. व्ही. ए धैर्यवान, पुणें, १८७६.

शेतकरी—सं. सखाराम चिमणाजी गोळे, उमरावती, १८८३

शेतकी—( त्रैमासिक ) स. काशिनाथ महादेव थत्ते, पुणें, १८७६,

षट्दर्शनचिंतनिका—महादेव मोरेश्वर कुंटे, पुणें, १८७७

सत्यदीपिका ( नवी ) सं रे. बाबा पदमजी, पुणें, १८७४.

सर्वसंग्रह—सं माधव चंद्रोबा डुकले, मुबई, १८६०.

सुमार्गदर्शक—सं परशराम भिकाजी भाटे, रत्नागिरी, १८६८.

सृष्टिज्ञान—सं. बळवंत भाऊ नगरकर, मुंबई, १८८५.

संगित मीमांसक—स. आण्णा घारपुरे, पुणें, १८८४.

स्त्रीज्ञानप्रदीप—सं. लक्ष्मण शकर अभ्यंकर, ठाणें, १८६९.

हिंदुधर्मविवेचक—सं. राजाराम रामकृष्ण भागवत १८८५.

ज्ञानदीप—सं. सदाशिव पांडुरंग केळकर, मुंबई, १८८४.

---

लेखांक १

# मध्यकाल उत्तरार्ध.

( सन १८८६–१९१७ )

वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीनें इ. स. १८५७ ते १८८५ या कालास आपण अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा जसा मध्यकालीन पूर्वार्ध ठरविला आहे, तसा स. १८८६ ते स १९१७ या कालास आपणास त्याच्या मध्यकालीन उत्तरार्धाची संज्ञा देणें शक्य आहे. नव्हे ज्या कारणामुळें आह्मांस पूर्वार्धास पूर्वार्ध ठरवितां आला आहे, त्याच वाङ्मयसवर्धनाच्या कारणामुळे पुढील प्रक्षित काळास आह्मांस उत्तरार्ध ठरवितां येत आहे.

उदाहरणार्थ, मध्यकालीन पूर्वार्धांत जर आपण विष्णुशास्त्री चिपळूणकर, हरि माधव पंडित, रामचंद्र भिकाजी गुंजीकर व विनायक कोंडदेव ओक यांना निबंधलेखनाचे अध्वर्यु केलें; शंकर बाळकृष्ण दीक्षित, व जनार्दन बाळाजी मोडक, यांच्याकडे शास्त्रीय विषय सोपविले, आनंदराव सखाराम बर्वे, विनायक जनार्दन कीर्तने, सोकर बापूजी त्रिलोकेकर व बळवंत पांडुरंग किर्लोस्कर यांच्याकडे नाट्यलेखनाची कामगिरी दिली, महादेव मोरेश्वर कुंटे, कान्होबा रणछोडदास कीर्तीकर, वामन दाजी ओक व विठ्ठल भगवंत लेंभे यांच्यावर काव्योत्पत्तीची जबाबदारी ढकलली, सूर्याजी सदाशिव महात्मे,

पांडुरंग शास्त्री पारखी, लक्ष्मण मोरेश्वर हळबे व वामनशास्त्री इस्लामपुरकर इत्यादिकांवर कादंबरी लेखनाचा भार टाकला काशिनाथ नारायण साने, वासुदेव वामन शास्त्री खरे व नीलकंठ जनार्दन कीर्तने यांना इतिहास संशोधनाचा पुढारीपणा दिला आणि याच अनुरोधानें आपण सन १८८६ ते सन १९१७ या कालाकडे दृष्टि फेकली तर हा काल अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा मध्यकालीन उत्तरार्ध कां व कसा होऊ शकतो, याचा आपोआप उलगडा होण्यासारखा आहे.

उदाहरणार्थ, या मध्यकालीन उत्तरार्धांतील गोपाळ गणेश आगरकर, बाळ गंगाधर टिळक व शिवराम महादेव परांजपे यांचा निबंधलेखनासारख्या रुक्ष विषयांतही कोण हात धरूं शकता? काशिनाथ वामन लेले, विष्णु वामन बापट व चिंतामण गंगाधर भानु यांनीं केलेले धार्मिक वाङ्मयाचें उद्घाटन कोणास नाकबूल करतां आलें असतें? राजाराम रामकृष्ण भागवत, चिंतामण विनायक वैद्य व नारायण भवानराव पावगी यांचे धर्मेतिहास संशोधनाचे प्रयत्न कोणास माहीत नाहींत? शंकर दाजी पदे, गणेश कृष्ण गर्दे, कृष्णशास्त्री भाटवडेकर व बाळकृष्ण दिनकर वैद्य यांचें आर्यवैद्यकविषयींचें आणि मल्हार खंडेराव चिटणीस प्रभृतींचे ज्योतिषशास्त्रविषयक कार्य कमी वाखाणण्यासारखें आहे असें कोण म्हणेल? शंकर मोरो रानडे, विष्णु मोरेश्वर महाजनी गोविंद बल्लाळ देवल, वासुदेव बाळकृष्ण केळकर, कृष्णाजी लक्ष्मण सोमण ऊर्फ 'किरात',

नारायण बापूजी कानिटकर आणि त्यांच्यानंतर श्रीपाद कृष्ण कोल्हटकर कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर व वासुदेव रंगनाथ शिरवळकर यांच्या नाट्यकृतीच्या उत्तमतेबद्दल कोणाचा मतभेद असू शकेल? बळवंत खडूजी पारख, गंगाधर रामचंद्र मोगरे, वासुदेव गोविंद कानिटकर, विद्याधर वामन भिडे, नारायण वामन टिळक व कृष्णाजी केशव दामले ऊर्फ 'केशवसुत' यांची कविता पूर्वार्धकालीन कवींहून कमी सरस कोठें आहे? नागेश विनायक बापट, शंकर मोरो रानडे व बळवंत रावजी पाटील यांनीं जोडून दिलेला कादंबरी-लेखनाचा दुवा हरि नारायण आपटे, बाळकृष्ण संतुराम गडकरी, कृष्णाजी बल्लाळ गोडबोले, महादेव व्यंकटेश रहाळकर व श्रीराम भिकाजी सरदेसाई प्रभृतींस कशा प्रकारें उपयोगितां आला व त्याचा पुढील कालातील कादंबरीकारांस किती उपयोग झाला हें कोणास माहीत नाहीं?

त्याचप्रमाणें विनायक लक्ष्मण भावे व शंकर श्रीकृष्ण देव यांचे प्राचीन काव्येतिहाससंशोधनाचे या कालांतील परिश्रम बिनमोल आहेत असें कोणास वाटणार नाहीं? विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, दत्तात्रय बळवंत पारसनीस व गोविंद सखाराम सरदेसाई यांचा इतिहास-संशोधनाच्या कामीं हात धरणार कोण आहे? महादेव शिवराम गोळे, लक्ष्मण कृष्ण चिपळूणकर, शांताराम अनंत देसाई व शंकर पांडुरंग पंडित यांचें ग्रंथकर्तृत्व आपआपल्या कार्यक्षेत्रांत केवळ अद्वितीय होतें असें कोण म्हणणार नाहीं? आणि धनुर्धारी, कृष्णाजी

नारायण आठल्ये, बाळकृष्ण लक्ष्मण देव इत्यादिकांचें मार्मिक लेख-नही कांहीं गुप्त नाहीं.

परंतु आम्हीं तर थोडें यापुढें जातों आणि असें म्हणतों कीं, मराठी वाङ्मयाच्या मध्यकालीन पूर्वार्धांत त्याच्या त्रिविध शाखांत जर एक एक प्रतिनिधि निर्माण झाला असेल तर उत्तरार्धांत त्यांच्या जागीं अनेक प्रतिनिधि झळकूं लागलेले दिसून येतात. आणि असें झाल्या-मुळेंच अर्वाचीन मराठी वाङ्मयाची या संपूर्ण मध्यकालात जशी व जितकी मशागत व्हावयास पाहिजे होती तितकी झाली. इतकेंच नव्हे तर, त्याबरोबरच मध्यकालीनोत्तर मराठी वाङ्मयांत नवचैतन्य उत्पन्न करण्याचें श्रेयही या मंडळीच्या वांट्यास यावयाचें होतें.

उदाहरणार्थ, विदग्धवाङ्मयाची गोडी लावून 'नाट्यकथार्णव' बंद पडल्यानंतर त्याची जागा भरून काढण्यास गोविंद बल्लाळ देवल व श्रीराम भिकाजी सरदेसाई यांनीं ' कादंबरीकलाप ' ( १८८४–८५ ), कृष्णाजी नारायण आठल्ये यांनीं ' केरळकोकिळ ' ( १८८६–८७ ), हरि नारायण आपटे यांनीं ' मनोरंजन आणि निबंधचंद्रिका ' ( १८८६–९२ ) व नंतर ' करमणूक ' आणि अ. के. चिनळे यांनीं ' कादंबरीकल्पद्रुम ' ( १९०१ ) इत्यादि नियतकालिकें सुरू केलीं व त्यांच्या द्वारें विदग्धवाङ्मयाच्या पुरव-ठ्याचें काम चालू ठेविलें तोंच दत्तात्रय गोविंद सडेकर यांनीं लोक-मित्र ( १८९१ ) व काशिनाथ रघुनाथ मित्र यांनीं ' मनोरंजन '

( १८९१ ) हीं नियतकालिकें सुरू करून वरील पुरवण्यांत अधिक भर टाकिली.

काव्येतिहासंग्रह बंद पडल्यामुळेंच नव्हे तर अर्वाचीन कविता प्रकाशांत आणण्यासाठीं नारायण नरसिंह फडणीस यांनीं ' काव्यरत्नावली ' ( १८८७ ) आणि मराठी रियासतीचें इतिहास संशोधन सुगम व्हावें म्हणून वासुदेव वामनशास्त्री खरे यांनीं ऐतिहासिक लेखसग्रह ( १८९७–९८ ) व दत्तात्रय बळवंत पारसनीस यांनीं ' इतिहाससंग्रह ' ( १९०७ ) करावयास सुरुवात केली. विनायक कोंडदेव ओक यांच्या बालबोधांतील प्रौढबाधित्व जात नाहींसें पाहून वासुदेव गोविंद आपटे यांनीं ' आनंद ' ( १९०७ ) चालू केला. ' आयभिषक ' विराम पावल्यावर महादेव रामचंद्र रानडे यांचा ' भिषग्विलास ' ( १८९२–९३ ) या मुदतींत वैद्यकविषयक बहुमोल कामगिरी करीत होता व ' वेदार्थयत्न ' बंद पडल्यावर ' श्रुतिबोध ' कांहीं दिवस तरी चालू होताच. विनायक लक्ष्मण भावे याचें ' महाराष्ट्रकवि ' ( १९०३–०९ ) बंद पडलें तरी जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर यांची महाराष्ट्र कविचरित्रें याच कालांत पुढें आलीं.

एवंच हाच वेळ अर्वाचीन मराठी वाङ्मयाची भरभराट होण्याचा पाया घालणारी होती, कारण यावेळीं वाङ्मयाच्या उपरिनिर्दिष्ट शाखतां एकाहून एक सरस ग्रंथकार व लेखक पुढें सरसावींत

होते. इतकेच नव्हे तर कित्येक साहित्यभक्त साहित्यसेवेचीं नवीं नवीं क्षेत्रें शोधून काढण्याच्या प्रयत्नांत होते.

उदाहरणार्थ, वेदांतशास्त्राची गोडी लागण्यासारख्या रीतीनें लिहिलेला महादेव मल्हार जोशीकृत ' आधुनिक सुशिक्षितांचा वेदांत ' ( ९, ५ ) अद्यापि तयार व्हावयाचा होता, मग ' गीता-रहस्य ' व तत्सम ग्रंथ तर दूरच.

नीतिशास्त्रावर पुष्कळ पुस्तकें तयार झालीं असतां वामन मल्हार जोशी यांचा फिरून ' नीतिशास्त्रप्रवेश ' आमच्या विधानास पुष्टीच देईल आणि त्याच वामन मल्हार जोशांची 'रागिणी' (१९१५) सामाजिक कादंबऱ्यांचा दर्जा होता त्यापेक्षां निःसंशय वाढवील.

दत्तात्रय बळवंत पारसनीसकृत ' महाराणी लक्ष्मीबाई यांचें चरित्र ' ( १८९४ ), लक्ष्मण कृष्ण चिपळूणकरकृत ' विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र ' ( १८९४ ) व शंकर बापूजी मुजुमदारकृत ' आण्णासाहेब किर्लोस्कर यांचें चरित्र ' ( १९११ ) हीं या काळांतील बहुमोल चरित्ररत्नें खरीं, पण धोंडो केशव कर्वेकृत ' आत्मवृत्त ' हा ग्रंथ या शाखेंत केवळ अपूर्व होय. आणि समुच्चय चरित्रग्रंथांत हरि माधव पंडितकृत 'चार चरित्रात्मक लेख' (१९०८), गणेश रामचंद्र शर्माकृत ' सारस्वतरत्नमाला ' ( १९१० ) व शंकर बापूजी मुजुमदारकृत ' महाराष्ट्रीय नाटककार ' हीं या काळांतील पुस्तकें खरोखरीच वाखाणण्यासारखीं झालीं आहेत.

समाजशास्त्रांतर्गत ग्रामसंस्थेवर महादेव राजाराम बोडसकृत 'प्राच्य व पाश्चात्य ग्रामसंस्था' ( १८९३ ) या पुस्तकासारखीं जीं चार दोन पुस्तकें या अवधींत तयार झालीं त्यांत त्रिंबक नारायण अत्रेकृत 'गांवगाडा' १९१५) यासारखें पुस्तकच पाहण्यांत आलें नाहीं. आप्पाजी विष्णु कुळकर्णीकृत 'मराठी रंगभूमी' ( १९०३ ) हा सुंदर ग्रंथ वाङ्मयेतिहासात्मक नसला तरी मराठी रंगभूमीचा तो खराखुरा इतिहास आहे. यादव शंकर वावीकरकृत 'वाचन' हें छोटेखानी पुस्तक छोटेखानी वाचकांकरितां खरोखरीच बिनमोल आहे; परंतु गणेश सदाशिव भाटेकृत 'वाचन, त्याचे मार्ग व उद्दिष्ट' ( १९ ३ ) हें पुस्तक निःसंशय प्रौढ विद्यार्थ्यांसच झेंपणारें आहे.

श्रीपाद कृष्ण कोल्हाटकर यांच्या 'सुदाम्याचे पोहे' ( १९१० ) या पुस्तकानेंच विनोदी वाङ्मयाचा पाया घातला आणि का. ना. पटवर्धनकृत 'नाटक्याचे तारे' (१९१४), राम गणेश गडकरीकृत 'रिकामपणची कामगिरी' व बेहरेकृत 'बोथटबाण' इत्यादि पुस्तकांनीं ती परंपरा चालू ठेविली.

वासुदेव बाळकृष्ण केळकर यांच्या 'त्राटिका' नाटकानें हास्यरसप्रधान नाटकांचें महत्त्व व मनोहारित्व प्रथमतःच निदर्शनास आणिलें आणि गोविंद बल्लाळ देवलकृत 'फाल्गुनराव' (१८९९), विनायक त्रिंबक मोडककृत 'प्रणयाविवाह', हरिश्चंद्र आनंद तालचेरकरकृत 'रावबहादूर पर्वत्या' ( १९०४ ), वामन गोविंद काळेकृत 'विक्षिप्तराव' ( १९०८ ), शंकर परशुराम जोशीकृत

' विचित्र-लीला ' ( १९१६ ) आणि महादेव नारायण जोशीकृत ' मनोरंजन ' ( १९१६ ), ' विनोद ' ( १९१६ ) व ' रमणूक' ( १९१७ ) इत्यादि नाटकांनीं हें सदर गाजवीत ठेविलें.

धनुर्धारीकृत ' वाईकरभटजी ' या पुस्तकास चि. मो. आपटे कृत ' शामभट्ट आणि त्यांचा शिष्य बटो ह्यांचा वृत्तांत ' (१८९३) व बा. करंदीकरकृत ' भद्रंभद्र ' ( १९०० ) हीं भावडें झालीं आणि कृष्णाजी केशव गोखलेकृत ' खूब केलीस सूनबाई ', आपटेकृत ' भोळा बाळू ' यासारख्या नानलगांची त्यांना जोड मिळाली.

वासुदेव वामनशास्त्री खरेकृत ' गुणोत्कर्ष ' आणि वि. द. भिलवडीकरकृत ' नरवीर मालुसरे ' या नाटकानीं वीररसप्रधान नाटकें प्रचारांत आणिलीं खरीं; परंतु शिरवळकर व मोडककृत ' राणा भीमदेव ' ' पानपतचा मुकाबला ' ( १९०० ) व किरात कृत ' पानपतचा दुर्दैवी मोहरा ' (१८९८) इत्यादि नाटकें रंगभूमीवर येईपर्यंत प्रेक्षकांवर तिच्या वीररसप्रधान नाटकांची छाप ह्मणण्यासारखी पडली नव्हती.

महादेव मोरेश्वर कुंटेकृत ' राजा शिवाजी ' ( १८६९ ) नें अर्वाचीन मराठी कवितेचा अरुणोदय जाहीर केला व वासुदेव वामन शास्त्री खरेकृत ' यशवंत महाकाव्य ' (१८८८), रे. नारायण वामन टिळककृत ' माझा ओसाड पडलेला गाव ' ( १८९६ ), ' माझी भार्या ' ( १८८७ ) कान्होबा रणछोडदास कीर्तिकरकृत ' इंदिरा ', एकनाथ गणेश भांडारेकृत ' करुणाविलास ' ( १८८३ )

व पुरुषोतम बाळकृष्ण जोशीकृत ‘ शिवदुःखाश्रमार्जन ’ (१८९६) इत्यादि कवितांनीं तिच्या सुप्रभातकालाची जाणीव करून दिली आणि त्यालाच बळवत खंडूजी पारखकृत ‘ दुर्व्यसन निषेधाष्टक ’ (१८९८), विठ्ठल भगवंत लेंभेकृत ‘ शोकावर्त ’ (१८९९), गोविंद वासुदेव कानिटकरकृत ‘ यक्षसंदेश ’ (१९०२), लक्ष्मण गणेशशास्त्री लेलेकृत ‘ पद्यमंजरी ’ (१९००), बाळकृष्ण अनंत भिडेकृत ‘ बोधमणिमाला ’ (१९०५), ‘ मोगऱ्याचीं फुलें ’ ( १९०८ ) विद्याधर वामन भिडेकृत ‘ जीवजागृति ’ (१९१३) व ‘ राघवीय परिणाह ’, दत्तात्रय अनंत आपटेकृत ‘ हृदयतरंग ’ (१९१५) व रेंदाळकरकृत ’ ‘ मंदारमंजरी ’ व ‘अभिनव कादंबरी’ इत्यादि काव्यांनीं पुष्टी दिली. आणि ‘ केशवसुत ’, ‘ माधवानुज ’, विनायक जनार्दन करंदीकर दत्तात्रय कोंडो घाटे, चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे, भास्कर रामचंद्र तांबे, दुर्गाराम आ. तिवारी व आनंदराव टेकाडे इत्यादिकांची कविता जरी मध्यकालीनोत्तर काळांत पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाली तरी तिची रचना मध्यकालीन उत्तरार्धांतच होत होती

रामचंद्र कृष्ण चौकरकृत ‘ श्रेयःसाधन ’ ( १९१५ ), सीताराम शिवराम लोटलीकर ऊर्फ ‘ सीताकांत ’ कृत ‘ सामर्थ्य, समृद्धि व शांति ’ ( १९१५ ) व गणेश रंगनाथ दंडवतेकृत ‘ प्रगति ’ ( १९१७ ) इत्यादि पुस्तकांनीं उद्बोधक वाङ्मयाची गोडी पहिल्यानेंच उत्पन्न केली व याच सदराखालील ‘ आत्मोन्नति ’, ‘ आत्मविद्या ’ व ‘ स्वतःचा प्रयत्न ’ इत्यादि पुस्तकें मागें पडलीं.

ग्रंथकर्तृत्वाप्रमाणें ग्रंथपरीक्षणांतही फरक पडला आहे. उदाहरणार्थ, बा. म. हंस, मा. व्य. लेले, हरि. मा. पंडित व देव यांचीं टीकात्मक पुस्तकपरीक्षणें निराळीं, बा. अ. भिडे, कृ. ना. आठल्ये, ल. ग. लेले व ल. रा. पांगारकर इत्यादिकांचीं परीक्षणें निराळीं आणि ' नाट्यकला रुक्‌ठार ' कर्ते ठोसर व मराठे यांचीं पुस्तकपरीक्षणें तर त्यांहून निराळीं.

तथापि हें सर्व आम्हीं विज्ञानेतर विषयासंबंधीं सांगत असल्यामुळें विज्ञानाभिमान्यांना मराठी वाङ्मयाचे हा उत्कर्ष मान्य होणार नाहीं परंतु आपल्या सुदैवानें वैज्ञानिक विषयही या कालांत अपकर्षावस्थेंत नव्हते, असें आम्हांस त्यांस खात्रीनें सांगतां येईल.

उदाहरणार्थ, पं. रघुनाथशास्त्री, वि. गो. नवाथे, य. के. प्रधान व प. भा नानल वगैरे मंडळी पूर्वकालीन ज्योतिर्विदांस लिसरावयास लावतील आणि वैद्यकाविषयीं ग. पां. कानोल, गो. रा. तांबे व भा. म. टेंभे या कालांतील गर्दे, पदे व भाटवडेकर ठरतील. तसेच वि. चि. कर्वेकृत ' लोहमार्ग ' ( १८७९ ) व बा. प्र मोडककृत ' यंत्रशास्त्र ' ( १८८७ ) या पुस्तकानंतर बहुतेकांचें या विषयाकडे दुर्लक्ष असतां मा. मै. सुरनकरकृत ' प्राचीन यंत्रकलासाहित्य ' ( १९०७ ) व द. पी. भासेकरकृत ' नौकानयन ' ( १९१२ ) हीं दोन पुस्तकें या कालांत कशी तयार झालीं याचेंच आश्चर्य वाटतें.

तथापि हिंदुस्थानदेश हा मुख्यत्वेंकरून कृषिप्रधान देश समजला जातो आणि गो. ना. माडगांवकर यांच्या ' वृक्षवर्णन ' ( १८५७ ) या पुस्तकावरून या विषयानें आपल्या लोकांचें लक्ष पुष्कळ दिवसांपासून वधिलें आहे असें म्हणतां यतें आणि त्यानतरचीं बा आ. गुप्तेकृत ' कृषिकर्मांतर्गत रसायनशास्त्र व भूगर्भशास्त्र ' ( १८७९ ), प्र बा. लिमयेकृत ' कृषिकर्मशास्त्र ' ( १८८३ ), रा. आ. राजेकृत ' कृषिकर्मविद्या ', शं गो. गोखलेकृत ' शेतकी–बागायत ' ( १८८८ ) इत्यादि सर्वसाधारण स्वरूपाचीं पुस्तकें वगळलीं तरी ब. ग. देशपांडेकृत ' हिंदुस्थानांतील पाऊस व झाडें, ( १९०९ ), भा. का घारेकृत ' दूध व दुभतें ' ( १९१३ ). पां. गो. बाळमहाजनकृत ' वनस्पतिसंवर्धनशिक्षक ' ( १९११ ) व वा. रा. गाडगीळकृत ' आम्रसंवर्धन ' ( १९१७ ) इत्यादि पुस्तकांवरून या विषयाकडे आपले लोक अधिकाधिक लक्ष देत आहेत असें दिसून येतें. पुण्याचें ' शेतकरी ' तर या कामीं अत्युत्कृष्ट श्रेय घेत आहे.

प्राणिशास्त्रही या कालांत उपेक्षित नाहीं उदाहरणार्थ, रा. स. गुप्तेकृत ' अश्वपरीक्षा ' ( १८८५ ) व 'गजपरीक्षा' ( १८९३ ) वि. गो. चिपळूणकरकृत ' हिंदुस्थानांतील सर्प ' ( १८९३ ), ग. कृ. आगाशेकृत ' कीटकसृष्टि ' ( १९०० ) व म. मु. जोशीकृत ' हस्तिविज्ञान ' ( १९१० ) इत्यादि पुस्तकांवरून प्राणीशास्त्राकडे आपण केवळ याच कालांत लक्ष देऊं लागलों असें म्हणावें लागतें

व्यावसायिक अथवा उपयुक्त आणि ललितकलाविषयक वाङ्मयही याच कालांत सुधारलें असें बा आ. गुप्तेकृत 'देशी हुन्नर' (१८८९), 'जगांत कसें रहावें ? (१८९५), त्र्यं. रा. लुकतुकेकृत 'प्रपंचशास्त्र' (१९०२), शं. य. गर्गेकृत 'साबू' (१८९८) व मेणबत्त्या, (१९०६) ना. ब. चव्हाणकृत 'गिलीट' (१९१२), सरस्वतिनंदनकृत 'धंदेशिक्षक' (१९१६) 'व्यापारसाम्राज्य' (१९१३) इत्यादि पुस्तकांवरून कळून येतें व के. बा. परांजपेकृत 'गृहिणीशंकानिरसन' (१८९४), रा. लेले आणि वा. गो. आपटेकृत 'घरांतलीं कामें' (१९१४) इत्यादि पुस्तकांवरून गृहशास्त्रविषयक वाङ्मयाकडेही आपण याच कालांत डोकावूं लागल्याचें दिसून येतें.

तथापि व्यावसायिक कलांपेक्षां ललितकलाकडेसच भारतीयांचा ओढा अधिक, यामुळें व्यावसायिककलाविषयक वाङ्मयापेक्षां ललितकलाविषयक वाङ्मयच अधिक समृद्ध दिसतें व त्यांतल्यात्यांत या कालांत संगीताचीच अधिक भरभराट झाली असल्याचें निदर्शनास येतें. संगीताच्या या भरभराटीस आण्णा घारपुरे, शि. स. मनोहर, वि. दि पलुस्कर व भातखंडे ऊर्फ 'विष्णुशर्मा' यांचेच अविरत प्रयत्न कारणीभूत झाले आहेत असें त्यांच्या विविध ग्रंथांवरून ठरतें.

जो आशाजनक प्रकार वरील शाखांविषयीं दिसून येतो तोच वाङ्मयाच्या दुसऱ्याही कित्येक शाखासंबंधानें दिसतो. उदाहरणार्थ, वि. गो. चिपळूणकरकृत 'शारीरशिक्षण' (१८९३), रा. ज.

गोखलेकृत ' व्यायामशास्त्र ' ( १९०९ ) व ल. ना सप्रेकृत ' जुजुत्सु ' (१९१४) व ' मल्लखांब ' (१९१७) इत्यादि पुस्तकां-वरून शारीरिक शिक्षणविषयक वाङ्मयाकडेही आपलें दुर्लक्ष नाहीं असें आपणास ह्मणतां येईल व पां गो महाजनकृत ' समाधिशास्त्र ' ( १९१५ ) आणि पां ग. नामजोशीकृत ' प्राणायाम ' ( १९१७ ) ही दोन चांगलीं पुस्तकें याच सदरांत उल्लेखितां येतील.

मो. के दामलेकृत ' न्यायशास्त्र ', वि. ल. कवठेकरकृत ' अर्थशास्त्र ' गो. चि. भाटेकृत ' अर्थशास्त्राचीं ' मूलतत्वें ( १९१० ), वि. ना. मुतालिककृत ' हिन्दुस्थानची चलन-पद्धति ' ( १९१३ ), वा. ब. पटवर्धनकृत राजनीतीचीं मूलतत्त्वें ' ( १८९६ ), गो स. सरदेसाईकृत ' राजधर्म ' ( १८९० ), ना. ल. फडकेकृत ' राजकीय संस्था ' इत्यादि विविध पुस्तकें या कालां-तील वाङ्मयाच्या विविध शाखांची जोपासना करीत असल्याचें निदर्शनास आणितात तर ग. रा शर्माकृत ' आर्योत्सवप्रकाश ' ( १९१५ ), ऋग्वेदीकृत ' आर्यांच्या प्राचीन व अर्वाचीन सणांचा इतिहास ' ( १९१७ ) इत्यादि पुस्तकांवरून आपलें वाङ्मय या कालांत आपली पाऊलें कशीं कुणीकडे कोणीकडे उचलावयास लागले होतें हें कळून येतें

एवंच, प्रकरणारंभीं सूचित केल्याप्रमाणें सन १८८६ ते सन १९१७ हा काल अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा मध्यकालीन उत्तरार्ध ठरवितां येतो व तसा ठरत असल्यामुळें मध्यकालीनोत्तर वाङ्मय

पाहिजे तसें होऊं लागतें तसें निर्माण होऊं लागलें की नाहीं ? होऊं लागत असल्यास त्याची चिन्हें कोणतीं ? इत्यादि बाबतींचीं चर्चा पुढील लेखांत करूं.

परंतु या कालांत साहित्यपोषक अशा ज्या दुसऱ्या अनेक चळवळी घडल्या त्यांचाही येथें थोडक्यांत निर्देश करणें गैर होणार नाहीं. इतर गोष्टी बाजूस ठेविल्या तरी प्रत्यक्ष ग्रंथोत्तेजक अशा गोष्टीही या कालांत कांहीं थोड्या झाल्या नाहींत. उदाहरणार्थ, ग्रंथमाला, ग्रंथप्रकाश मंडळ्या व संशोधन संस्था स्थापन करणें, साहित्य संमेलनें भरविणें व साहित्य परिषद स्थापन करणें इत्यादि प्रकारच्या सामुदायिक प्रयत्नाची जाणीवही आमच्या ठिकाणीं याच कालांत झालेली दिसून येते.

अशा प्रकारच्या प्रयत्नांत पुण्याच्या डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीस अग्रस्थान दिलें पाहिजे. या संस्थेनें ग्रंथकारांना द्रव्यद्वारें उत्तेजन देऊन आणि पेशव्यांच्या रोजनिशा वगैरे ऐतिहासिक ग्रंथ प्रकाशित करून चांगली साहित्यसेवा केली आहे व पुणें शहरांतील रा. दाभोळकरांचा गहन विषयांवरील ग्रंथप्रकाशनाचा प्रयत्नही तितकाच जुना असून तो अद्यापि अव्याहत चालू आहे. धुळ्याच्या सत्कार्योत्तेजक सभेनें समर्थ व त्यांचा सांप्रदाय यांच्या संबंधानें ग्रंथ प्रकाशित करून आपल्या नांवाला साजेलशी कृति केली आहे. आणि भारत इतिहाससंशोधकमंडळ स्थापन झाल्यामुळें संशोधन कार्याबरोबर त्यानें ऐतिहासिक वाङ्मयभू तयार करण्याचें श्रेय घेतलें आहे. मुंबईच्या मराठी ग्रंथसंपादक मंडळीमार्फत याच कालांत बरेच

उपयुक्त ग्रंथ बाहेर पडले आहेत आणि याच शहरच्या मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीनेंही साहित्याच्या एका लोकप्रिय अंगाला सर्वथा वाहून घेऊन हें सदर चांगलेंच समृद्ध केलें आहे. बडोद्याच्या सद्विचारिणीसभेस जरी मधून मधून उत्कर्षापकर्षाचीं आंदोलनें मिळत असलीं तरी केवळ राजाश्रयानें चाललल्या तेथील राष्ट्रकथामाला, महाराष्ट्रग्रंथमाला, क्रीडामाला व श्रीसयाजीसाहित्यमाला इत्यादि ग्रंथमालांमार्फत या कालांत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांची संख्या शंभराहून कमी नाहीं असें आपणास ' बडोद्याचें मराठी साहित्य ' या पुस्तकावरून कळतें वाई येथील ' कादंबरी कल्पद्रुम ' ग्रंथकारास वाटो अगर न वाटो पण वाचकांस तरी कल्पद्रुम वाटतो आणि इंदूर येथील मराठी ग्रंथोत्तेजक मंडळानें ग्रंथकारांना द्रव्यद्वारें उत्तेजन देऊन या कालांत आपल्या नांवाचें सार्थक केलें आहे तसेंच निर्णयसागर प्रेस आर्यभूषणप्रेस, चित्रशाळाप्रेस, जगद्धितेच्छुप्रेस इत्यादि छापखान्यांमार्फत आणि नवीन किताबखाना, गोंधळेकर बुकडेपो, पानदार, गाडबोले, पाठक, गुर्जर, पुरंदरे इ. ग्रंथविक्रेत्यांमार्फतही या कालांत ग्रंथप्रकाशनाचें काम नेटानें चालू होतें आणि वृत्तपत्रांच्या व मासिकांच्या चिकाटीच्या प्रयत्नानें वाचकवर्ग काढून आमची वाचनाभिरुचीची वाढही म्हणण्यासारखी याच कालांत झाली आहे, असें ग्रंथालयें व वाचनालयें, यांच्या या कालांतील वाढीवरून म्हणतां यतें.

लेखांक ३.

## परिशिष्ट १.



**सन १८८६-१९१७ या कालांतील प्रमुख मासिक पुस्तकें.**

आनंद, सं. वासुदेव गोविंद आपटे पुणें १९०७

आयुर्वेद. सं. दामोदर कृष्ण केतकर, मुंबई १९१४

आर्यधर्मरहस्य, सं. काशिनाथ वामन लेले, वाई शके १८१७

आर्यभिषक्, सं. शंकर दाजीशास्त्री पदे, मुंबई १८८९

इतिहाससंग्रह, सं. दत्तात्रय बळवंत पारसनीस, मुंबई १९०७

उद्यान, सं. गणेश विठ्ठल कुळकर्णी मुंबई १९१०

उपनिषत्प्रकाश, सं. चिंतामण गंगाधर भानु, मुंबई.

ऐतिहासिक लेखसंग्रह, सं. वासुदेव वामनशास्त्री खरे, मिरज. १८९७

कादंबरीकल्पद्रुम, सं. अनंत केशव चितळे, वाई १९०१

काव्यरत्नावली, सं. नारायण नरसिंह फडणीस, जळगांव, १८८७

काव्यसंग्रह, सं. जनार्दन बाळाजी मोडक, मुंबई १८९०

कुंडलीविज्ञान, सं. विष्णु गोपाळ नवाथे मुंबई १९०२

केरळकोकिळ, सं. कृष्णाजी नारायण आठल्ये कोचीन, १८८७

खराप्रकार, सं. व्ही. एन्. भाव्ये, १८९१

खेडगडी, सं. पालवणकर मुंबई १९०९

ग्रंथमाला सं. विष्णु गोविंद विजापूरकर, कोल्हापूर १८९४

घटकाभर करमणूक, सं. हरी नारायण आपटे, मुंबई
चित्रमजजगत् अ. चित्रशाळाप्रेस, पुणें १९११
ज्योतिर्माला, सं. यशवंत केशव प्रधान, मुंबई
दीनमित्र, सं. गणपत सखाराम पाटील, पुणें ८८८
धर्मजागृति, स. राजाराम सखाराम भागवत, पुणें १९१४
नवयुग, सं. विठ्ठल जिवाजी नाडकर्णी, मुंबई १९१३
प्राचीप्रभा, सं. सरस्वतीबाइ वैद्य, गोवा १९०९
भगिनीसमाचार, सं. कृ. र. खिस्ती, पुणें १९१२
भारतसेवक, सं. रामचंद्र गणेश प्रधान, नाशिक १९१६
भाषांतर, स. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे पुणें १८९४
मकरद स. नरहर ना. पटवर्धन वाई
भिषग्विलास, सं. महादेव रामचद्र रानडे, सोलापूर १८९२
मनोरंजन आणि निबधचंद्रिका, सं. हरि नारायण आपटे, पुणें १८८६
मराठामित्र, स. गोपाळ दाजिबा दळवी, मुंबई १९०९
मराठी रंगभूमि, सं. शंकर बापूजी मुजुमदार, पुणें १९०८
मराठी शाळापत्रक, सं. वासुदेव गणेश जोशी, पुणें १८९०
महाराष्ट्र कवि, सं. विनायक लक्ष्मण भावे, ठाणें १९०३
मासिक मनोरंजन, सं. काशिनाथ रघुनाथ मित्र मुंबई १८९५
रामदास आणि रामदासी, प्र. सत्कार्योत्तेजक सभा, धुळें १९१५
लायब्ररी मिसलेनी, सं. जनार्दन सखाराम कुडाळकर, बडोदें, १९१३

लोकमित्र, सं. दत्तात्रय गोविंद सडेकर, खानपूर. १८९१

लोकशिक्षण, स. जनार्दन विनायक ओक पुणें, १९१२

व्यायाम, सं. धोंडो नारायण विद्वांस, बडोदें. १९१४

शेतकी आणि शेतकरी, सं. डॉ. मॅन, पुणें. १९१०

श्रुतिबोध, सं. अच्युत बळवंत कोल्हटकर व इतर, मुंबई १९०८

समालोचक, सं त्र्यंबक गुरुनाथ काळे, बेळगांव, १९०८

सरस्वति मंदिर (त्रैमासिक) सं महादेव केशव काळे, मुंबई १९०९

सुविचार समागम, प्र. भाऊ गोविंद सापकर, पुणें १८९८

ज्ञानमित्र, सं. नारायण बळवंत चव्हाण, पुणें १९११

ज्ञानांजन, सं जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर, मुंबई १९१३



लेखांक ४.

# उत्तरकाल.



( सन १९१७–१९२७ ).

महाराष्ट्राच्या बौद्धिक इतिहासाच्या दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं गेल्यास सन १९१७ पासूनच्या त्यांच्या कालास त्यापूर्वींच्या कोणत्याही कालखंडांत तोड मिळणार नाहीं, ही गोष्ट मुख्यत्वेंकरून त्याच्या या कालांतील वाङ्मयाचें सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केलें असतां कोणासही पटण्यासारखी आहे. या अल्प कालांतील त्याचें वाङ्मय व त्यापूर्वींचें शंभर वर्षांचें त्याचे वाङ्मय यांच्यामध्यें अनेक प्रकारची तफावत आहे आणि तें अनेक प्रकारें श्रेष्ठ आहे. इतर विचार जरी बाजूला ठेविला आणि नुसते ग्रंथ संख्येच्या दृष्टीनें विचार केला तरी आपण विस्मित होऊं. उदाहरणार्थ, मागील शंभर वर्षांच्या खटपटीनें बरीवाईट व लहानमोठीं मिळून दहा हजार पुस्तकें आम्हीं निर्माण करितों तर वरील दहा वर्षांच्या अल्पावधींत तीन हजार नवीन पुस्तकें आमच्या संग्रहीं पडतात ! अर्थात हें प्रमाण या कालांतील ग्रंथोत्पादनाविषयीं अपूर्व ठरतें आणि पुढील कालाविषयीं उमेद देतें.

परंतु संख्याधिक्य ही मुख्य कसोटी नव्हे आणि तेवढ्यावरूनच कोणत्याही वाङ्मयाची भरभराट सिद्ध होत नाहीं. ती सिद्ध

होण्यास तें दुसऱ्या अनेक प्रकारच्या कसोटीस लाविलें पाहिजे. तसेंच त्याच्या अंतरंगाप्रमाणें त्याचें बाह्यांगही पाहिलें पाहिजे. कारण वाङ्मयास आपण आत्म्याची उपमा दिली तर पुस्तकांस आपणांस त्याच्या देहाची उपमा द्यावी लागेल आणि ती दिली असतां देह आणि आत्मा यांच्या इतकाच वाङ्मय आणि ग्रंथ यांचा एकमेकाशीं निकट संबंध असलेला आपल्या निदर्शनास येईल. अर्थात वाङ्मयाविषयीं देहाप्रमाणें ग्रंथ हे आधारभूत होत आणि सुदैवानें त्यांच्या सुदृढतेविषयींच्या आमच्या प्राचीन कल्पनांत पूर्वीपेक्षां समाधानकारक फरक झालेलाही आपणांस या नवयुगांत आढळून येइल. उदाहरणार्थ, पंधरा वीस वर्षांपूर्वींचीं कसल्या तरी कागदावर छापून कसल्या तरी रीतीनें बांधून तयार होणारीं अल्पजीवीं पुस्तकें कोठें? आणि विषयानुरूप अशीं आतांचीं आमचीं सचित्र, आकर्षक, मजबूत बांधणींचीं, जाड्या मलपृष्ठांचीं, उत्तम कागदांचीं व चांगल्या छपाईचीं दीर्घजीवीं पुस्तकें कोठें? आतां कालमानानुसार ग्रंथकर्तृत्वाविषयींच्या आमच्या सर्वच कल्पना बदललेल्या आहेत. सचित्र असल्याशिवाय विदग्ध वाङ्मय छाप पाडीनासें झालें आहे आणि यामुळें चित्रकारासही काम मिळून त्यास आपल्या कलेंत कशी सुधारणा करतां येऊ लागली आहे, ही गोष्ट विशेषतः आमच्या अलीकडील सचित्र मासिक पुस्तकांवरून चांगलीं निदर्शनास येतें.

एक वेळ अशी होती (आणि ही वेळ फार दूरची नव्हती )

कीं, पुस्तकाचें मुखपृष्ठ उघडल्यावर वाचकास मुख्य मजकुराशिवाय काहींएक वाचावयास मिळावयाचें नाहीं परंतु आतां मलपृष्ठ, मुखपृष्ठ, अनुक्रमणिका, प्रस्तावना, उपोद्घात, शुद्धीपत्रक, चित्रांची सूचि, परिशिष्ट इत्यादि आवश्य सदरांनीं अलंकृत केल्याशिवाय पुस्तकांस शोभा येत नाहीं, इतकेंच नव्हें तर हल्लींच्या वाचकांचें त्यांवांचून समाधानही होत नाहीं या बाबतींत सुधारणा करण्यांस आतां जागाच राहिली नाहीं, अथवा मराठी ग्रंथकर्तृत्व उत्कर्षाच्या शिखरास पोहोंचलें आहे, असें आह्मी ह्मणत नाहीं. परंतु एवढें मात्र आह्मीं खात्रीनें सांगूं शकतों कीं, वरील कालखंडांतच आह्मांस तें शिखर दुरून कां होईना पण स्पष्टपणें दिसूं लागलें आहे. असो

तथापि, ग्रंथांविषयीं बाह्यांगाचा प्रश्न गौण आहे हें आह्मीं विसरत नाहीं आणि महाराष्ट्राच्या सुदैवानें त्याचें या कालांतील वाङ्मय व त्याचें अंतरंग त्याच्या बाह्यांगास साजसें नाहीं असेंही कोणास ह्मणतां येणार नाहीं असा आह्मांस दृढ विश्वास आहे.

वाङ्मयेतिहासदृष्ट्या मध्यकालीनोत्तर अर्वाचीन मराठी वाङ्मयास सन १९१७–१८ पासून सुरुवात होते व हीं सालें महाराष्ट्रीयांच्या दृष्टीनें फार महत्वाचीं आहेत. उदाहरणार्थ, महाराष्ट्राचा स्वातंत्र्यसूर्य सन १८१७–१८ सालीं अस्तास गेल्यामुळें जसें त्या दृष्टीनें तसेंच नेमक्या याच सुमारास अर्वाचीन मराठी वाङ्मयाची मुहूर्तमेढ रोवली गेली असल्यामुळें वाङ्मयाभिवृद्धीच्या

दृष्टीनेंही हीं सालें संस्मरणीय आहेत. आणि खरोखरीच सन १९१७–१८ सालीं आह्मीं महाराष्ट्राचे शतसांवत्सरिक वाङ्मय-श्राद्धही केलें आणि त्याबरोबरच महाराष्ट्राचा शतसांवत्सारिक वाङ्मयोत्साहही साजरा केला.

उदाहरणार्थ, या वेळच्या श्रीयुत न. चिं. केळकर यांच्या ' मराठे व इग्रज ' या ग्रंथानें जर आपण शतसांवत्सारिक वाङ्मय-श्राद्ध केल्यासारखें होईल तर नेमक्या याच सुमारास महाराष्ट्र ज्ञान-कोशमंडळातर्फे प्रसिद्ध झालेल्या महाराष्ट्रवाङ्मयसूचीस आपण शतसांवत्सरिक वाङ्मयोत्साहयोग्य ग्रंथ कां कल्पूं नये? असा आह्मांस प्रश्न करतां येईल. ऐतिहासिक चर्चेमुळें ' मराठे व इंग्रज ' या ग्रंथास जसें वाङ्मयश्राद्ध समजतां येतें तसें सबंध शतकांतील वाङ्मयाची मोजदाद करणाऱ्या अशा ग्रंथाच्या प्रकाशनामुळें वाङ्मयोत्साहाचें श्रेय निःसंशय आपल्या पदरीं पडतें. ' महाराष्ट्र वाङ्मयसूचि ' अथवा ' महाराष्ट्र ज्ञानकोश ' अशासारख्या ग्रंथांस जर आपणास वाङ्मयोत्साहाचे ग्रंथ समजतां येणार नाहीं. तर अशा योग्यतेचे ग्रंथ तरी कोणते? नुस्तें तशा प्रकारचें नांव धारण करणारे? सारांश, वाङ्मयश्राद्धाबरोबर वाङ्मयोत्साह करूनच आह्मीं उत्तर कालांत प्रवेश केला आहे.

तथापि ' महाराष्ट्रवाङ्मयसूचि ', महाराष्ट्रीयज्ञानकोश, २१ विभाग, ( सन १९२१–२८ ), भावेकृत ' कविकाव्यसूचि '

( १९२४ ) इ. ग्रंथ कितीही उपयुक्त असले तरी ते संदर्भग्रंथ ठरतील आणि तेवढ्यावरून ह्मणजे केवळ अशा ग्रंथांवरून या कालांतील प्रत्यक्ष वाङ्मयाभिवृद्धि निदर्शक ग्रंथांची यथार्थ कल्पना होऊं शकत नाहीं. तीं होण्यासाठीं आह्मीं या कालांतील रा. भि. जोशीकृत ' मराठी भाषेची घटना ' ( १९१९ ), कुळकर्णीकृत ' भाषाशास्त्र आणि मराठी भाषा ' (१९२५) व वि. का. राजवाडे-कृत ' सस्कृत भाषेचा उलगडा ' यासारखे भाषाशास्त्र विषयक ग्रथ आणि वि. ल. भावेकृत ' महाराष्ट्र सारस्वत ' ( १९१९ ), रा. भि. जोशीकृत ' मराठी वाङ्मय विवेचन ' ( १९२२ ), द. वा. पोतदार-कृत ' मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ' ( १९३२ ), चिं. वि. वैद्यकृत ' संस्कृत वाङ्मयाचा त्रोटक इतिहास ' ( १९२२ ), देशपांडेकृत ' महानुभवीय मराठी वाङ्मय ' ( १९२५ ) व ग. रं. दंडवतेकृत ' कादंबरीची गोष्ट ' ( १९२७ ) इत्यादि वाङ्मयेतिहासात्मक ग्रंथ रुजू करूं आणि मग असलें वाङ्मय उत्तरकालीन एका दशकांत तयार होणें अर्वाचीन मराठी वाङ्मयाच्या उत्कर्षाचें द्योतक कां समजलें जाऊं नये असें विचारूं शकूं.

वरील ग्रंथाप्रमाणें पुढील पुस्तकपरीक्षणें व चर्चात्मक ग्रंथ आमचा मराठीचा व्यासंग या कालांत कसा वाढत आहे हें दाखवूं शकतील.

आगाशे—ज्ञानेश्वरी काव्यांग ( १९२५ ), गोविंदसुत—मराठी साधुकवि विरुद्ध प्रो. शि. म. परांजपे ( १९२६ ), जोशी—रघुनाथ

पंडितकृत नल दमयंती स्वयंवराख्यान (१९१९), देव-श्रीमत् दासबोधाचे कर्ते दुसरे कोण असणार? (१९२१) बनहट्टी मयुर काव्य विवेचन (१९२६), भावे-वाल्मिकि रामायण परीक्षण (१९२१), रानडे संतवचनामृत (१९२७), पटवर्धन-तुका रामाच्या अभंगाची चर्चा, राजवाडे-राधामाधव विलास चंपू (१९२२), कानविंदे-संगीत मानापमान टीका (१९२०), घारपुरे-भावबंधनावरील टीका (१९२७), देशपांडे-हरिभाऊ आपटे यांच्या आठवणी व कादंबऱ्या (१९२४, भावे-गडकऱ्यांचा विनोद, जोशी-गडकरी (१९२४), रहाळकर-केशवसुत आणि त्यांची कविता (१९२०), वर्तक-तुतारीचे पडसाद (१९२६)

निबंध, लेख व पत्रें इत्यादि प्रकारच्या वाङ्मयाचा निर्देश याच सदरांत करावा लागतो व या सदरांत आठल्ये-कोकिळाचे बोल (१९२६), आगरकर-निबंधसंग्रह भाग २ रा (१९१७), केळकर गिरजाबाई पुष्पहार (१९२१), केळकर न. चिं-लेख संग्रह (१९२५), चाफेकर निवडक लेख (१९२४), चाफेकर-गच्चीवरील गप्पा (१९२६) पांगारकर-मुमुक्षूंतील निवडक निबंध (१९२४), परांजपे-साहित्य संग्रह (१९२२), स्वराज्यांतील निवडक निबंध (१९ ३), आपटे-अरविंदबाबूंची आपल्या पत्नीस पत्रें (१९१९), कमळाबाई किबे-इंदिरेस पत्रें (१९२४) वाड-पद्माकरास पत्रें (१९२०), वैद्य-कमळेची पत्रें वैशंपायन-महात्मा गांधींची पत्रें (१९२२) इ. लहानमोठीं दहा पंधरा पुस्तकें य

कालांत तयार झालीं आहेत, आणि विनोदात्मक वाङ्मयांत कामतेकर तीन शहाणे ( १९२६ ), कोठीवान–सचित्र विनोदी नाद ( १९२६ ), गडकरी–रिकामपणाची कामगिरी ( १९२१ ), बेहेरे–बोचट बाण ( १९२२ ), लिमये–विनोदी लेख संग्रह लिमये–विनोदसागर ( १९२६ ) वगैरे पुस्तकें प्रसिद्ध होऊन संपूर्ण बाळकराम ( १९२५ ) या ग्रंथानें गडकऱ्यांचे सर्व विनोदी लेख एकत्र वाचावयास मिळण्याची सोय झाली आहे.

वरील सर्वसाधारण ग्रथांनंतर या कालांतील मराठी वाङ्मयाचा आह्मीं पुढील प्रमाणें आढावा रुजू करतो

## कादंबऱ्या.

वाङ्मयांत स्थूलपणें ' कादंबरी हा स्वतंत्र विषय कल्पिल्यानंतर इतर अनेक शाखा प्रमाणे या विषयाचेही सामाजिक, ऐतिहासिक, अद्भुत, पौराणिक, इ. ढोकळ पोटविभाग करावे लागतात. परंतु या चार पांच पोटविभागावर आतां भागेनासें झालेंआहे. कथावाङ्मच्या कलीकडच्या वाढीस आणखी पोटविभागांची आवश्कता आहे. उदाहरणार्थ कथावाङ्मयातून सामाजिक कादंबऱ्या एकीकडे काढल्या तरी त्यांत पुन्हां शैक्षणिक, नीतिपर, उद्बोधक, नवविचार प्रवर्तक, इ. अनेक प्रकारचे पोटविभाग पाडणें आवश्य आहे इतक्या विविधप्रकाची रचना आज कथावाङ्मयांत होत आहे.

उदाहरणार्थ, काटेरी बाजार, जगाचा बाजार, स्वप्नमयआयुष्य, व्यापारीसृष्टी, संसार असा आहे. इत्यादि कादंबऱ्या सर्वसाधारण स्वरुपाच्या समजल्या जातील तर लोकमित्र, समर्थ शिष्य, श्यामसुंदर, नटसम्राट, आनाथांचा नाथ, इत्यादि कादंबऱ्यांत एखाद्या भूमिकेस प्रमुख करून त्याच्यावर संबंध कादंबरीची रचना केलेली आढळेल. न घडणारी गोष्ट, वैभवाच्या कोंदणांत, पहाटे पूर्वीचा काळोख, जन्मठेप, दुटप्पी कीं दुहेरी, बंधनाच्या पलीकडे, विंध्याचल, कुलाब्याची दांडी, परागंदा, भविष्यकाळ, मला काय त्याचें, इत्यादि कादंबऱ्या विशिष्ट ध्येयपरिप्लुत समजल्या जातील, तर ओकांच्या शिरस्तेदारांनंतर या अवधींत डाक्टर, कारकून, शिपाई, मजूर, मास्तरीणकाकू, घरजावई, इत्यादि कादंऱ्यात समाजातील विशिष्ट भूमिकांचें जीवत चित्रित करण्यांत आलें असल्याचें आढळून येईल.

सुखाचा मूलमंत्र, राष्ट्रीय शिक्षणाची गोड फळें, इत्यादि कादंबऱ्या उद्बोधक असून बाईलवेडा, बहकलेली तरुणी, विलासीकांता, इत्यादि कादंबऱ्यांत तसल्याच प्रकारचे जीवन रेखाटण्यात आलें आहे.

' माझें बाळ ते ' या सारख्या पुस्तकांतून विवाहित अवस्थाच स्त्रियांस विहित असल्याचे प्रतिपादिलें आहे व ' पुनर्विवाह कीं प्रथम विवाह ' यांत प्रौढविवाहचा निषेध केला आहें.

वरील स्वतंत्र कादंबऱ्या शिवाय या कालांत सुमारें ८० कादंबऱ्या इंग्रजीवरून व बंगालीवरून मराठींत आल्या आहेत व त्यापैकी बऱ्याच लोकप्रिय आहेत. दातार, भिडे, जोशी, यांच्या इंग्रजींतून आणि गुर्जर व कुळकर्णी यांच्या बंगालीवरून आल्या आहेत.

## ऐतिहासिक कादंबऱ्या

या सदरांत पुढील कादंबऱ्या उल्लेखनीय आहेत. आपटे, ह. ना. कालकूट. ( १९२६ ). केवळस्वराज्यासाठीं ( १९१८ ) मध्यान्ह ( १९२७ ), म्हैसुरचा वाघ ( १९२५ ), सूर्यग्रहण ( १९१९ ), सूर्योदय ( १९१७ ), आपटे, ना. ह. रजपुतांचा भीष्म (१९१९), कोल्हाटकर, अ. ब. इंग्रजांचा पराभव ( १९२६ ), जोशी एल, एन्, अस्तोदय ( १९२१ ), दामले, सी. के. दोनशे वर्षांपूर्वी ( १९ ७ ), वसईचे रणसग्राम ( १९२५ ), नाथमाधव–स्वराज्याचा श्रीगणेशा(१९२२) स्वराज्याचा कारभार (१९२३),स्वराज्याची घटना (१९२२), स्वराज्याची स्थापना (१९२२), स्वराज्यावरील संकट (१९२४) स्वराज्याचें परिवर्तन (१९२५), पांगळ ता ने ब्रम्हहत्या ( नंदकुमारवध ), ( १९२४ ), बेहरे ना. के. हिंदु कोण ? (१९१९) भानु. वि गं शृंगेरीची लक्ष्मी (१९२४), भिडे, वि. बा. केंजळगडचा कबजा ( १९२६ ). कोलरइचा किल्लेदार (१९२५), गणवंत गडाचा गडकरी ( १९२६ ), छोटा शिलेदार ( १९२६ ), पण तिसरा कोण ? ( १९१६ ) हडकर, बा. जी बंगसूर्यास्त. ( १९१८ ) हडप, वि. वा पेशवाइचें पुण्याहवाचन ( १९२६ ), पेशवाईचें ध्रुवदर्शन ( १९२७ ), पेशवाईची प्राणप्रतिष्ठा (१९२७) पेशवाईचा शुभशकुन ( १९२७ ),

## दोषाविष्कारक ( डिटेक्टिव्ह ) कादंबऱ्यात

फरंदीकर–राजनैतिक कारस्थान ( १९२६ ), देसाई प स.

मर्दानी सौंदर्य ( १९२५ ) नाथमाधव–रायक्लब अथवा सोनेरी टोळी ( १९२४ ), भिडे बी. जी. रत्नखचित सिंह ( १९२१ ), त्रिवेणी ( १९२० ) इत्यादि कादंबऱ्या आणि अद्भुत अथवा रोमँटिक कादंबऱ्यांत, भिडे शांताबाई कौमुदी, देसाई जानकीबाई–पतिव्रताची कसोटी, भिडे बी. जी. रहस्यजाळ, अज्ञात, अजब कारस्थान, पारसनीस, सुवर्णयुग, देसाई, वनदेवता इ कादंबऱ्या उल्लेखनीय आहेत

## गोष्टी.

सन १९१७ पर्यंत लहानमोठीं अशीं सुमारें ४०० गोष्टींचीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आणि तेव्हांपासूनच्या या अल्पावधींतही २०० गोष्टी प्रसिद्ध झाल्या आहेत. गोष्टींनही ऐतिहासिक समाजिक, विनादी व मुलांसाठीं असे भेद पाडतां येण्यासारखे असून अलीकडे गोष्टींची निवड व त्या लिहिण्याचा मार्ग यांत समाधानकारक फरक पडत चालला आहे. कादंबऱ्या इतकीच लहान लहान गोष्टींची मागणी आहे व मागणीप्रमाणें तिचा पुरवठाही वाढत आहे.

कथागुच्छ, कथाकलाप, कथापंचक, कथासप्तक व चार बंगाली गोष्टी, दहा दलें अथवा यमुना व दुसऱ्या गोष्टी, कथेकरी माई व इतर गोष्टी, समाधि व इतर सहा गोष्टी, ज्ञानसिंधु व इतर लघुकथा, संशयाचें जाळें व इतर गोष्टी, मनोरंजक गोष्टी, विनोदी गोष्टी, प्रचलीत म्हणींवरील सुबोध गोष्टी, नंदनवन, समाजचित्रें, इ. प्रकारचीं संग्रहात्मक बरींच पुस्तकें या कालांत तयार झालीं आहेत.

लघुकथाही पुष्कळ प्रसिद्ध झाल्या असून एक, दीड, दोन, तीन व चारआणेमाळेंत प्रसिद्ध होणाऱ्या लघुकथांचें जाळें व त्याचा वाचकवर्ग वाढत आहे.

## नाटकें

वाङ्मयांत नाटकांचा दर्जा कादंबऱ्यांइतकाच महत्वाचा आहे आणि प्रक्षिप्त कालापुरतें घेतलें तरी या कालांत मराठी नाट्यसृष्टींत पुष्कळ परिवर्तन घडून आलें असून, मध्यकालीन नाटकारांकडून पहिल्याच दमानें नाट्यवाङ्मयाची व नाट्यकलेची सेवा होत असतां नवीन नवीन नाटककार उदयास येत आहेत

प्रथमकालांत ज्याप्रमाणें ज. वि. किर्तने, वि. मो. महाजनी, वा. बा. केळकर, व किरात आणि मध्यकालांत जसे वा वा. खरे, ब. पां किर्लोस्कर, श्री. कृ. कोल्हटकर, गो. ब देवल, न. चिं. केळकर व कृ. प्र. खाडिलकर इत्यादि नाटककारांनीं नाट्यवाङ्मय समृद्ध केलें तसें उत्तरकालांत रा. ग. गडकरी, भा. वि. वरेरकर, दा. वि. नेवाळकर, य ना टिपणीस म. ना जोशी व शं. प. जोशी, ना रा बामणगांवकर, कृ. ह. दीक्षित, वीर वामनराव, इत्यादि नाटककार नाट्यकलेची उत्कृष्ट सेवा करीत असलेले दिसतात इतकेंच नव्हे तर नाथमाधव, हडप, गुर्जर यांच्यासारख्या कादंबरीकारांसही या कालांत नाट्यकलेनें मोहनी घातलेली दिसते

कादंबऱ्याप्रमाणेंच नाटकांचेही पौराणिक, ऐतिहासिक. सामाजिक, काल्पनिक, विनोदात्मक ऊर्फ हास्यरसप्रधान, संतपर व देश-

भक्तिप्रवर्तक असे अनेक पोटविभाग करावे लागतात व त्याचें असें वर्गीकरण करूनच आम्हांस या कालांत प्रसिद्ध झालेल्या नाटकांची पुढीलप्रमाणें यादी रूजू करतां येते.

## पौराणिक.

केळकर, न.चिं. कृष्णार्जुनयुद्ध (१९२५),वीरविडंबन(१९१९), खाडिलकर कृ. प्र. द्रौपदी (१९२० ), मेनका ( १९२६ ), सवतीमत्सर ( १९२७ ), गुर्जर, वि. सी. नंदकुमार ( १९२५ ), टेंबे, गो पटवर्धन (१९२४ ), दीक्षित, कृ. ह. औदार्याचा डंका ( १९२२ ), वामणगांवकर, ना. रा. आत्मतेज ( १९२० ), धनुर्भंग ( १९१७ ) लेले, ल. ग. बिल्वमंगल ( १९२३ ), शुक्ल, एस. प. सिंहाचा छावा ( १९२७ )

## ऐतिहासिक.

कृ. ना. अस्नोडकर, अग्रहार ( १९२६ ), औंधकर, व्ही एच. बेबंदशाही ( १९२४ ), कोल्हटकर श्री. कृ शिवपाविव्य नाटक ( १९२५ ), खेर वा. वा शिवसंभव ( १९१९ ), गडकरी रा. ग. राजसंन्यास (१९२२), गुते, श . गो. हिरा हरपला (१९२१), टिपनीस य. ना. शहाशिवाजी ( १९२२ ), शिकाकट्यार (१९१७), दीक्षित कृ. ह. यक्षिणीची कांडी (१९२०) वरेरकर भा वि. करीन तीं पूर्व ( १९ २७ ), हडप, वि. वा. राजसंसार ( १९२३ )

## सामाजिक.

अस्नोडकर कृ. ना. दुरंगी दुनिया ( १९२० ), कुळकर्णी, एन. व्ही. माइसाहेब (१९२२), कोल्हटकर श्री. कृ. सं. सहधर्मचारिणी ( १९१८ ), सं. जन्मरहस्य ( १९१८ ), गडकरी एकच प्याला (१९१९ ), पुण्यप्रभाव ( १९१७ ), सं. भावबंधन ( १९१० ), जोशी शं. प. खडाष्टक ( १९२७ ) मायेचा पूत ( १९२१ ), वरेरकर भा. वि. तुरुंगाच्या दारांत ( १९ ३ ), सत्तेचे गुलाम ( १९२२ ), हाच मुलाचा बाप ( १९१७ ),

## काल्पनिक.

कारखानीस, त्र्यं. सी. राजाचें बंड ( १९२४ ), खरे, वा. वा. सं. उग्रमंगळ ( १९२२ ), सं. कृष्णकांचन (१९१८ ), सं. चित्रवंचना (१९१७), गुर्जर, वि. सि. राजलक्ष्मी (१९२१), टिपनीस, य. ना. सं. आशा–निराशा ( १९२३ ), चंद्रग्रहण ( १९१८ ), राजरंजन ( १९२६ ),

## विनोदात्मक

जोशी, म. ना–आनंद ( १९२४ ), करमणूक ( १९१७ ), मनोरंजन ( १९१६ ), हास्यतरंग ( १९२७), स्थानिक स्वराज्य ( १९२५ ), गडकरी रा. ग. वेड्यांचा–बाजार ( १९२३ ),

**संतपर**—केळकर, न. चिं. संत भानुदास ( १०.१९ ).

**देशभक्तिप्रवर्तक**—जोशी, वा. रणदुंदुभि ( १०२७ )

याशिवाय इंग्रजी, बंगाली इ. परभाषांतून आलेल्या नाटकांत रामचंद्रानुज—आत्मविश्वास ( १९२१ ). बर्वे, अ. वा. सैतान नाटक ( १९१७ ), गोखले एन आर—ताराबाई ( १९१७ ), हेमचंद्र, चित्रांगदा ( १९२६ ), किरात-मुक्तधारा ( १९२६ ), इ नाटकांची नोंध घेतां येते आणि फार्सांत बायको हरवली ( १९२५ ), वरेरकर, भा वि करग्रहण ( १९२७ ), हडप, वि. वा. लोकसेवेचा ओनाम ( १९२६ ), वगैरे दोनचार फार्स या कालांत तयार झालेले आढळतात.

वरील सात आठ सदराकडे पाहिलें असतां असें दिसतें कीं, पाहिल्या चार सदरांत या अवधींत सारखीच भर पडली असून. त्यांतील अमूकानें अमूक सदरावर सरशी केली आहे असें म्हणण्यास जागा नाहीं. पांचव्या सदरानें मात्र चांगलीच भरारी मारिली असून सहाव्या व सातव्या सदरांत एका एका पण उत्कृष्ट नाटकांची भर पडली आहे.

## कविता.

सन १९१७ ते सन १९२७ हा काल कांहीं फार नाहीं. अवधीं दहा वर्षे पण या दहाच वर्षांतील काव्यवाङ्मयाच्या चलतीकडे पाहिलें असतां त्यास त्या पूर्वीच्या कोणत्याही कालखंडांत असा

सुकाळ लाभलेला आढळत नाहीं. अध्यात्मिक आणि परमार्थपर कविता तर आम्हीं सोडूनच देतों. पण ती सोडूनही या अवधींत शंभर दिडशें सुंदर काव्यग्रंथांची मराठी वाङ्मयांत भर पडलेली पाहून आम्हांस आनद वाटतो. पद्धतशीर काव्यचर्चा याच कालांत झाली असून, गोविंदाग्रजमंडळ, रविकिरणमंडळ यासारखीं कविमंडळें केवळ काव्यवाङ्मयप्रकाशनार्थ या कालांत निर्मण झालीं आहेत. कविता-देवीची सेवा करणारांचीं संख्या वाढत आहे व मध्यकालीनोत्तर कालांतील अर्वाचीन कवींचा बोज कायम असतां केशवकुमार, सरस्वतिकुमार, पेंढारकर, गिरीश, निशिगंध, नेरूरकर, माधवज्युलियन, वसंतविहार, विरकुड इ. नवीन नवीन कवींच्या कृति मराठी वाचकांस रंजवीत आहेत. कविसंमेलनें पाहिल्याच उत्साहानें भरत आहेत आणि काव्याची आवड महाराष्ट्र वाचकांत अधिकाधिक दृढ होत आहे.

या कालांतील सबंध काव्यवाङ्मयाचें परिक्षण करणें अनवश्यक आहे. परंतु त्यांतील सुमारें शंभर ग्रंथांचें पुढीलप्रमाणें वर्गीकरणात्मक टांचण देऊन या कालांतील काव्यवाङ्मयाची भरभराट कशी झाली आहे हें आम्हीं दाखवूं शकतों. उदाहरणार्थ,

**संग्रहात्मक** काव्यांत पुढील काव्यें निर्देशनीय आहेत:—

आधिकारी, गो. गो. सुनीतावली ( १९१४ ), आपटे, द. अ. हृदयतरंग ( १९२० ), करंदीकर, बी. पी. सुगंध प्रश्नपेटिका

(१९१९ ), करमरकर एस. एस पद्मराग ( १९२२, कर्णिक लक्ष्मीबाई अभाग्याचे अश्रु ( १९२० ), कानिटकर गो. वा. गीतांजली ( १९१८), केळकर. डी जी. अज्ञातनाद ( १९०४ ), न. चिं. काव्योपहार ( १९२७ ), कोल्हटकर श्री. कृ गीतोपहार ( १९२२ ), खापर्डे ब. ग काव्यकांतरांतील फुलें ( १९२५ ), गडकरी, रा ग. वाग्वैजयंती ( १९२१ ) , गद्रे, डी. व्ही काव्य विहार ( १९२३ ), गोखले, एच. एस. कांहीं तरी ( १९२५ ), गुणे-कुंवलयानंदाची गाणीं ( १९१७ ), घाटे, द कों. कविता ( १९२२ ), जनार्दनजनकज ललितलहरी ( १९२६ ), टिळक ना. वा. कविता ( १९३० ), टेकाडे, आ. कृ आनंदगीत ( १९२०–२४ ), टेंभुर्णीकर, के एल. बकुलांची फुलें ( १९२ ), तांबे, भा. रा. कविता(१९२०–२७),तिवारी, दु आ अभंगमाळ ( १९२५ ), काव्यतुषार ( १९२३ ) काव्यरत्नमाला (१९२७) दामले गं गो. पद्यरत्नांजली, नंदुरबारकर, पां. रा उत्साह-लहरी, पेंढारकर, य. यशवंती १९२१ बाक्ळे, गो अ सुमनांजली ( १९१८ ), बापट सारजाबाई सचित्र काव्यकुसुमें ( १९२३ ), बालकवि रत्नाकर ( १९२४–२६ ), भिडे वि. वा. दशरूपक इ. ( १९२७ ) गजेंद्रमोक्ष इ. ( १९२७ ), महार छूमाट कुसुमसंचय (१९२४), माधवानुज कविता (१९२४), मोगरे ग. रा. मोगऱ्याचीं फुलें गुच्छ ३–५ ( १९१७–२० ), यशवंत आणि गिरीश वीणाझंकार ( १९२२ ), रविकिरणमंडळ

प्रभा-( १९२७ ), रेंदाळकर, ए. पां. कविता ( १९२४ ), लक्ष्मीवर-स्वैरालाप ( १९२७ ), लेंभे, वि. भ. कविता (१९२४), वझे, एल. जी. काव्यहार(१९२७), विनायक-कविता (१९२०), वाड, वि. ना.-काव्याकुसुमोद्यान ( १९१८-२४ ), शुक्ल, स. कुमुद बांधव ( १९२७ ), सरस्वतिकुमार-कविता ( १९२२ ), साधुदास-निर्माल्यसंग्रह ( १९१८-२४ ), सोनाळकर, के. म.-कमळपराग ( १९२३ ), हिंगणेकर, जी. आर-काव्यकुंज ( १९२४ ), इ. ५० संग्रहात्मक काव्यग्रंथाखेरीज पुढीलप्रमाणें २० अशाच प्रकारचे पण निरानिराळ्या कवींच्या कृति एका पुस्तकांत संग्रह करणारे ग्रंथ उपलब्ध आहेत.

अभिनव काव्यमाला भा. ४-५ ( १९२२-२३ ), अभिनवकाव्य कुसुममाला ( १९२४ ) कवनगुच्छ ( १९२१ ), कवनहार ( १९२५ ), काव्यकुंज ( १९२६ ), काव्यकौमुदी ( १९२६ ), काव्य मकरंद ( १९२४ ), कुंदाच्या कळ्या ( १९२६ ), झेंडूची फुलें ( १९२९ ), धवलगिरी (१९२४), पद्ममाणिमाला ( १९२६ ), पद्मदल ( १९२७ ), पिंपळपान ( १९२६ ), पुष्करणी ( १९२६ ), पुष्पपराग ( १९१९ ), पुष्पवाटिका ( १९२५ ), फुलोरा ( १९२७ ), महाराष्ट्र शारदा ( १९२६ ), वेणुनाद ( १९२४ ), सुमनगुच्छ ( १९२३ ),

**खंड काव्यें.** अर्वाचीन मराठी काव्यवाङ्मयांत खंडकाव्यांच्या अभावाची आजपर्यंत फार ओरड होती. ती या कालांत प्रसिद्ध

झालेल्या खंडकाव्यांनीं बरीच कमी व्हावयास हवी, असें म्हणावयास हरकत नाहीं. या कालांत अनेक खंडकाव्यें प्रसिद्ध झालीं आहेत. आणि त्यांचा प्रचार अलीकडे तर पुष्कळच मोठ्या प्रमाणावर होत आहे. सन १९१७–१८ पासून सन १९२७–२८ पर्यंत घेतलें तरी या अवधींत अधिकारी गो. गो. बीजेची कोर (१९२६) आपटे, द. अ. पुण्याची पर्वती ( १९२० ), आपटे, जी. एल्. सरलाबाला ( १९२६ ), आपटे, गो. स चहाकाव्य (१९१९), खापर्डे, ब. ग. काव्यकांतर ( १९१८ ). गिरीश–अभागी कमल ( १९२३ ); कला ( १९२६ ); अंबराई ( १९२८ ), गोऱ्हे, चं. शि. रंगराव हर्षे व चिंतोपंत उदास ( १९२३ ), तिवारी दु आ. चंडीशतक ( १९२७ ); झांशीची संग्रामदेवता (१९२१) मनोहर–लीला ( १९२० ); मान्यांची यमुना ( १९२७ ); प्रसन्नराघा ( १९२० ), राधामाधव ( १९२१ ), दाते, आर. व्ही. पुण्याचा शनिवारवाडा ( १९२० ), नाथ निफाडकर, सोनपत–पानपत, ( १९२३ ), सतीचा शाप ( १९२६ ) निशिगंध–ज्योत्स्नागीत ( १९२१ ), नेऱ्हूरकर, वि. कृ. काविची-भेट ( १९२७ ); पर्वती ( १९२४ ), पाटील, मु. शोटजीप्रताप ( १९२४ ), पेंढारकर, य. राधाविलाप, माधवानुज–वेणूरव ( १९१६ ), माधव जुलियन–विरहतरंग ( १९२६ ) वसंत विहार–आर्यभूमीचा अमीर ( १९२१ ); महिषासुरमथन–

( अफझुलखानवध ) ( १९२९ ); संजयप्रबोधन ( १९२५ ) विजनवासी—कमला ( १९२२ ), विरकुड, डी. आर. कर्तव्यवीर बाजी प्रभु देशपांडे ( १९१९ ); विरकुड—कर्मवीर तानाजी मालुसरे ( १९१८ ), सहस्त्रबुद्धे, सी. आर. पन्हाळ गडचा किल्लेदार ( १९१९ ) व हिंगणेकर, जी. आर. दरूखनचा वीर ( १९२१ ) इ. २०–२५ लहानमोठीं खंडकाव्यें प्रसिद्ध झालीं आहेत.

या शिवाय देशभक्ति प्रवर्तक १०, गोरक्षणाविषयक १०, व्यसनमोचन ५ व इतर प्रकारचीही बरीच कविता या कालांत निर्माण झाली आहे. एकट्या लो. टिळकांवरच या दहा वर्षांत २० काव्यग्रंथ तयार झाले आहेत !

**पोवाडे.** पोवाड्यांसही या कालांत अपूर्व महत्व आलें आहे असें या कालांत प्रसिद्ध झालेल्या अनेक पोवाड्यांवरून दिसून येतें. पोवाड्यांचा प्रचार वाढत आहे असें म्हणण्यापेक्षां महाराष्ट्रीयास जात्याच पोवाडे आवडतात, असें म्हणणें जास्त सयुक्तिक दिसतें. आणि अशा स्थितींत पोवाडयांचें पुनरुज्जीवन करण्यास या कालीं कित्येक सुशिक्षित पदवीधरांनीही कंबर बांधावी हें सर्वस्वीं उचित आहे. तथापि, पोवाड्याविषयीं आपण एक गोष्ट आपण लक्षांत ठेविली पाहिजे. ती ही कीं, पोवाडे

मुख्यत्वेंकरून क्रांतिकारकांवर अथवा क्रांतिकारक प्रसंगावर होत असतात. अर्थात त्यांची निपज तशा व्यक्तीवर किंवा प्रसंगावर अवलंबून असल्यामुळें देशांत तशीं माणसें निर्माण झाल्याखेरीज अथवा तसे प्रसंग घडल्याखेरीज पोवाडे बनत नाहींत आणि बनले तरी त्यांनां महत्व नाहीं. असो. या कालांत पुढील प्रमाणें २० पोवाडे प्रसिद्ध झाले आहेत.

अज्ञानदास—अफझलखानाचा पोवाडा ( १९२१ ), खाडिलकर पी. डी.—लो. टिळक यांचा पोवाडा ( १९२९ ), वीररत्न तानाजीराव मालुसरे याचा पोवाडा ( १९२६ ), वीररत्न प्रभावती झांशीची सती लक्ष्मीबाई हिचा पोवाडा ( १९२७ ), वीरमणि बाजी प्रभु देशपांडे यांचा पोवाडा ( १९२७ ), गडकरी रा. ग.—पानपतचा फटका ( १९१९ ), गोखले पी. व्ही.—नरवीर तानाजी मालुसरे यांचा पोवाडा ( १९२५ ) गोखले जी. व्ही.—रायगड समाधीचा पोवाडा ( १९२६ ), जयंतकुमार—कर्मवीर महात्मा गांधी यांचा पोवाडा ( १९२८ ), दळवी—ऐतिहासिक पोवाडे ( १९२७ ), दाभाडे—आग्र्याचे अटकेवरील पोवाडा ( १९२९ ), धुपकर—लो. टिळकांचा पोवाडा ( १९२२ ), निंबगांवकर—लोकमान्यांचा पोवाडा ( १९२० ), प्रतापाग्रज—श्री शिवछत्रपतींचा पोवाडा ( १९२३ ), मोरे—शिवशार्दूल ( १९२८ ), राक्षे—झांशी संस्थानच्या महाराणी लक्ष्मीबाई यांचा

पोवाडा ( १९२३ ), वसंतमित्र—मुळशीचा पोवाडा ( १९२२ ) शारदासुत—श्रीसमर्थांचा पोवाडा ( १९२६ ), साधुदास—महायुद्धाचा पोवाडा (१९१८) साठ्ये—सिंहगडचा पोवाडा (१९२८), हाटकर—नानाशंकरशेट यांचा पोवाडा ( १९१७ ), आणि

स्त्रियोपयोगी काव्य वाङ्मयांत आपटे, गंगूबाई—कवनगुच्छ ( १९०७ ), कुळकर्णी, जानकीबाई—उपयुक्त स्त्रीगीत ( १९२१ ), कोल्हाटकर, उमाबाई—वटसावित्रींचे आख्यान ( १२२९ ), कोल्हाटकर, लक्ष्मीबाई—स्त्रियांनीं ह्मणण्याचीं गाणीं

( १९१७ ) खरे, सत्यभामाबाई—अभिनव स्त्रीगीत ( १९२० ), गाडगीळ, कृष्णाबाई—गांधारी गर्वहरण ( १९२६ ), मानसगीत सरोवर भाग १–२ ( १९१९ ), गुर्जर, द्वारकाबाई—गृहिणी गीतामृत ( १९२४ ), दातार, बाळूताई—सावित्री चरित्र (१९१८) देसाई, अन्नपूर्णाबाई—स्त्रीगीतरत्नमंजूषा ( १९२८ ), नातू, इंदिराबाई—स्त्रियांचीं गाणीं ( १९२३ ), पाटील नर्मदाबाई—मानसगीत रत्नमाला ( १९२७ ), बापट सारजाबाई—कीर्तनसुधा ( १९१७) हलव्याचा हार ( १९१८ ), वैद्य, सीताबाई—भक्तिगीत (१९२२) सहस्रबुद्धे, उमाबाई—स्त्रीगीत लहरी ( १९२४ ), साठे, सरस्वतिबाई स्त्रीगीत माळा ( १९२९ ), साठे, यमुनाबाई—कार्तिक महात्म्य ( १९२९ ), साने, यमुनाबाई—स्त्रियाकरितां भक्तिपर

गाणीं ( १९२० ), साने, लक्ष्मीबाई–गीतसुमनहार, सावित्रीचें गाणें (१९२४)इ. वीस पंचवीस नवीन पुस्तकांची भर या अवधींत महाराष्ट्र महिलाकडून पडावी हे त्यांस भूषणावह आहे.

## चरित्रें

चरित्रशाखेविषयीचीही आमची पूर्वीची अनास्था याच कालांत नाहींशी होऊन, परकीयाचें पाहून ह्मणा अथवा आमच्यातील कित्येकांच्या सतत उपदेशामुळें ह्मणा, या कालांत आमच्या कित्येक चांगल्या चांगल्या लेखकांनीं या शाखेकडे बरेंच लक्ष दिल्यामुळें थोडींथोडकीं नाहीं तर सुमारें शंभर सुंदर चरित्रग्रंथ त्यांना या अल्पावधींत निर्माण करतां आले आहेत.

चरित्रग्रंथांचेही पोट विभाग पाडितां येतात व पोटविभाग पाडिले असतां या कालांत

### ग्रंथकार व कवि

या सदरांत आबेकर, बी. एम्. हरी नारायण आपटे यांचें संक्षिप्त चरित्र ( १९२२ ), केळकर जी. एच.–' लोकहितवादी ' सरदार गोपाळराव हरी देशमुख यांचें चरित्र ( १९२३ ), खानोलकर, जी. डी.–श्रीपाद कृष्ण कोल्हाटकर यांचें चरित्र आणि वाङ्मयविवेचन ( १९२७ ), जयवंत, व्ही. एस.–बजाबा रामचंद्र

प्रधान यांचें चरित्र ( १९११ ), पावगी, ना. भ.—आत्मवृत्त ( १९२४ ), पांगारकर ल. रा. मुक्तेश्वर चरित्र व काव्यविवेचन ( १९२२ ), माडखोलकर, जी. टी.—वि. कृ. चिपळूणकर ( १९२२ ), लेले, पी. आर.—कृ. प्र. खाडिलकर यांचे ओळख-पर चरित्र ( १९१२ ) इ. दहा सुंदर चरित्रग्रंथ तयार झाल्याचें आढळून येते.

## साधुसंतात

आजगांवकर, ज. र.—मराठी आद्यकवि ज्ञानदेव ( १९२३ ) एकनाथ महाराज याचें चरित्र ( १९२९ ), नामदेव महाराज आणि त्यांचे समकालीन ( १९२७ ), भागवत, एच. आर. शंकराचार्य यांचे सं. चरित्र, पांगारकर, ल. रा.—तुकाराम चरित्र ( १९२० ), संतचरित्रमाला ( १९२२ ), भिडे, बा. अ.—तुकाराम बोवा ( १९२९ ) इ. ३५ संत चरित्रें या काळांत तयार झाल्याची नोंध आढळते.

## राजकारणी पुरुष.

या सदरांत कुळकर्णी, पी. वी.—देशबन्धु चित्तरंजनदास ( १९२२ ), फडके, ना. सी—दादाभाई नौरोजी ( १९२० ) हीं दोन महाराष्ट्रीयेतरांचीं व साने, पी. एस.—नामदार गो. कृ. गोखले यांचें चरित्र ( १९२९ ), हे एक महाराष्ट्रीय पुरुषांचें

अशीं तीन चरित्रें पुढे आली असून, लो. बा. गं. टिळक व महात्मा गांधी यांचीं तर अगणित चरित्रें या कालांत तयार झालीं आहेत. लो. टिळकांची केळकर–फाटक–लेले–निफाडकर इत्यादिकृत मिळून आठ चरित्रें प्रसिद्ध झालीं आणि महात्मा गांधींचीं सौ. श्रीमती अवंतीकाबाई गोखले–दामले–महाराष्ट्रीय–सीताकांत प्रभृतिकृत सात चरित्रें पुढें आलीं.

## कायदेपंडित व न्यायाधीश

या सदरांत फाटक एन. आर.–न्यायमूर्ति म. गो. रानडे (१९२९) व हवालदार, जी. एस.–वि. ना. मंडलिक यांचें चरित्र (१९२७) हीं दोन चरित्रें दाखल करितां येतात व

## वैद्यांत

डॉ. काणे यांचे बोधप्रद चरित्र (१९१८) व आण्णासाहेब पटवर्धन (१९२६) हे दोन चरित्रग्रंथ निर्देशितां येतात.

## संस्थानिकांत

दिमोटे, गं. आ.–श्रीमंत पतंगशाहा सं. जव्हार यांचें चरित्र (१९२०) मेंहदळे, वा. प.–श्री. प. त्रिं. प्रतिनिधि यांचें चरित्र (१९१७) व लट्ठे, आ. बा.–श्री. छत्रपति शाहूमहाराज यांचें चरित्र (१९२९) हे तीन ग्रंथ समाविष्ट करितां येतात आणि

## ऐतिहासिक स्त्रीपुरुषांत

कुळकर्णी, बी. एस.—वीररत्न बाजीप्रभु देशपांडे (१९२९), केळुस्कर, कृ. अ.—श्री. छत्रपति शिवाजी महाराज यांचें सं. चरित्र ( १९२५ ), खरे, वा. वा. मालोजी व शहाजी ( १९२० ), चिटणीस, म. रा.—श्री शिव छत्रपतींचें सप्तकरप्रणात्मक चरित्र ( १९२९ ), राजवाडे, वि. का.—जयरामकविकृत पर्णाल पर्वतग्रहणाख्यान ( १९२३ ), वाकसकर, वि. स.—अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें ( १९२६ ) व सरदेसाई, गो. स.—नानासाहेब पेशवे ( १९२६ ) हे सात चांगले ग्रंथ सांपडतात.

अध्यापकांचे सदर कोसंबी, ध.-निवेदन( १९२४ ), पोंडवाल, व्ही. पी.—प्रो. विनायकराव हाटे यांचें चरित्र ( १९२० ), माटे, गो, चि.—प्रेम कीं लौकिक ( १९२३ ), पाणंदिकर, जी. व्ही—माझ्या कांहीं आठवणी ( १९२२ ) व देवधर, गो. कृ.—माझा जीवनवृत्तांत ( १९२२ ) हीं पांच पुस्तकें सुशोभित करितात.

## क्रांतिकारकांत

सावरकर, बॅ. वि.—माझी जन्मठेप ( १९२७ ) हें एकच पण हृदयद्रावक उत्तम पुस्तक आढळतें व

## किरकोळ

या सदरांत बोरवणकर, आर. जी.—सार्वजनिक काका यांचें चरित्र ( १९२६ ), पेंडसे, लालजी.—सेनापति बापट यांचें चरित्र ( १९२६ ), लेले, एल. जी. गं. न. केतकर यांचें चरित्र ( १९२४ ), लेले, एम. व्ही.—वि. के. कुंटे यांचें चरित्र ( १९२२ ), व हाटे, एस. एन.—अ. शि. देसाई यांचें चरित्र ( १९२३ ) इ. आठ दहा पुस्तकें या कालांत तयार झाल्याची नोंद आढळते.

## युरोपियन स्त्रिपुरुषांत

जोगळेकर, एस. ए.—जोसेफ म्याझिनी ( १९२३ ), फडके, एन. एस.—डी व्हॅलेरा ( १९२३ ), टेरेन्स मॅकस्विनी ( १९२३ ), बर्वे, पी. एच.—जॉन रस्किन ( १९२२ ), भसे, प्र. श्री—कौंट टॉलस्टाय. ९ भाग., प्रिन्स बिस्मार्क ३ भाग, भागवत, एच. एन.—कैसरचे सं. चरित्र ( १९१७ ), भावे, व्ही. एल.—चक्रवर्ति नेपोलियन ३ भाग ( १९२२ ), भिडे, आर, जी.—निकोलाय लेनिन ( १९२२ ), मुंडले, व्ही. डी.—थॉमस पेनचे चरित्र ( १९२४ ), वुइल्यम दि सायलेंट यांचें चरित्र ( १९२४ ) व मॅडम रोलंड ( १९२२ ). इ. पंधरावीस पुस्तकें प्रसिद्ध झालीं. आणि

## स्त्रियांच्या चरित्रांत

भट, यशोदाबाई—आर्य स्त्रीरत्नें ( १९१७ ), ताम्हणकर, के. एम.— सरोजिनी नायडू ( १९२९ ), उमाकांत—श्री. रमाबाई रानडे ( १९२६ ) व भागवत, आर. एस.—डॉ. ॲनिबेझंट यांचें चरित्र ( १९२९ ) इ. पांच सात चरित्रें प्रसिद्ध झाल्याची नोंध आहे.

## इतिहास.

इतिहासाची या काळांत खूबच उहापोह झाला आहे. वि. का. राजवाडे, वा. बा. खरे, वि. ल. भावे व द. ब. पारसनीस इत्यादि इतिहासवेत्ते या काळांत दिवंगत झाले असले तरी याच मंडळीच्या समकालीनांत मोडणारे न. चिं. केळकर, चिं. वि. वैद्य, गो. स. सरदेसाई व बा. आ. गुप्ते, चांदोरकर, पु. बा. जोशी इत्यादि इतिहास शोधकांचे प्रयत्न पहिल्याच चिकाटीनें चालू असल्याचें निदर्शनास येतें इतकेंच नव्हे तर विं. स. वाकसकर, द. वि. आपटे, द. वा. पोतदार, वा. सी. बेंद्रे, ज. करंदीकर शेजवलकर इत्यादि उत्तरकालीन लेखकवर्ग या विषयांत चांगलाच पारंगत होत आहे. नवीन लेखक वर्गही उदयास येत आहे व विशेषतः भारत इतिहास संशोधक मंडळ स्थापन झालें असल्यामुळें इतिहास विषयाचा संघटित प्रयत्न होऊं लागला आहे.

या काळांत शालोपयोगी पुस्तकें वगळलीं असतां पुढील प्रमाणें सुमारे ९० निवडक इतिहासग्रंथ तयार झाले आहेत.

सामान्य या सदरांत दप्तरी, के. ल.—महाभारतीय युद्धकाल-निर्णय ( १९१९ ) साने, भारतीयसंग्राम ( १९२४ ) हे दोन ग्रंथ मोडले जातात व प्रत्यक्ष इतिहास या सदरांत

आपटे—द. वि. दोस्तांची श्रीरंगपट्टणावर मोहिम (१९२१) ऐतिहासिक दंतकथा व गोष्टी ( १९२४ ) काथवटे, म; वि. भरतखंडाचा प्राचीन इतिहास ( १९१७ ) पारशांचा इतिहास काळे, वाय. एम्. वऱ्हाडचा इतिहास ( १९२४ ) कुळकर्णी, पा. चिं. मध्यप्रांत व वऱ्हाडचा संक्षिप्त इतिहास ( १९२१ ) राजवाडे, वि. का. केशवाचार्यकृत महिकावतींची उर्फ माहीमची बखर ( १९२४ ) केळकर, न. चिं. इतिहास विहार ( १९२१ ) मराठे व इंग्रज ( १९१८ ) खरे, वा. वा. ऐतिहासिक लेखसंग्रह भा. १० वा ( १९२० ) भा. ११ वा (१९२२) भा. १२ वा (१९२४) गोस्वामी, पृ. ह,-गोसावी व त्यांचा संप्रदाय (१९२१) जोशी पु. बा. उत्तर कोकणचा प्राचीन इतिहास ( १९२६ ) दांडेकर, एस. व्ही. बारकरी पंथाचा इतिहास ( १९२७ ) देशप्रभु, ए. व्ही. शहाजी—जिजाईच्या लग्नाचे दुष्परिणाम (१९२७) नवलकर, एच. एन. महादजी शिंदे व नाना फडणीस यांची तुलना

( १९२१ ) पडळकर बी. आर अकबराचा जन्म ( १९१७ ) बेहरे, ना. के.--सन १८९७. भक्त, एम. बी. राजगोंडी लोकांचा इतिहास ( १९२७ ) भागवत, एच. आर. ऐतिहासिक गोष्टी ( १९२४ ) भाटे, गो. चि. सज्जनगड व समर्थ रामदास (१९१९) भावे, वि. ल. अफजलखानाचा वध ( १९२१ ) मराठी दप्तर रुमाल २ रा ( १९२२ ) शाहिस्तेखानाची मोहीम (१९२४) भावे, वा. कृ तुर्कांचें साम्राज्य (१९२६) भा. इ. सं. मंडळ—गंगोबा तात्याची कारकिर्द ( १९२० ) मिरीकर, ना. य. अहमदनगरचा प्राचीन खरा इतिहास ( १९२७ ) लिमये, डी. जी. भारतीय श्रेष्ठत्व ( १९२२ ) लेले, भा. व्यं. एक नष्टस्मृति साम्राज्य ( १९१९ ) वैद्य, चिं. वि. गझनीच्या महमुदाच्या स्वाऱ्या ( १९२५ ) मध्ययुगीन भारत भा. १ ला ( १९२३ ) भा. २ रा. ( १९२३ ) भा. ३ रा. ( १९२६ ) शिवाजी आणि चंद्रराव मोरे ( १९२५ ) शिंदे, नानासाहेब. हिंदुस्थानचा लष्करी इतिहास ( १९२५ ) मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया सरदेसाई, गो. स. मराठी रियासत मध्यावभाग भा. ४ था ( १९२५ ) सहस्त्रबुध्दे—शिवजन्म व शिवनेरी किल्ला. ( १९२७ ) इत्यादि ग्रंथांचा अंतर्भाव होतो. आणि किरकोळ या सदरांत आपटे—गो. वि. गोखले व गोखले—रास्ते घराण्याचा इतिहास, आपटे गो. वि. पटवर्धन घराण्याचा इतिहास (१९१९).

चिटणीस घराण्याची संक्षिप्त माहिती ( १९१७ ) सुळे-नागपूर चिटणवीस ( १९२५ ) गुप्ते-रिसालदार शाखा ( १९१७ ) काळे, अं. दा. पैसा फंडाचा इतिहास (१९१७) वैद्य, द्वा. प्रार्थना समाजाचा इतिहास ( १९२७ ) इ. आठ दहा पुस्तकें समाविष्ट केली असतां या कालांतील इतिहास ग्रंथांचें टांचण तयार होते.

## प्रवास व स्थल वर्णन

या विषयावरील ग्रंथांनां वाङ्मयांत फार मान आहे. व वाचकवर्गीतही या विषयावरील ग्रंथाची चहा फार आहे. परंतु मागणीच्या मानानें पुरवठा नाहीं असें. ह्मणण्यासारखी या सदराची स्थिति आहे, असें येथें कष्टानें नमूद केलें पाहिजे. मग काय आह्मांला हा विषय साध्य झाला नाहीं ह्मणावें कीं, आमचा या विषयाकडे ओढाच नाहीं ह्मणावें हें कळत नाहीं परंतु प्रवासा विषयीं साध्यासाध्यते इतकाच अनुकुल प्रतिकूलतेचा प्रश्न प्रबळ आहे असें मानतां येईल व हेंच या सदराच्या मंदगतीचें कारण असावें असेंही आपणास धरून चालूं. ते कसेंही असो, श्रीयुत भाट्यांचे ग्रंथ सोडून दिले तर एकाही आदर्श लेखकाकडून प्रवास ग्रंथांना हातभार लागला आहे असे दिसत नाहीं.

श्री. गो. चि. भाटे यानीं मात्र 'माझा अटकेपार प्रवास' ( १९१८ ), 'माझा उत्तर हिंदुस्थानचा प्रवास' ( १९१८ )

माझे दूरदूरचे प्रवास ' ( १९१९ ), हिंदुस्थानचें नंदनवन ' ( १९१९ ) व ' सह्याद्रिच्या खोऱ्यांत ' ( १९२७ ) इ. पांच सहा सुंदर प्रवास वर्णनें लिहून या सदराचा स्पृहणीय परामर्ष घेतला आहे यांतच शि. आतारकृत ' माझा आफ्रिकेचा प्रवास ( १९२३ ) आर जे. गोखलेकृत ' माझा मुंबईचा प्रवास ' ( १९२१ ), बी. बी. जोशीकृत ' महाबळेश्वरचा प्रवास ' ( १९२३ ) व साम्युएल एस. माझगांवकरकृत ' आमचा कराचीचा प्रवास ' ( १९१९ ) हीं चार पुस्तकें घेतली असतां आमची या कालांतील प्रवास ग्रंथांची यादी संपते.

## स्थल वर्णनांत

करमकर, व्ही. व्ही--महाराष्ट्राचा पुण्यग्राम (१९२९) कुंभारे, व्ही. एन.—राजधानी सातारा ( १९२९ )गोखले, आर. जे— ग्रीनलंड वर्णन ( १९२२ ) गुप्ते, वाय. आर— कऱ्हाड ( १९२७ ) जोशी डोंडी क्षेत्र औदुंबरवर्णन ( १९४७ ) जे. व्ही. गोकर्णक्षेत्र वर्णन ( १९२० ) कुळकर्णी दे. मां. महाराष्ट्राची कुलस्वामिनी ( १९२० ) दंडवते, आ. दक्षिणप्रयाग—निरानृसिंहपूर ( १९२४ ) दीक्षित, यना. वेरूळ, दौलताबाद व औरंगाबाद या ठिकाणांचें वर्णन ( १९१८ ) नारायण शंकरशास्त्री-श्रीस्कंद ( सोंडूर )क्षेत्रमाहात्म्य ( १९१७ ) पावगी, ना. म.—ऋग्वेदांतील सप्त सिंधूचा प्रांत ( १९२१ ) पुजारी, आर.

जी. श्रीक्षेत्र गाणगापूर वर्णन ( १९२६ ) भागवत, एच. आर. पुणेशराचें वर्णन ( १९२४ ) भावे, एन. के—जपान व तेथील लोक ( १९१७ ) बेलसरे जी. पी. श्रीक्षेत्र जेजुरी वर्णन ( १९२६ ) इ. पंधरा ग्रंथ नमूद करतां येतात

## धर्म.

यद्यापि धर्मासारखा जिव्हाळ्याचा प्रश्न कोणताही नसेल तथापि त्या सारखी नाजूक बाबतही कोणती नसेल, असें म्हणावयास हरकत नाहीं. धर्म कोणाला नको आहे ? पण असें असूनही धर्माविषयीं अधिक उणें लिहिणें कोणालाही आवडत नाहीं. महाराष्ट्रीय हे हिंदुधर्मीय आहेत व हिंदुधर्मास आजमित्तीस जर एखाद्या बिकट परिस्थितीशीं तोंड द्यावें लागत असेल तर महाराष्ट्रीयांनीं त्यास आपल्या सामर्थ्यानुसार सहाय्य करणें हें त्यांचें कर्तव्य आहे.

तसें तर धर्म अनेक प्रकारचे आहेत. परंतु वर्णाश्रम धर्म ही धर्मशब्दाची मुख्य केंद्रीभूत कल्पना आहे. आणि सनातन हिंदुधर्माची रचनाचीही मुख्यत्वेंकरून वर्णाश्रमधर्माच्याच पायावर झाली आहे. अर्थात धार्मिक वाङ्मयांत सनातनहिंदुधर्म मान्य अशाच ग्रंथांचा समावेश होऊं शकतो हें उघड आहे.

तथापि धर्मविषयक वाङ्मयाची अशी गोष्ट आहे कीं, त्यांत नवीन वाङ्मयाची भर पडावी अशी त्याची दुःस्थिति नाही. संस्कृत भाषेतील धर्मवाङ्मय देशी भाषांत आले असतांही कार्य-भाग होणार आहे. आणि सुदैवानें संस्कृत भाषेंतलि बरेंच धर्म-वाङ्मय मराठींत आलें आहे व येत आहे. किंबहुना मराठींत धर्म वाङ्मयच अधिक पुष्ट आहे आणि धर्मेतर वाङ्मयें अलीकेडच कुठें उन्नत होत आहेत.

या कालांतही या सदरांत जें बरेंच धर्म वाङ्मय निपजलें आहे, त्यांत पुढाल प्रमाणें ग्रंथ निर्देशनीय आहेत. यांत कांही स्वतंत्र आहेत व कांहीं संस्कृत ग्रंथानुवादित आहेत.

कायरकर, बा-पितृमेध ( १९२९ ), गर्गे ल ह.—आषाढो द्वाहानिर्णय खंडनम् ( १९१९ ) गर्दे, जी. के—ईशगणादर्श ( १९२१ ), घारपुरे, एस. एस.—हिंदुधर्माचीं मूलतत्वें व नित्यो-पासना ( १९१९ ), चित्रावशास्त्री—उपनयन संस्कार (१९१७), गणेशाथर्वशीर्ष ( १९२६ ) यज्ञोपवितसंस्कार ( १९२६ ) टाकी रा. शं.—पुरुषार्थ दीपिका ( १९१८ ) टिळक, बा. गं.—धर्मविष-यक मतें ( १९ ९ ), तांबेशास्त्री—धर्ममीमांसा ( १९१८ ), दिवेकर, महादेव शास्त्री—हिंदुधर्मशिक्षण, ३—४ पुस्तकें. धारवाडकर एच. एन.—धर्मजिज्ञासा ( १९२९ ) श्रीमन्महाभारत तात्पर्य निर्णय ( १९२७ ) कृष्णामृत महार्णव व सदाचार स्मृति

( १९२५ ) पावगी, ना. भ.-प्रवृत्ति व निवृत्ति ( १९१९ ), बोडस, म. रा.-शंकराचार्य व त्याचा सांप्रदाय ( १९२३ ), महाराष्ट्रीय-रामायणाचा उपसंहार ( १९२७ ), श्रीराम-धर्म-शिक्षणाचा ओनामा ३-४ पुस्तकें ( १९२१ ), लेले, डी. बी. मुमुक्षुमार्ग ( १९२२ ), राजवाडे, एस. आर -अग्निहोत्राचें स्वरूप ( १९२० ), रिसवडकर, आर. जी-श्री समर्थ संप्रदायाचीं लक्षणें ( १९२६ ) वैद्य, चिं. वि.-महाभारताचा उपसंहार ( १९१८ ) साठे, व्ही. डी दासबोधाची रूपरेषा. ( १९२४ ) इ.

याशिवाय ब्राह्मविवाहपद्धति ( १९१९ ), आनंदमार्गीय गुरुकिल्ली ( १९२४ ) शिक्षापत्री-स्वामीनारायणमत ( १९२० ) माणीक प्रभुसांप्रदाय (१९२६) व जपजीसाहेब-शिखधर्म (१९२०) वगैरे इतर धर्म व सांपद्रायांची कांहीं पुस्तकें या काळांत प्रसिद्ध झालीं.

## तत्वज्ञान.

तत्वज्ञान हा विषय अमर्याद आहे. याला धर्मासारखा मर्यादित स्वरूपाचा विषय ह्मणतां येणार नाहीं. धर्माला देशकाल वर्तमान पहावें लागतें. तसें तत्वज्ञानाला पहावें लागत नाहीं. तें असल्या प्रकारच्या उपाधींपासून आलिप्त असावें लागतें अथवा असतें. मराठीच काय पण धर्म व तत्वज्ञान या विषयावरील ग्रंथाविषयीं कोणत्याही वाङ्मयत असाच प्रकार असलेला आपल्या

निदर्शनास येईल. असें नसतें तर अरिस्टॉटल, साक्रेटीस, निझ्श, कान्ट, स्पेन्सर, बेकन इ. अनेक पाश्चात्य अथवा बुद्ध, शंकराचार्य, मध्याचार्य इत्यादि धर्मसंस्थापकच नव्हे तर ज्ञानदेव, तुकाराम इत्यादि धर्मसंस्थेवर हल्ला करणारांची तत्वजिज्ञासा व्यर्थच ठरली असती व त्यांच्या ग्रंथांकडे आज आपण ज्या आदरानें पाहतो त्या आदरानें पाहिलें नसतें.

परंतु एवढें मात्र खरें कीं, या विषयावरील संस्कृत वाङ्मयाचा झरा अद्यापि निःशेष झाला नाहीं व धर्मवाङ्मयाप्रमाणें तत्वज्ञानासही या झऱ्याचा उपयोग दीर्घकाल करतां आला आहे व या पुढेंही दीर्घकाल करतां येईल.

आणि तसें होत आहेच. कारण या कालांतही या सदराखालीं वि वा. बापटकृत आत्मपुराण ( १९१९ ), योगवशिष्ठ ( १९२२ ), पंचदशी ( १९२३ ), ब्रम्हसूत्र शारीर भाष्यार्थ ( १९२५ ), बृहदारण्यकोपनिषम्दाष्यार्थ ( १९१७ ), मांडुक्योपनिषम्दाष्यार्थ व रड्डीकृत मध्वाचार्यप्रणित ब्रम्हसूत्रभाष्यार्थ इ. संस्कृत ग्रंथानुवादित ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. तशीच कांहीं स्वतंत्र रचनाही झाली आहे. स्वतंत्र ग्रंथांत आपटे, दा. ना.—तत्वज्ञानांतील कूटप्रश्न ( १९२६ ), कोल्हटकर, य. त्र्यं. श्रीमद्भागवताचा उपसंहार ( १९२१ ) चिंचाळकर, प. गो. आत्मानुसंधान ( १९२० ), आधिभौतिक सुधारणा व आध्यामिक धारणा

( १९२१ ), कणसळकर, वा. प. वेदांतचंद्रिका ( १९१९ ). सोनाळकर, के. म.—अमृततुषार ( १९२२ ) व जोशिकृत मारुतीचा ओटा ( १९१७ ), गुहेंतील गोष्टी ( १९२४ ) इ. पुस्तकें उल्लेखनीय आहेत.

भगवद्गीतेच्या या अवधींत सुमारे ३० आवृत्त्या निघाल्या व लो. टिळकांच्या गीतारहस्याचीं जीं अनेक पुस्तक परीक्षणें झालीं त्यांत चिंचाळकर—रहस्यनिरीक्षण ( १९१७ ), नेने—गीतारहस्य-सिद्धांत विवेचन ( १९१७ ), महाराष्ट्रीय-तुल्यं तु दर्शनम् ( १९२२ ) व डॉ. बेलवलकर—शंकराचार्य व रहस्यकार (१९१८) इ. पुस्तकें नोंदण्या जोगीं आहेत.

या नंतर येणारें सदर म्हणजे तें **मानशास्त्र व गुप्तविद्या हें** होय. या सदराची आमची आवड फार प्राचीन असून या कालांतही आमच्या कित्येक चांगल्या लेखकांनी या जुनाट विषयाकडे आपलें लक्ष वळवावें हें या सदराचें भाग्य होय.

या कालांत या सदराखालीं आजगांवकर, ज. र.—भूतविद्येचे चमत्कार ( १९१८ ), आठल्ये, कृ. ना —आत्मसामर्थ्ययोग ( १९२१ ), नजरबंद शिक्षक ( १९२७ ), मोहिनीविद्या शिक्षक ( १९१९ ) ऋषि, मृतांशीं संवाद ( १९२३ ), गणपुले, जी. बी.—मानसोन्नति ( १९२१ ), कालेंकर, गो. मो.—संकल्पसिद्धि

(१९१७), कुळकर्णी, आर. व्ही.—मानसशक्तिपरिचय (१९१९), कुळकर्णी, बी. एस.—मानसविद्या शिक्षक ( १९२३ ), कोसंबी, ध.—समाधिमार्ग ( १९२९ ), जोशी, स्मरणशक्ति व ती कशी वाढवावी (१९२९), धर्मराज, क.—चौऱ्यांशी आसनें (१९१७), नामजोशी, पां. गं. प्राणायाम ( १९१८ ), भागवत, मेस्मेरिझम ( १९२४ ), सुरतकर, मा. मै.—आत्मद्योतनोपचार शिक्षक ( १९२९ ) व योग्याची कामधेनु इ. पंधरावीस पुस्तकें प्रसिद्ध झालीं.

## नीति.

धर्म व तत्वज्ञान या प्रमाणें नीतिविषयक वाङ्मयाची अर्वाचीन मराठी वाङ्मयांत जरी पूर्वींपासूनच रेलचेल आहे, तरी या कालास साजेल अशी ग्रंथरचना या सदराखाली झाली नसती तर आम्हास उत्तरकालाची थोरवी खाचित गातां आली नसती. अर्वाचीन मराठी वाङ्मयांत जशीं उत्तरकालीन इतर शाखांचीं-तशीं या सदराखालील वाङ्मयाचींही पाऊलें स्पष्टपणें उमटलेलीं दिसून येतात. आमच्या या विधानाच्या पुष्टयर्थ आम्हीं वा. म. जोशीकृत ‘ नीतिशास्त्रप्रवेश ’ ( १९१९ ) हें एकच पुस्तक रुजू करून, निदान या एकाच पुस्तकास तरी या शाखेचा गौरव वाढवितां आला आहे असें बिनदिक्कत म्हणतो.

या शिवाय या सदराखाली अभंग, आर. के. सदाचार (१९१८) किल्लेदार, के. ल. शील आणि नीतिमत्ता (१९१८) कोल्हटकर, डी. वाय.—स्त्रियाचा कर्मयोग (१९२४) गुणे, य. ल.—आत्मसंयमन (१९२१). गोगटे, व्ही. एम.—नीतिशास्त्र (१९२४) पणशीकर, डी. टी.—बापाचा सासुरवासिनींस हितबोध (१९२४) मुंडले, वा. द.—आर्यांची चतुर्विध नीति (१९१९) मिसाळ, पा. ना. नीति तरंगिणी (१९२३) बोकिल, आर. व्ही.-मनुष्य आणि त्याचें ध्येय (१९२५) जागळेकर, एस. ए.—मानवीं कर्तव्यें. (१९२१) जगताप, द. ना. आचार विचार (१९१७) जोशी, चिं. वि.—इंग्रजी शिष्टाचार (१९२२) थोरात, आर. जी.—बोधामृत (१९२२) रामदासी लघुबोध (१९२२) वझे, कृ वि.—विद्यार्थ्यांचे धर्म (१९३२२) शिंदे, ना.—शिस्त (१९१८) सीताकांत—आत्मोन्नति (१९२४). सावकार—सत्यनिष्ठा, शील व उन्नति (१९१७) इ. वीस पंचवीस पुस्तकें या कालांत प्रसिद्ध झालीं आहेत. काहीं पुस्तकें व्यसनमोचन या सदरांत समाविष्ट करावीं लागतात. तीं अरोग्याचे शत्रु (१९२७), दारू कशी सोडावी (१९२४), पानांत पान कोणतें पान (१९२७), शत्रु कीं मित्र (१९२७), व्यसन सम्राट याचा दरबार (१९२६) व जुवेबाजी (१९२३) इ. होत.

या पुढें शास्त्रीय, वैज्ञानिक व इतर प्रकारचे विषय येतात आणि त्यांच्यांतही कांहीं सदरांत—विशेषतः वैद्यक, ज्योतिष, कृषि-

शास्त्र राजकारण, समाजशास्त्र, व ललितकला इ. विषयांची ग्रंथ संपत्तींत या कालांत चांगलीच भर पडली असून भौतिक शास्त्रांत-र्गत दुसऱ्या अनेक प्रकारच्या विषयांकडे ही महाराष्ट्रीयांची डोळे झांक नाहीं असें पुढील नोंवीवरून म्हणता येते. उदारणार्थ, वैद्यक या सदराखाली संस्कृतांतून आलेलीं ओगले, प्र. चिकित्साप्रभाकर ( १९१७ ) दीक्षित, य. गो योगरत्नाकर ( १९१७ ) बोरकर, डी. ए. सार्थ वृंदमाधव ( १९२२ ) रसचंडाशु ( १९१९ ) व रसरत्नाकर, रसचिंतामणी इ पुस्तके प्रसिद्ध असून स्वतंत्र पुस्तकांत पुढीळ पुस्तकें उल्लेखनीय आहेत. ओगले, प्र. ज्वर ( १९२९ ) गाडगीळ, द. वि. त्रिदोषविज्ञान ( १९१७ ) गोडबोले, एम. बी. क्षयरोग, कारणें व उपाय ( १९२४ ) जोशी, व्ही. व्ही. महामारी व संजीवनी ( १९२७ ) तांबे. गो. ना. प्लेग ( १९१७ ) नारायणराव–कॉलरा ( १९२६ ) परांजपे, पां. डोकें दुखी (१९२७) हार्ट डिझीज व त्यार उपाय (१९३१) पळसुळे, गो स-इन्फ्लुएन्झा (१९१८) बरिदे, ए. बी. प्लेग चिकित्सा ( १९१७ ) म्हसकर, के. एस. सांसर्गिक रोग व त्यास प्रतिबंध करणें ( १९१७ ) हिर्लेकर, पु. आयुर्वेदांतील मुलतत्वें अथवा त्रिदोष ( १९२९ ). इ.

## विशेष उपचार पद्धति.

किनरे, गो. लंघनचिकित्सा ( १९२० ) कुळकर्णी बी. एस दुग्धाहार चिकित्सा ( १९२२ ) कुळकर्णी–व्ही. एम. होपि-

ओपाथिक वैद्यक (१९२७) गणपुले, जी. बी. मानसोपचारशास्त्र व पद्धति ( १९२२ ) जोशी, एल एन. जलतत्वचिकित्सा शिक्षक ( १९२१ ) लंघनचिकित्सा शिक्षक ( १९१९ ) दाते, गो रा. डाक्टरपाणी ( ६९१९ ) परांजपे, ग पां–अमृतपान ( १९२४ ) इ. पुस्तकें नोंदण्याजोगीं असून

स्त्री व बाळ वैद्यकांत

काळे तान्हे मूल (१९२६) टेंबेभा, म. मातृपद (१९२७ शिशुसंवर्धन ( १९२६ ) परांजपे, ग. पां. मुलांची जोपासना ( १९२४ ) पुरंदरे, नी. अ. गर्भमोचन विद्या ( १९१८ ) इ पुस्तकें या कालांत तयार झालेलीं दिसतात. या नंतर याच सदरांत पण किरकोळ म्हणुन पुढील पुस्तकें घेतलीं म्हणजे वैद्यक विषयाची नोंध संपत काळाखे, ग पा. दातांचे आरोग्य ( १९१७ ) रोगोत्पादक प्राणी ( १९२१ ) करमकर, व्ही. व्ही. डोळ्याचे आरोग्य ( १९२३ ) दामले, न. आर विंचू ( १९२२ ) देशपांडे, ो. एन. लिंबू चिकित्सा ( १७३४ ) जेजूरीकर, डी. एन. पशुपक्ष्यांची जोपासना व निगा ( १९१७ ) इ.

ज्योतिष-या सदरांत ओक, के. बी. फल प्रश्नावली (१९२०) टिळक, न. व्ही नक्ष मंडळ (१९२२) दप्तरी, के. ल. करण कल्पलता (१९२५) देशिंगकर, ग. शा. प्रश्नवैष्णव शास्त्र (१९२५) नवाथे वि. गो. योगावली (१९२७) नाईक बी. व्ही.

पंचागशुद्धिरहस्य ( १७२३ ) पटवर्धन, र. मो. कुंडली रहस्य (१९१८) ग्रहदशा (१९२०) ज्योतिष शिक्षक (१९२२) भविष्य-सिद्धांत (१९२१) वैदिक आरंभस्थान (१९२७) सचित्र कुंडली संग्रह ( १९१९ ) हर्शल नेमच्यून ग्रहयोग ( १९२२ ) पवार, एस. जी. रेवती योग तारेचा शोध आणि अयनांशाची सिद्धता ( १९२६ ) प्रधान, य. के. जातक मार्गोपदेशिका ( १९२९ ) बाळ महाराज, पां. गो. ज्योतिषशास्त्राचा ओनामा ( १९२९ ) राजे, डी. एन. जातकरहस्य ( १९२३ ) रामनारायण—परिभ्रमण पद्धति ( १९२५ ) लेले, व्ही. एन.—ग्रह नक्षत्र संयोग फल (१९२३) इ. वीस पंचवीस पुस्तकें या कालांत तयार झालीं आहेत.

प्राणिशास्त्र—या सदरांत कोल्हटकर, बी. एस—कीटकशास्त्र (१९२३), प्राणिशास्त्र ( १९२३ ), गोखले, व्ही. एन. सृष्टि निरीक्षण (१९२७), पशू, पक्षी व इतर प्राणी (१९२७), दातार, स. ना.—सजीव सृष्टीची उत्क्रांति (१९२४), देशपांडे, व्ही जी.—कीटक शास्त्र ( १९२९ ), फळणीकर, र. ब.—कोषाचें वर्णन ( १९२१ ), सुळे, द. स.—प्रकृतिपाठ ( १९२९ ), वैद्य, एस. एल. वनस्पतींची कुलें ( १९२६ ), जोशी, के. एम.—सृष्टिशास्त्र प्रवेश (१९२७) पवार, के. एम—वनस्पतिशास्त्र प्रवेश (१९२३), भिडे, व्ही. बी. मानप शारीरशास्त्र ( १९२१ ), इ. १०—१२ पुस्तकें प्रसिद्ध झालीं असून.

पदार्थ विज्ञान या सदरांत डोंगरे, व्ही. ए.—हवेंतील चमत्कार (१९२१), घाते, गो के.—विद्युत व विद्युत (१९२१), देशपांडे, ए. व्ही. तेजो निधि सूर्य (१९२२), नेने, व्ही. आर.—रसायनशास्त्र (१९२६) पेंढारकर, एस. एस. चुंबकत्व व विद्युत (१९२६), उष्णता (१९२४), बेडेकर, ल. गो. पदार्थविज्ञान प्रवेश (१८२६) साठे, एल. जी.—रसायनशास्त्र प्रवेश (१९२९), इ. ८–१९ नवीन पुस्तकांची भर पडला आहे.

यंत्रशास्त्र—या सदरांत जीं आपटे, एस. व्ही.—यामिक प्रदीप (१९२४) आगखाला, एन. के.—फोर्ड मोटार ड्रायव्हर (१९२९), उपलेकर, व्ही. आर.—बॉयलर, गाईड (१९२७), देशपांडे, व्ही. एस.—स्टीम एंजीन आणि बॉयलर गाईड (१९२०), मालाडकर, यंत्रशास्त्र (१९२७) इ. ५–६ पुस्तकें, प्रसिद्ध झालीं त्यांत पहिलेंच काय तें विशेष महत्वाचें आहे.

शेतकी व बागाईत—या सदरांत इगतपुरीकर, एस. जी. भाजीपाल्याची लागवड (१९२१) कृषिवलमित्र घरचा बागवान (१९२३), कोगेकर, व्ही. के. टोम्याटोची लागवड (१९२६), कोतवाल, बी. आर.—पोपयाची लागवड (१९१९), गर्गे, एस. वाय.—शेतीकरितां खतें तयार करणें, फलकृषिशास्त्र (१९२५), गाडगीळ, वा. रा.—अर्वाचीन कृषिशास्त्राचें

स्वरूप ( १९१८ ), आम्रसंवर्धन ( १९१९ ), गोळे, एच. एन.—द्राक्षाचा बाग ( १९२३ ), घारे, भा. का.—घरगुती दुभतें ( १९१८ ), जोशी, पी. जी. कलमें तयार करण्याचें शास्त्र ( १९२६ ), सरदार, ग. अ.—ऊंस आणि गिनिग्रास ( १९१८ ), क्षीरसागर, ए. बी. वऱ्हाडचाशेतकरी ( १९२९ ) दामले, एस. डी.—शेतकी सुधारणा ( १९२३ ); पवार के. एम. भाजीपाल्याचा मळा ( १९२१ ) परांजपे, एच. पी. फळझाडांचा बाग ( १९२२ ), बापट, दा भा. पावसाळ्याचें अनुमान ( १९१५ ) सावंत, वाय एस.—भाजीपाल्याची किफायतशीर लागवड ( १९२६ ) गोहीन, जे एल.—कोंबड्याची जोपासना ( १९२४ ) मेणबत्या ( १९२६ ) ई. २५–३० या काळांत नवीन पुस्तकांची भर पडली असून.

व्यापारविषयक व किरकोळ कला—हें सदर घेतलें तर त्यांत खोडके, व्ही. पी. व्यापारी ( १९१७ ), परांजपे, एस, व्ही. अल्पभांडवलाचे धंदें ( १९२० ), भंडारे, वि. दा. कलामार्गदर्शक रणादिवें, डी. जी. व्यापारी शिक्षक ( १९२३ ), पराडकर, आर. एन. वस्त्रामावन, गर्गे, एस. वाय. शिसपेन्सिलींच्या कृति ( १९२३ ) जोशी, ल. ना. बूटपॉलिश इन्स्ट्रक्टर ( १९२० ), सरस्वतिनंदन सुगंधीशिक्षक ( १९२६ ), गर्गे, य. गो. रंगकलानिधि ( १९२६ ) गजानन—सभाप्रदीप ( १९२३ ), दामले, सी. के. सभा, अक्ष्यक्ष

व समासद, आपटे, बा. गो. लेखनकाल व लेखनव्यवसाय (१९२९) पारखे, व्यवहार कसा करावा ( १९२१ ), ठाकरे, के सी वक्तृत्वशास्त्र ( १९१८ ), व दात्ये-पाशक केवली ( १९२१ ) संपत फोटो कसा काढावा ( १९२३ ) इ. दहावीस पुस्तकें या कालांत तयार झाल्यांचें दिसून येतें.

**गृहशास्त्र**—या सदरांत प्रधान, लक्ष्मीबाई माजघरांतील चर्चा ( १९२७ ), विणकाम ( १९२४ ), गर्गे, एस. वाय, स्त्रियांची उद्योगशाळा ( १९२६ ), इ. २–४ पुस्तकें सांपडतात व

**ललितकला**—या सदरांत आपटे, वा, गो. सौंदर्य व ललितकला ( १९१९ ), भाटे, गो. चि. ललितकलामीमांसा, पांगारकर, एम. बी. मयकलाप्रवेश ( सुतारकी ) ( १९२७ ), वझे, के. व्ही प्राचीन हिन्दीशिल्पशास्त्रासार ( १९२७ ), शिल्पशिक्षणाचें महत्व ( १९२६ ), इ. ५–६ पण चांगल्या पुस्तकांची भर या कालांत या शाखेंत पडली आहे.

**संगीत**—या सदरांत कुंदगोळकर, उ.—संगीतकला दर्पण ( १९२९ ), गोखले, जी. आर.—संगीत शिक्षक ( १९२४ ), जोशी, डी. के—हिंदुस्थानी संगीत पद्धति ( १९२१, मनोहर, अ.—संगीतप्रवेश ( १९१७ ) बेद्रकर, बा. मो. संगीतकलादर्श ( १९१७ ), भिडे, मा. ग.—शास्त्रीय गायन वादन प्रवेशिका

( १९२१ ), तालकाल प्रवेशिका (१९२१), रागगीत प्रवेशिका (१९२१),सुकथनकर, बी. एस. हिंदुस्थानी संगीत पद्धति(१९२०), शालेय संगीत पद्धति ( १९२७ ), वसईकर, ग. पी. सनईवादन पाठमाला ( १९१८ ), गोडबोले, एस. आर.—सेल्फ हारमोनियम टीचर (१९२४), दातार, जी. डी.—हार्मोनियम प्रवेश (१९२९), फाटक, बी. व्ही.—हार्मोनियम शिक्षक ( १९२६ ), बागलकोटकर, डी. आर.—बालसंगीत पाठ ( १९२६ ); मुळे, के. जी.—हार्मोनियम वादन पद्धति ( १९२२ ), इ. १५–२० प्रसिद्ध झालीं असून

क्रीडा व विनोद—या सदरांत गोखले, के. एस.—बुद्धिबळाचा खेळ ( १९१७ ), मुजुमदार, जी. जी.—बुद्धिबळाचा मार्गदर्शक ( १९२९ ), केतकर, जी. बी. डबलबार (१९२९), परांजपे, जी. पी.—नमस्कार ( १९२९ ), सप्रे, ल. ना.—मल्लखांब ( १९१८ ), फरीगदका ( १९२० ), मल्लयुद्ध( १९२१ ), भोपटकर, ल. ब.—दांडपट्टा ( १९२७ ), पाटोळे, बी. आर.—जलसाशिक्षक (१९२३), काळे—हॉकी खेळाचे नियम (१९२०) चेंडू दांडू नियम पुस्तक ( १९२० ) मोडक—लहान मुलांचे खेळ ( १९२१ ) सबनीस—बालवीरांचे खेळ (१९२३) इ. १०–१२ नवीन पुस्तकांची भर पडली आहे.

## राजकारण.

हेही महाराष्ट्रीयांचें एक आवडीचें सदर असल्यामुळें या सदराखालीं या कालांत पुष्कळ ग्रंथरचना झाली आहे त्यांत आपटे, दा. ना.—पार्लमेंट ( १९२४ ), सुधारणा आणि प्रगति ( १९२१ ), करंदीकर, ज. स.—कौटिलीय अर्थशास्त्र (१९२७), केतकर, श्री. व्यं.—निःशास्त्राचें राजकारण ( १९२६ ), केळकर न. चिं.—गेलीं पांच वर्षें ( १९२६ ), जावडेकर, एस. डी.—हिंदी राजकारणाचें स्वरूप ( १९२४ ), राजनीतिशास्त्र परिचय ( १९२६ ), ठोमरे, वि. अ.—वसाहतींचें स्वराज्य ( १९२० ), टिपनीस. गो. गो.—कौटिलीय अर्थशास्त्रप्रदीप ( १९२३ ), भिडे, एम. आर.—जबाबदार राज्यपद्धति ( १९२१ ), भोपटकर, ल. ब.—स्वराज्याची मीमांसा ( १९१७ ), कांग्रेस व कायदेमंडळ (१९२१), प्रधान, रा. ग.—प्रातिनिधिसत्ताक राज्यपद्धति (१९२१), हिंदुस्थानची मागणी ( १९१७ ), वझे, के. व्ही. भावी हिंदी स्वराज्य ( १९२४ ), टिळक, बा. गं.—केसरींतील लेख ( १९२२—२६ ), इ. १९—२० पुस्तकें उल्लेखनीय आहेत.

**अर्थशास्त्र.**—या सदरांत काळे, भा. त्रिं.—संपत्ति व भांडवल, काळे, वा. गो.—अर्थशास्त्र ( १९२७ ), खांडेकर, एस. जी.—भारतीयचलनपद्धीत ( १९२१ ). पेढींचे व्यवहार व इतिहास

(१९२२), साठे, पी. बी—सुलभ अर्थशास्त्र (१९२५) इ. ४—५, पुस्तकें प्रसिद्ध झालीं आणि

**शिक्षण.** या सदराखालीं पाहिलें असतां त्यांतही आपटे, वा. गो.—बालोद्यान पद्धतींचें गृहशिक्षण ( १९१८ ), कारखानीस, एम. के अध्यापन (१९२६), शिक्षक आणि शिक्षण (१९१९), जोशी, के. म.—शास्त्रीय शिक्षण ( १९२१ ), नंदुरबारकर, पां. रा.—मुक्या मुलांचें गृहशिक्षण ( १९२६ ), बोकिल, व्ही. पी.—अध्यापनाची पूर्व तयारी ( १९२४ ), माधवशिष्य—राजकुमारांचें संगोपान आणि शिक्षण ( १९२६ ), मोडक, एम. जी.-शिक्षण• शास्त्र व अध्यापनकला ( १९२६ ), भावे, एन. के.—शिक्षण आणि मानसशास्त्र (१९२४), मोहनी, एच. के.—तेजस्वी शिक्षण ( ३९२४ ), घाटे, के. बी.-स्लाईड शिक्षण ( १९२४ ), आपटे, ए. व्ही. लष्करी शिक्षण. इ. १०—१२ पुस्तकें या कालांत तयार झाल्याचें आढळतें.

**समाजशास्त्र.**—या सदरांत गोखले, कृ. के—हिंदु स्त्रियांची कायदेशीर दुर्दशा ( १९२२ ) दिवेकर, म. अस्पृश्योद्धार विचार ( १७२३ ) धर्मभ्रष्टांचें शुद्धी करण ( १९२४ ) ब्राह्मणांतील पोट जातींचे एकीकरण ( १९२७ ) हिंदुसमाज समर्थ कसा होईल ? ( १९२७ ) नाईक, पी. जी. वेश्या

व वेश्या व्यवसाय ( १९२ : ) समाजसेवेचीं तत्वें व मार्ग ( १९२१ ) मुंडलें, वा. दा. ब्राह्मण-अब्राह्मण बोध (१९२४) माटे, एस. एम.—अस्पृश्य विचार ( १९२२ ). गरीब विद्यार्थी पोसण्याचें एक सामाजिक वळण. रवंटे, व्ही. सी.—सामाजिक वाद, इ. १०—१२ चांगलीं पुस्तकें या कालांत तयार झालीं असून

## विशिष्ठ वर्ग.

घेतलेतर जोशी, के. अ.—उत्तर कोंकणांतील देशस्थ यजुर्वेदी-मांध्वदिन ब्राह्मण यांची संक्षिप्त माहिती (१९१८) पाटील, धा. वा. आग्री जातीची सुधारणा ( १९१९ ). कायस्थ, डी. टी.—चित्रगुप्त वंशीय कायस्थ ज्ञातीची थोडक्यांत माहिती ( १९२४ ) धावडे, एच व्ही. कुणबी ज्ञातीचे नियम ( १९२१ ) ब्रह्मभट्ट, वाय. एस. ब्रम्हभट्टोत्पत्ति भास्कर ( १९२४ ) वैश्य ज्ञातीची उपयुक्त माहिती ( १९१८ ) रुमडे, सी. गो. मराठी—परीट जातीचा संक्षिप्त इतिहास ( १९१७ ) पाटील, डी. के.—रजपुत समाज (१९२२) सहवासी ब्राह्मण प्रसंशा (१९१९) लेवापुराण (१९१८) क्षात्रिय वैश्यसद्भाव मंडन (१९२७) इ. १०—१२ नवीन पुस्तकें या कालांत प्रसिद्ध झालीं आहेत.

## सुप्रजानिर्माणशास्त्र.

या सदराकडेही याच कालांत आमच्या कित्येक विद्वानांचें लक्ष लागलें असून या सदराखालीं पुढील प्रमाणें पांचच पण चांगलीं पुस्तकें या कालांत निर्माण झालीं आहेत.

कर्वे, आर. डी—संतति नियमन ( १९२३ ) फडके, एन. एस—संतति नियमन ( १९२५ ) मोडक, ग. ना.—सुप्रजा जनन-शास्त्र ( १९२६ ) राष्ट्रसेवक—संततिशास्त्र ( १९२६ ); स्वामी शिवानंद—मनोवांच्छित संतति ( १९२४ )

**बालवाङ्मय**—बालवाङ्मयविकास हाही उत्तरकालीन अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा एक विशेष समजला जाईल आणि त्याचें पहिलें पाव शतक तर या नात्यानें निःसंशय आठविलें जाईल. उत्तर काल येईपावेतों अभिजात बालवाङ्मयाची आम्हांस चांगलीशी कल्पनाच नव्हती असें म्हणणें धाष्टर्याचें नाहीं. बाल-भाषेंत नसणारें, बालमनोवृत्तीस आनंद न देणारें, बालसृष्टींतील विविध व्यापारांचें मनोज्ञ अविष्करण न करणारें वाङ्मय बालवाङ्-मय होऊं शकत नाहीं. आणि असें वाङ्मय आमच्याकडे दीर्घकाल तयार होऊं शकलें नाहीं हें आमच्या पुराणप्रियतेस अनुसरून योग्यच होतें. स्पष्ट सांगावयाचें म्हणजे 'शालोपयोगी पुस्तकां-खेरीज मुलांनीं इतर प्रकारचीं पुस्तकें वाचूं नयेत' या मताचें आम्हीं होतों व याच चमत्कारिक कल्पनेमुळें आम्हीं आजपर्यंत पुस्तकांस बालजीवनांतून अजिबात फाटा दिला होता.

परंतु उत्तरकाल येतांच महाराष्ट्र बालकांच्या सुदैवानें ही स्थिति बदलली. पाश्चात्य वाङ्मयांतील बालवाङ्मयाची वाढ व

जोपासना पाहून एका शतकानंतर कां होईना आमच्यातील कांहीं लोकांत एतद्विषयक जागृति उत्पन्न झाली व ते अभिजात बाल० बालवाङ्मय निर्माण करण्यास उद्युक्त झाले. आणि जे तसे उद्युक्त झाले त्यांच्या प्रयत्नास यशही आलें. कोणी शिक्षणविषयक, तर कोणी नीतिपर; कोणी मनोरंजक, तर कोणी उद्बोधक; व कोणी गद्य तर कोणी पद्यवाङ्मय निर्माण करूं लागला आणि परिणामीं उत्तरकालाच्या आरंभींच आमच्या बालवाङ्मयास चांगलेंच बाळसें आलेलें आपणास दिसणें ही समाधानाची गोष्ट आहे.

तशी तर बालवाङ्मय निर्माण करणारांची परपंरा अर्वाचीन मराठी वाङ्मयाचे आद्य ग्रंथकार ' बाळमित्र ' कर्ते कै. छत्रे यांच्या पासून लागेल आणि हीच परंपरा कायम ठेऊन अलीकडे यावयाचें झाल्यास बापटशास्त्री, वि. कों. ओक, ह. कृ. दामले, वि. मो. महाजनी, मो. ग. लोंढे, रेव्ह. टिळक, मिस मेरी भोर, या. शं. वावीकर इ० गद्यपद्य लेखक या परंपरेचे मध्यकालपूर्वार्धकालीन दुवे ठरतील, आणि उत्तरार्धकालीन दुव्यांत ह. ना. आपटे, सौ. काशीबाई कानिटकर, प्रभृति एक दोन व्यक्तीच दाखल करतां आल्या तरी उत्तरकालांत मात्र ही उणीव भरून निघाली, इतकेंच नव्हें तर अर्वाचीन मराठी वाङ्मयांतील बालवाङ्मयाचा इतिहास लिहिणारास उत्तरकालापासूनच त्याच्या नवयुगास सुरुवात झाल्याची कल्पना करावी लागेल.

उत्तरकालापासूनच बालवाङ्मयाविषयीं आमचा दृष्टिकोण बदलला. बालकांसाठीं निर्माण होणारें वाङ्मय त्यांच्या निरनिराळ्या श्रेणीस अनुसरून कसें असावें; त्यांच्यासाठीं तयार होणाऱ्या पुस्तकांचें अंतरंग व बाह्यांग कसें असावें; त्यांचा टाइप किती मोठा असावा इ. गोष्टींची साधारण जाणीव आम्हास याच कालांत झाली आणि बालवाङ्मयोत्पादनाचें प्रमाणही याच कालांत वाढलें. सन १९१७ पर्यंत जितकें बालवाङ्मय प्रसिद्ध झालें तितकें व थोडें जास्त बालवाङ्मय या दहा वर्षांत निर्माण झालें जें आणि निर्माण झालें तें बदललेल्या दृष्टिकोणावरहुकूम आहे हें आपण पाहतों.

' आनंद ' मासिकमुळें बालवाङ्मयाच्या या काळच्या जोपासने विषयींचा अध्वर्युपणा श्रीयुत वा. गो. आपटे यांच्याकडे येत असला तरी वि. वि. करमरकर, कृ. गो. किनरे, पा. ना. मिसाळ या तीन लेखकांची बालवाङ्मयविषयक कामगिरी आपट्यांइतकीच विपुल व प्रसंशनीय झाली आहे. यांच्या खालोखाल ज. र. आजगांवकर, द. अ. आपटे म. का. कारखानीस, रा. ग. गडकरी, एन जी. लिमेय इत्यादिकांचाहीं या कामीं हातभार लागला असून, एस. व्हीं. सरवटे व स. हुदलीकरासारख्या गृहस्थांचीही दृष्टि केव्हां केव्हां या विषयाकडे वळलेली दिसून येते.

शाळोपयोगी व तत्सम वाङ्मय आम्हांस सोडूनच दिलें पाहिजे. पण तें सोडले असतांही नुस्त्या काव्य, नाटकें, गोष्टी व

चरित्रें या चारच सदरांत या अवधींत पुढील प्रमाणें ६५ पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत.

काव्यें—आपटे, द. अ. झोंपाळ्यावरची गीता ( १९१७ ), आपटे, व्ही. टी. बालपद्यावली ( १९२१ ), कारखानीस, म. का. मुलांकरितां कविता ( १९२१ ), काळे, एस. एस. पद्यमंजरी ( १९२० ), कोरटकर, व्ही. के. बालकाव्यलहरी ( १९२४ ), कुंटे, व्ही. जे. बालक ( १९२० ), जननीजनकज—बाहुलीचें लग्न ( १९२४ ), बेहरे, ना. के. मुलांची गाणीं ( १९१९ ), मराठे, व्यं. धों. झोंपाळ्यावरचें रामायण ( १९१८ ), महजन, बी. व्ही. बालसुभाषित ( १९१९ ), मोडक, जी. के. मुलांकारितां भेंड्या ( १९२६ ), लिमये, एन. जी. बालगीत ( १९२३ ) व मुलांकरितां गोड गाणीं ( १९१७ ), मुलांकरितां कांहीं गाणीं ( १९२४ ) इ.

नाटकें—आपटे, वा. गो. नाट्यभारत ( १९१८ ); नाट्यरामायण (१९१८), करंदीकर, के. व्ही. गोपाळकाला (१९१९), करमरकर, सौ. राधाबाई. नाट्यरूप भीष्मचरित्र ( १९२६ ), कारखानीस, म. का. सुशिला ( १९२७ ), घैसास, एस. जी. प्रल्हादजयंत (१९२३), ठक्कार, मा. र. बालवीर (१९१७) दोंदे, एम. व्ही. भरतभाव ( १९२४ ), फाटक जी. के. बालगोपाल

( १९२६ ), आरोग्य ( १९२५ ) बंड्याची असहकारिता ( १९२२ ) इ.

गोष्टी—आपटे, वा. गो. परिस्तानांतल्या गोष्टी ( १९२७ ), ओक, एन. ए. थोर विभूतींच्या सुरस कथा ( १९१९ ), करमरकर वि. वि. जोडाक्षर विरहित असलेलें मुलांचें मनोरंजन (१९२३), बाळरंजनमाला ( १९२२ ); भारतरत्नमाला ( १९२२ ), मुलांकरितां बोधपर गोष्टी ( १९२२ ) सुबोध भारत ( १९२३ ), किनरे, कृ. गो. मुलांचा शीलशिक्षक ( १९२४ ) वानराचा देव ( १९२२ ); गडकरी, रा. ग. चिमुकली इसापनीति ( १९२४ ); मुलांकरितां मुलांच्या गोष्टी ( १९२१ ) जोशी बी. बी. इनाममदाराचा बाळू ( १९२१ ), नागपूरकर, व्ही. पी. आई, मी तुझाच आहे ( १९२२ ) बर्वे, कृ. म. बालरंजन ( १९१७ ), भिडे, शांताबाई, जोडाक्षर विरहित गोष्टी ( १९२३ ) महाजन, बी. व्ही. मुलांमुलींकरितां बोधपर गोष्टी ( १९१३ ), मिसाळ, पा. ना. कन्याभूषण ( १९२२ ) केवळ आपल्याच कर्तबगारीवर ( १९१७ ) चांगलाच धडा मिळाला ( १९२६ ); थोरांचें बालपण ( १९२६ ) बालबोधसुधा ( १९२३ ), सन्मार्गरत्नावली ( १९२३ ); सद्वर्तनाची कसोटी ( १९२१ ); सरवटे, एस. व्ही, लहान मुलांच्या सुरस गोष्टी ( १९१९ ) सिद्ध रा. बालादर्श ( १९२३ ) व. हुदलीकर, स. बुर्धी ( १९२४ ) इ.

चरित्रें—करमरकर, वि. वि. महाराष्ट्राचे पंचप्राण (१९२१); मुलांचे रामदास (१९२९); सुबोध कृष्णचरित्र (१९२९); सुबोध रामचरित (१९२३); किनरे, कृ. गो. भार्गेत तुळस अथवा प्रल्हाद ( १९२१ ) समर्थांचें बालबोध चरित्र ( १९२२ ) व दीक्षित, के. एच. मुलांमुलींकरितां बालबोध संत ( १९२३ ) इ.

## लेखांक ५ वा.

## वर्तमानपत्रें.

देशी वर्तमानपत्रांचा आरंभ स. इ. १८२२ मध्यें झाला व त्याचे पहिले जनक विल्यम केरी साहेबच होत. सन १८२३ सालांत डेनिस संस्थानांतील लहानशा ख्रिस्ती मंडळी करितां मिशन-र्‍यांनीं ‘ समाचारदर्पण ’ या नावाचें एक वर्तमानपत्र सुरू केलें. त्या वेळीं हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल मार्किस ऑफ हेस्टिंग्ज हे ह्या वर्तमानपत्राचे मोठे पुरस्कर्ते होते. त्यांनी आपणाकडून ह्या वर्तमान-पत्रास जितकें उत्तेजन देववेल तितकें देण्यास मुळींच कसुर नाहीं. त्यांनी पोस्ट खात्यास ह्या वर्तमानपत्राच्या बाहेर गांवी जाणाऱ्या प्रतीवर टपाल खर्च अति अल्प घ्यावा असा हुकम दिला. या मुळें ह्या वर्तमानपत्राचा खप बराच होऊं लागला.

तथापि देशी वर्तमानपत्रांचा जन्म होणापूर्वी सुमारें पन्नास वर्षांपासुन या देशांत इंग्लिश वर्तमानपत्र निघत असे; त्याचें नांव

" हिकीज ग्याझिट. " हें इंग्लिश वर्तमानपत्र काढण्याचा मूळ उद्देश असा होता कीं, त्या वेळीं बंगाल इलाख्यांत जे थोडे बहुत इंग्लिश लोक होते त्यांची करमणूक व्हावी, आणि त्यांना देशोदेशाच्या बातम्या कळाव्या. या वर्तमानपत्रांत लिहिणारी मंडळी चांगली होती, यामुळें या पत्रांत कधीं कधीं सुरस, पोक्त व विचारपूर्वक लिहिलेले लेख येत असत.

त्या वेळी देशी वर्तमानपत्रांस कोणत्याच प्रकारचें महत्व नव्हतें. राजकीय प्रकरणासंबंधी सारी वाटाघाट काय ती इंग्लिश वर्तमानपत्रांत होत असे. परंतु लॉर्ड लिटन साहेबांच्या कारकीर्दीत जो देशी वर्तमानपत्रांसंबंधानें कायदा झाला व त्या वेळीं आपल्या लोकांनी आकाशपाताळ हालवून जो गवगवा केला, त्यावरून आपले लोक मुद्रणस्वातंत्र्याचें महत्व किती बाळगतात हें चांगलें कळून आलें. एडमन्ड साहेबानें सन १८२३ मध्यें " प्रेस रेग्युलेशन " म्हणजे वर्तमानपत्रांसंबधीं कायदा केला; त्यावेळीं श्री रामपूर येथें मिशनरी लोक एक वर्तमानपत्र प्रसिद्ध करीत होते, त्याशिवाय देशीं भाषेंत निघणारें दुसरें वर्तमानपत्र नव्हतें. असो.

वर्तमानपत्रें आणि मासिक पुस्तकें हीं जुळीं भावंडे असून, मुद्रणकला ही त्यांची जननी होय. आणि लोकशिक्षण व लोकमत निदर्शन हा या दोहोंचाही हेतू असला तरी महाराष्ट्रांत पहिल्यानें

वर्तमानपत्रेंतर नियतकालिकें निघालीं व नंतर वर्तमानपत्रें उदयास आलीं.

इंग्रजी राज्य होण्यापूर्वीं व वर्तमानपत्रें सुरू होण्यापूर्वीं आपल्याकडे कळवून घेण्याजोगें कांहीं वर्तमान घडत नसें, असें नाहीं. वर्तमानें घडत व तीं कळविलीही जात असत. पण तीं सारीं तोंडीं. राजेरजवाडे व संस्थानिक यांच्या पदरीं हरकारे असत व ते शहरांत घडणाऱ्या बातम्या नित्य श्रीमंत लोकांच्या घरीं पोंहोचवीत आणि बाहेर पाठवावयाच्या बातम्या सांडणीस्वाराबरोबर जांत. अर्थांत हीं बोलतीचालतीं वर्तमानपत्रें घेणें सर्वांसच कोठून परवडणार ?

परंतु इंग्रजी राज्यांत जसा गुरुमुखावलंबी शिक्षणपद्धतीचा लोप झाला, तसा ह्या तोंडी बातम्या पाठविण्याच्या प्रकाराचा लोप झाला. ह्मणजे मुद्रणकलेनें जसें गुरुमुखाचें महत्व कमी केलें तसेंच त्यानें वृत्तप्रसाराच्या वरीलसारख्या साधनांचेंही महत्व कमी केलें. या व अशा अनेक कारणामुळें मुद्रणकलेस अर्वाचीन सर्व सुधारणांचे एक प्रमुख अंग समजण्यांत येतें. आणि खरोखर, एकदां वर्गणी भरली कीं, वर्षभर आपल्या घरीं नित्य अगर सप्ताहिक बातम्या कळतात त्या मुद्रणाच्या प्रभावामुळेंच नव्हे कां ?

परंतु मुद्रण काय किंवा वर्तमानपत्रें काय अर्वाचीनकालीन सर्वच गोष्टी परस्परावलंबी आहेत एकाच्या मदती शिवाय दुस-

च्यास यशस्वी होतां येत नाहीं. उदाहरणार्थ, मुद्रणामुळें वर्तमानपत्रांच्या लाखो प्रति छापतां येण्याची सोय झाली हें खरें, पण पोस्ट व रेल्वे नसेल तर वर्तमानपत्रें बाहेर पाठविण्यास पूर्वींइतकाच त्रास पडेल व त्यांचा प्रसारही रेल्वे पोस्टामुळें होणाऱ्या प्रसाराइतका अमर्याद होऊं शकणार नाहीं. असो.

मराठींतील पहिलें वर्तमानपत्र भाऊ महाजन यांचें अेल्पिजाव 'प्रभाकर' ( १८४० ) हें होय. हें पत्र रविवारीं निघत असे व त्याचीं पृष्ठें ८ असून वर्गणी १२ रु. होती. हें पत्र फार दिवस चाललें नाहीं, पण त्या वेळीं या पत्रानें विष्णुशास्त्रीं चिपळूणकरांच्या निबंधमालेप्रमाणें लोकांस चटका लावून सोडला होता असा उल्लेख सांपडतो. आणि 'ज्ञानसिंधु,' 'धूमकेतू' 'ज्ञानोदय' (१८४१) व दुसरींही कित्येक वर्तमानपत्रें याच वेळीं मुंबईस निघालीं असल्याचा जरी दाखला सांपडतो तरी 'इंदुप्रकाश' ( १८६४ ) निघेपर्यंत मुंबईच्या पत्रांचा चांगलासा जम बसला नाहीं. असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

इंदुप्रकाशापासून मात्र मुंबईच्या वर्तमापत्रांची भरभराट होत चालली. इंदुप्रकाशाचे पहिले संपादक विष्णु परशुराम पंडित होत व त्यांच्या पत्रास न्या. रानड्यासारख्यांचें त्या वेळीं सहाय्य असे. वर्तमानपत्रांच्या इतिहासातून इंदुप्रकाशाचें नांव वगळलें जाणें शक्य

नाहीं व त्यानें आपल्या दीर्घायुष्यांत केलेली कामगिरीही सुप्रसिद्ध आहे आणि म्हणूनच साठ वर्षें उत्तम प्रकारें चालून अलीकडे हें पत्र बंद पडावें ही दिलगिरीची गोष्ट आहे.

परंतु पुणेंकरांनीं मात्र या बाबतींत आपली बाजू आजतागाईत उत्तम प्रकारें संभाळिली आहे. पुणें येथील सर्वांत जुनें वर्तमानपत्र 'ज्ञानप्रकाश' (१८४८–४९) हें होय, व हें पहिलेंच पत्र आज ८७ वर्षें अव्याहत चालत असावें ही गोष्ट त्याच्या चालकांस निःसंशय भूषणावह आहे. हें पत्र कृष्णाजी त्र्यंबक रानडे नांवांचे गृहस्थ काढीत असत व त्यालाही त्या वेळीं पुण्यांत असलेली जी प्रतिष्ठित मंडळी संपादक ह्मणून लाभली होती त्यांत 'लोकहितवादी.' कृष्णशास्त्री चिपळूणकर, बाबा गोखले वगैरे मंडळी प्रमुख होत. प्रथम निवळ मराठी, नंतर इंग्रजी-मराठी आणि आरंभीं साप्ताहिक, नंतर कांहीं दिवस आठवड्यांतून दोनदा व पुढें दैनिक अशीं 'ज्ञानप्रकाश' पत्राचीं त्याच्या पुढील इतिहासांत अनेक रूपांतरें झालीं तरी ज्येष्ठ ह्मणून आजही ज्ञानप्रकाशासच श्रेष्ठपणाचा मान द्यावा लागतो. 'ज्ञानचक्षू' 'विचार लहरी' वगैरे पुणेकरांचीं पत्रेंही याच काळाच्या जमेस आहेत.

पुणें व मुंबई येथें सुरू झालेली वर्तमानपत्रांची ही चळवळ महाराष्ट्रांतील दुसऱ्या ठिकाणीं पसरावयास अवधि लागला नाहीं.

लवकरच ' शुभसुचक '—सातारा ( १८५९ ), ' बेळगांव समाचार '—बेळगांव ( १८६४ ), ' वऱ्हाड समाचार '—आकोला ( १८६६ ), ' खानदेश वैभव '—धुळें ( १८६८ ), ' कल्पतरू' —सोलापूर ( १८६९ ), ' ज्ञानसागर '—कोल्हापूर ( १८७० ), ' सत्यशोधक '—रत्नागिरी ( १८७२ ) व ' आर्यावर्त '—धुळें ( १८७४ ) इत्यादि पत्रें निघाली व सुदैवानें आज मित्तीसही हीं हयात आहेत.

आरंभी आरंभी हीं सर्व वर्तमानपत्रें जरी अगदीं बालबोध असत तरी कालमानानुसार त्यांची सुधारणा व स्थित्यंतरें कशी होत गेली ही गोष्ट वर्तमानपत्रांच्या सुरुवातीनंतर पंचवीस वर्षांनीं पाहिली पाहिजे. असें करण्यास आपणाजवळ साधन आहे.

" सन १८७२ च्या मार्च महिन्यांत एका ' वर्तमानपत्र वाचणाऱ्यानें ' ज्ञानप्रकाशांत एक सविस्तर पत्र दिलें आहे. त्यावरून तत्कालीन मराठी वर्तमानपत्रांची स्थिति लक्षांत येते. तो लिहितो:— मराठी मजकुरासंबंधानें मुंबईत इंदुप्रकाशाचा नंबर पहिला येतो. त्याची भाषा पोक्त व संभावित असते. त्यांत राजकीय विषयाची भरती पण अवांतर लोकोपयोगी विषय नसतात. लेख लांब व कंटाळवाणे. एकंदरींत मतें चांगलीं पत्रव्यवहार पुष्कळ असतो. पण जिल्हानिहाय बातम्या नसतात. बातमी प्रायः इंग्रजी पत्रावरून

घेतलेली, ' नेटीव्ह ओपिनियन ' पत्रांतील इंग्रजी लेख कडक व निःपक्षपाती, पण हेळसांडीमुळें पत्राचें महत्व कमी झालें. त्यांतील मराठी भाग पहिल्यापासूनच सामान्य. भाषा साधारण. ' हिंदु रिफॉरमर ' हें नांव इंग्रजी, पण मजकूर थोडा व त्रुटित. चुका वगैरे फार. मराठी मजकूर बरा. पण तब्बेती कारखाना. क्वचित् पोरकटपणाही असतो. मुंबईतील इतर वर्तमानपत्रें रद्दी. ' ज्ञानोदय ' पत्रांत वर्तमानसार बरें; पण लेख केवळ धार्मिक. ' स्वदेशहितेच्छु ' नामक नवें पत्र निघे. होतकरू वाटतें; किंमतही दीड रुपाया, पण अद्यापि लोकांत बस बसलेला नाहीं पुण्यांतील पत्रापैकीं ' ज्ञानप्रकाश ' उत्तम; पण इंदुप्रकाशाइतकी लोकांत मान्यता नाहीं. त्यांत संस्कृत शब्द किंवा भाषेचा नटवेपणा नाहीं, कधीं फार कडक तर कधीं पोरकट असे लेख त्यांत येतात. पत्रव्यवहारांत थट्टा व कुचेष्टा विशेष. वर्तमानसार ठीक नसतें. इंग्रजी लेख भाषेच्या दृष्टीनें चांगले, पण ते नियमित शिस्तवार नसतात, ' ज्ञानचक्षू ' नें इंग्रजी मजकूर घालून सुधारणा केली होती. किंमतही कमी पण रंग टिकाऊ नाहीं असें म्हणतात. कोंकणांतील ' अरुणोदय, ' ' जनमित्र ' हीं पत्रें बरी. सूर्योदयानें इंग्रजी टाकून निवळ मराठी घेतलें. बेळगांवीं ' बेळगांवसमाचार ' व ' महाराष्ट्रमित्र ' हीं कांहीं बरी परंतु शेतकरी वगैरे वर्गांना उपयुक्त अशी माहिती सर्वत्रच कमी इत्यादि. '

वरील पत्रावरून या वेळच्या वर्तमानपत्रांच्या स्थितीवर चांगलाच प्रकाश पडतो, पण त्याबरोबरच आपणास वर्तमानपत्रा-वरील तत्कालीन टीकेचाही उत्तम मासला वाचावयास मिळतो.

तथापि मराठी वर्तमानपत्र जोमदार झालेलें पहावयास आपणास या कालाच्याही थोडें पुढें गेलें पाहिजे. सन १८८० पर्यंतची त्याची कामगीरी कितीही वाखाणण्यासारखी असली तरी खरें चैतन्य त्यास या नंतरच मिळालें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे 'केसरी' ( १८८१ ) निघेपर्यंत कोणत्याही मराठी वर्तमान-पत्राची छाप लोकमतावर पाहिजे तशी पडलेली अथवा त्यास लोकमुखाचें महत्व मिळालेलें दिसून येत नाहीं.

आणि असें होणें संभवनीय पण नव्हतें. उगीच फावल्या वेळीं काम पाहिजे म्हणून अथवा लोकांस इकडच्या तिकडच्या चार गोष्टी कळाव्या म्हणून वर्तमानपत्रांचा व्यवसाय करणारांची योग्यता तितक्याच बेताची असणार आणि संपादकांच्या योग्यतेनुसार त्यांचें पत्र असणार हें उघड आहे.

'केसरी' वर्तमानपत्र सर्वच बाबतींत निराळें होतें. त्याची दिशा निराळी, तयारी निराळी, महत्वकांक्षा निराळी, धडाडी निराळी—सारांश, त्याची प्रत्येक बाबत त्याच्या पूर्वींच्या सर्व वर्तमानपत्रांहून अगदीं निराळी असल्यामुळें प्रथमपासूनच त्यानें

लोकांवर निराळी छाप पाडली. आणि असें कां न व्हावें ? विष्णुशास्त्री चिपळूणकर, गोपाळ गणेश आगरकर व लो. बाळ गंगाधर टिळक ह्या उच्च शिक्षण मिळविलेल्या व उच्च ध्येयानें प्रेरित झालेल्या तरुण त्रिमूर्तींच्या संपादनाची जोड मिळाल्यावर त्याच्या केसरीनें आपला प्रभाव लवकरच दाखवीला नसता तर आश्चर्य !

वास्तविक पाहता विष्णुशास्त्री यांच्या निबंधमालेंतच केसरीच्या पुढील कार्याचे बीजारोपण झाल्याचें आढळून येतें. फरक इतकाच कीं, निबंधमाला मासिक तर केसरी साप्ताहिक. मासिकामुळें निबंधमालेचें कार्यक्षेत्र मर्यादित ठेवावें लागलें तर साप्ताहिक झाल्यामुळें केसरीचें कार्यक्षेत्र अमर्याद वाढलें. निबंधमालेचा संपादक एक तर केसरीस समानबल असे तीन संपादक लाभले. सारांश एखाद्यास मराठी वर्तमानपत्रांचा इतिहास लिहावयाचा झाल्यास त्यास केसरीपासूनच दुसऱ्या कालखंडास सुरू करावी लागेल इतका त्याच्यांत आणि त्याच्यापूर्वीच्या वर्तमानपत्रांत फरक आहे.

परंतु केवळ अंतर्व्यवस्था उत्तम असल्यामुळें केसरीची प्रतिष्ठा वाढली असें नाहीं. त्याची प्रतिष्ठा वाढण्यास बाह्य परिस्थितीही तितकीच कारणीभूत झाली. केसरी पत्र निघण्याचें वेळीं देशस्थिति व लोकस्थिति इतकी नाजुक होती कीं, त्या वेळी ती

केसरी सारख्या पत्रानेंच सांवरून धरावयास पाहिजे होती, असें वाटल्यावाचून रहात नाहीं. उदाहरणार्थ, केसरीपूर्वी प्रांतानिहाय वर्तमानपत्रें निघत होती. आणि पुणें मुंबई येथें तर दोन दोन; चार चार वर्तमानपत्रें चालत होती. पण कोणाच्याही कानाला लोक-पक्षाची हाक ऐकूं आली नाहीं.

ती हाक प्रथम केसरीनें ऐकिली व या मुळेंच ह्मणजे वर्तमान-पत्रकारांच्या कर्तव्यास जागृत झाल्यामुळेंच केसरीपत्र लोकप्रिय व कालेंकरून लोकमान्य बनले.

देशविषयक कामगिरीप्रमाणें केसरीची वाङ्मयविषयक काम-गिरीही महत्वपूर्ण आहे. आणि ज्यांचीं नावें अर्वाचीन मराठी वाङ्मयास ललामभूत झालीं आहेत अशा चिपळूणकर आगरकर—टिळकासारख्या धुरंधर लेखकमंडळींचे संपादकमंडळ लाभल्यावर केसरीकडून ही कामगिरी इतकी महत्वपूर्व व्हावी हेंही साहजिक आहे. केसरीपासूनच मराठी भाषेचा ओज निदर्शनास आला व केसरीमुळेंच त्यास स्थैर्य आलें. केसरीपासूनच मराठी वर्तमानपत्र कारांचा दृष्टीकोण बदलला व केसरीपासूनच वर्तमानपत्रांच्या नव्या मन्वंतरास सुरुवात झाली असें ह्मणावयास हरकत नाहीं.

वृत्तप्रसाराइतकेंच वर्तमानपत्र हें स्वमतप्रसाराचें एक उत्कृष्ट साधन आहे असें ‘ केसरी ’ मुळें एकपट निदर्शनास आलें अस-

त्यास ‘ सुधारक ’ ( १८८८ ) निघाल्यानें या विधानास दुप्पट बळकटी आली. आगरकरांनां हें पत्र कां काढावें लागलें व ‘ सुधारकानें ’ आपल्या अल्पायुष्यांत काय कामगिरी केली इत्यादि बाबतींत येथें आम्हांस शिरणें नाहीं, पण वृत्तपत्रांच्या हिताच्या दृष्टीनें पाहिलें असतां केसरी–सुधारकाचा झगडा फारच उपकारक झाला असें म्हणावें लागतें. एक काल असा होता कीं, ज्या वेळीं केसरीमुळें सुधारक व सुधारकामुळें केसरी वाचणें आगत्याचें होतें. एकाच्या लेखांतील रहस्य समजणें दुसऱ्यांतील लेखांचें अध्ययन करण्यावर अवलंबून होतें. एके वेळीं हीं दोन्हीं पत्रें वाचविण्याविषयीं लोक सारखेच उत्सुक असत व आगरकरांच्या हयातीपर्यंत ह्या दोन्हीं पत्रांविषयीं लोकांच्या ठिकाणीं सारखीच आदरबुद्धि वसत असे. किंबहुना सुधारक न निघतां तर न जाणो केसरीच्या प्रसारास जी चालना मिळाली ती न मिळती. सारांश, वर्तमानपत्रांच्या सुरुवातीस ‘ केसरी ’ व ‘ सुधारक ’ या दोन वर्तमानपत्रांमुळें वर्तमानपत्रें वाचण्याची गोडी लोकांच्या ठिकाणीं अधिकाधिक दृढमूल होत गेली व ह्या गोडीचा पुरवठा या जोडी-पैकीं पहिलें पत्र आजमित्तीस देखील किती उत्तमप्रकारें करीत असतें हें जगजाहीर आहे.

केसरी–सुधारकाबरोबरच ‘ जगदादर्श ’ अहमद–नगर ( १८८१ ), ‘ बकुल ’–रत्नागिरी ( १८८२ ). ‘ वृत्तसार ’

वाई ( १८८४ ), ' सोलापूरसमाचार '—सोलापूर ( १८८४ ), ' चिकित्सक '—बेळगांव ( १८८६ ), ' व्यापारी '—पुणें (१८८८) ' मोदवृत्त '—वाई ( १८८९ ), ' विद्याविलास ' कोल्हापूर ( १८९० ) व ' सयाजीविजय '--बडोदें ( १८२९ ) इत्यादि अनेकं पत्रें निघालीं म्हणूनच नव्हे तर तीं सन १९१५-१६ पर्यंत चालत असलेलीं नोंध आहे म्हणून उल्लेखनीय आहेत.

परंतु दोघांच्या भांडणांत तिसऱ्याचा लाभ कसा होतो हें ' करमणूक ' ( १८९० ) पत्रावरून कळतें. ' केसरी ' व ' सुधारक ' या दोन पत्रांनीं लोकांत वाचनाभिरुचि उत्पन्न केली हें खरें, पण ध्येयविशेषामुळें ह्या दोन्ही पत्रांतील लेख सर्वसामान्य जनतेस आवडण्यासारखें नसत. कित्येकांच्या दृष्टीनें ते रुक्ष ठरत तर कित्येकांस त्यांतील राजकारण कळत नसे. ही स्थिति आपट्यांनीं ओळखिली आणि त्यांनीं आपलें ' करमणूक ' पत्र सुरूं केलें. हें पत्र आपट्यांनी कां सुरूं केलें हें त्यांच्याच शब्दात सांगितलें असतां वरील विधानास उत्तम बळकटी येते. ते म्हणतात.

" केसरी—सुधारक एखाद्या कठोर पित्याप्रमाणें कठोर शद्बानें सांगणार व समाजाचें अप्रशस्त वर्तन झाल्यास वेळीं वाक्प्रतोदाच तडाखे लगावणार. तीच गोष्ट हें पत्र प्रेमळ मातेप्रमाणें गोडगोड शब्दांनी सांगणार व अप्रशस्त वर्तनाबद्दल गोडगोड गोष्टींनीं मायेचें शासन करणार. एवढें मात्र लक्षांत ठेवावें कीं, हें पत्र

आचरट आईप्रमाणें फाजिल लाड करणार नाहीं........ज्यास पुढील माडीपासून चुलीपर्यंत व दिवाणखान्यांतील टेबलांपासून फणीकरंड्याच्या पेटीपर्यंत कोणाच्याही हातीं पडलें तरी हवें त्यानें, हवें त्यांच्या देखत निःशंकपणें वाचण्यास हरकत नाहीं, असें पत्र पाहिजे असेल त्यांनी करमणुकीच वर्गणीदार अवश्य व्हावें ”

आपट्यांची विनंती मान्य झाली. जेथें ‘केसरी–सुधारक’ तेथ ‘ करमणूक ’ दिसूं लागलें. केसरी–सुधारकाचे एकमेकावरील शब्द प्रहार ऐकलेल्या कानास ‘ करमणूक ’ पत्रानें विरंगुळा मिळूं लागला. आणि साप्ताहिक पण मनोरंजक वर्तमानपत्र लोकांस वाचावयास मिळूं लागलें. जसे केसरी पूर्वी केसरीसारखें व सुधारका-पूर्वी सुधारकासारखें पत्र नव्हतें तसें करमणूकीपूर्वी त्या सारखें मनोरंजक व उद्बोधक वर्तमानपत्र निघालें नव्हतें.

‘ करमणूक ’ पत्रानें काय कामगिरी केली ! आपट्यांच्या कादंबऱ्यांचा मराठी विदग्ध वाङ्मयांत दर्जा कोणता ? इ. प्रश्न अलाहिदा आहेत. त्यांच्याशीं येथें आम्हांस कांहीं कर्तव्य नाहीं. पण नुस्तें वर्तमानपत्र या नात्याची त्याची कामगिरी पाहूं गेलें असतांही ती मराठी वर्तमानपत्राच्या इतिहासांत अत्यंत श्रेष्ठ प्रकारची ठरेल. लोकशिक्षण व उपयुक्त ज्ञानप्रसार हीं जर वर्तमान पत्रांचीं महत्वाचीं अंगें मानिलीं जातील, तर या बाबतींत ‘ करम-

णूक ' पत्र अपूर्व होतें व हा लौकिक त्याच्या बलवान संपादकानें त्याच्या हयातीपावेतो कायम ठेविला होता.

आणि खरोखरीच केसरी–सुधारक पत्रें निघालीं त्या वेळीं तीं न निघणें जसें हानिकारक होतें तसें करमणुकीसारखें मनोरंजक पत्र त्या वेळीं न निघणेंही हानिकारक होतें अशा एखाद्या पत्राच्या अभावीं वर्तमानपत्रांना मिळूं पाहणारें वादविवादाच्या आखाड्याचें स्वरूप कांहीं निराळ्याच प्रकारांत पर्यवसान पावलें असतें अथवा केसरी–सुधारकापूर्वींच्या वर्तमानपत्रांप्रमाणें तीं केवळ प्रथम कालांत शोभण्यासारखीं असतीं.

' करमणूक ' पत्रानें ही अनवस्था दूर केली. ' करमणूक असें अन्वर्थक नांव आपट्यांनीं आपल्या पत्रास दिलें असलें तरी ' लहानापासून थोरापर्यंत सर्व स्त्रीपुरुषांचें मनोरंजन करून ज्ञान देणारें हें पत्र दर शनिवारीं निघतें ' असें ते करमणूक पत्रावर छापात, व या ध्येयाची करमणुकीस सदैव स्मृति असे. सारांश, मनोरंजक पद्धतीनें ज्ञानप्रसाराचें वर्तमानपत्राचें काम प्रथम ' करमणूक ' पत्रानें केलें असल्यामुळें कादंबरीकार म्हणून तर खरेंच, पण त्याबरोबरच एक यशस्वी वर्तमानपत्रकार या नात्यानेंही आपट्यांचा खचित गौरव करतां येईल. असो.

सन १८२० पुढील वर्तमानपत्रांच्या भरभराटीस सन १८९० पुढील कालच जबाबदार आहे. सन १८९० नंतर महाराष्ट्रांत अनेक

चळवळी सुरू झाल्या व त्यांच्याबरोबर त्या त्या चळवळींचा तिरस्कार अथवा पुरस्कार करणारीं वर्तमानपत्रेंही निघालीं. 'काळ', 'भाला', 'विहारी', 'राष्ट्रमत', 'राजकारण' इ. वर्तमानपत्रें आज जरी नामशेष आहेत तरी कांहीं काळ य आपापल्या पक्षाची बहुमोल कामगिरी केली आहे. विशेषतः वर्तमानपत्रांविषयीं सरकारचें दडपशाहीचे धोरण जों जों वृद्धिंगत होऊं लागले तों तों महाराष्ट्रपक्ष व महाराष्ट्रीय वर्तमानपत्रें बलवान होत गेलीं व त्याचें द्योतक 'संदेश', 'लोकमान्य', 'नवाकाळ', इ. दैनिकें व 'महाराष्ट्र', 'स्वराज्य', 'लोकसंग्रह' इ. साप्ताहिकें होत.

'धर्म' वर्तमानपत्र बंद पडलें तरी 'आचार्य' पाक्षिक सनातनधर्माचा या कालांत चांगलाच पुरस्कार करीत होते. आणि दीनबंधूचें रूपांतर दीनामित्रांत ( १९१० ) होऊन 'बहिष्कृत-भारत', 'हिंदनागरिक', 'विश्वबंधु' 'मूकनायक', 'राष्ट्रवीर' 'विजयीमराठा', 'जागरूक' 'जागृति' इ. ब्राह्मणेतर व मागासलेल्या वर्गाची नवीन वर्तमानपत्रें निघालीं व हीं वर्तमानपत्रेंही आपापल्या पक्षाची चांगली कामगिरी करीत आहेत.

'करमणूक' वर्तमानपत्राची जागा या पुढें 'प्रफुल्लता' पत्रानें घेतली असतां 'मौज' व तत्सम वाङ्मयास वाहिलेलीं दुसरींही कित्येक वर्तमानपत्रें निघालीं आहेत आणि: सर्व प्रकारचीं

महाराष्ट्रीय पत्रें जमेस धरल्यास त्यांची संख्या अलीकडे पन्नासाहून कमी नसते.

अलीकडे दैनिकें, अर्धसाप्ताहिकें, साप्ताहिकें, दाशाहिकें आणि पाक्षिकें इ. वर्तमानपत्राविषयींचे सर्व प्रकार अस्तित्वांत आले आहेत आणि सर्व प्रकारच्या विषयांस वर्तमानपत्रांत स्थान मिळूं लागलें आहे. तीं आतां विश्वव्यापी व विराटस्वरूपी बनलीं आहेत. केवळ महाराष्ट्रापुरतें पाहिलें तरी त्याच्या पूर्वींच्या वर्तमानपत्रांत व आतांच्या वर्तमानपत्रांत जमीन अस्मानचें अंतर पडलें आहे. तो काळ गेला व त्याबरोबर त्या काळास शोभणारीं वर्तमानपत्रें गेलीं अथवा त्यांच्या स्वरूपांत कालमानानुसार फरक पडत गेला.

शेवटीं पूर्वींच्या व आतांच्या वर्तमानपत्रांची एका मर्मज्ञांनीं केलेली मौजेची छाननी उद्धृत करून या प्रकरणाचा समारोप करतो. ते म्हणतातः—

त्यांत ( पूर्वींच्या वर्तमानपत्रांत ) "चर्चा, वादविवाद, या गोष्टी तेव्हां सर्वस्वी नवीन नसल्या तरी वर्तमानपत्रांतून त्या माजण्याइतकीं पुष्कळशीं वर्तमानपत्रें नसत; व सार्वजनिक चळवळ ही गोष्ट तर माहीत नव्हतीच नव्हती. ज्ञानार्जनाचा व्यापार व विनिमय हल्लीं घाऊक होतो तो तेव्हां किरकोळीनें होत असे. एखाद्या प्रांतांत एकच लहानसें वर्तमानपत्र असलें तर त्याला दुसऱ्याशीं वाद करण्याला जागा किंवा प्रसंगच असत नाहीं. आज वर्तमान पत्रांतील लेखांना जाहीर व्याख्यानांचें, संभाषणांचें, किंवा

पंडित सभेंतील वादाचें स्वरूप आहे तसें या जुन्या काळीं नसून ते केवळ आत्मगत भाषणाचें होतें. त्या वेळचीं वर्तमानपत्रें हीं ' वर्तमानपत्रें ' हें नांव आजच्याहून अधिक सार्थ करणारीं होतीं. बाजारांत, गुजरींत, चव्हाट्यावर, अड्यावर, गर्दींत माणसें भेटलीं असतां, मुंग्याप्रमाणें क्षणभरच तोंडास तोंड देऊन, एकमेकांना नुस्ती बातमी सांगून जशीं पुढें जातात, त्याच रितीनें तेव्हांचीं वर्तमानपत्रें संक्षिप्त हकीकत लिहून जातांजातां क्वचित एखादें वाक्य टीकेचें लिहीत. अशाहि वेळीं लिहिणारांना मतें नव्हतीं असें नाहीं तर मतें प्रतिपादन करण्याचा जसा आखाडा हल्लीं पडला आहे तसा तो तेंव्हां पडलेला नव्हता. फार तर मतें ओघानें बोलून जात, पण त्याची साधकबाधक चर्चा होत नसे. तेव्हांचीं वर्तमानपत्रें म्हणजे खाणींतून उकरून काढलेल्या अनगड हिऱ्याच्या दगडासारखीं म्हटली तर, हल्लींचीं वर्तमानपत्रें त्याच दगडाला घासून हजारो पैलू पाडलेल्या व किरणांचें जाळें पसरणाऱ्या गुलाबी फुलांच्या हिऱ्यासारखीं ठरतात. तेव्हांचें वर्तमानपत्र वाचणें म्हणजे एखाद्या अंधाऱ्या बोगद्यांतून दुसऱ्या टोकास दिसणाऱ्या उजेडांतलि वस्तु न्याहाळण्यासारखें असे. हल्लींचें वर्तमानपत्र वाचणें म्हणजे प्रदर्शनांत कित्येक वेळां केलेल्या कृत्रिम आरसे महालांत उभें राहिल्या सारखें वाटतें ! तें असें कीं जिकडे पहावें तिकडे एकाच्याच अनंत मूर्ति चकाकतात ! ”

न. चिं. केळकर.

# चरित्र खंड.

**सदाशिव काशिनाथ छत्रे** (१७८८–१८३०) कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म मुंबईस वाळकेश्वरीं झाला. यांच्य प्राथमिक शिक्षणासंबधीं कांहीं अधिक माहिती मिळत नाहीं; तथापि त्या काळच्या प्रघाताप्रमाणें त्यांस मराठी व संस्कृताचे बरेंच शिक्षण मिळालें असावें, असें मानण्यास हरकत नाहीं. यांचें इंग्रजी शिक्षण खासगी रीतीनें एका मिशनरीजवळ झाल्याची लोकवार्ता आहे. याच मिशनरीच्या शिफारशीनें ह्यांचा प्रवेश सरकारी नोकरींत झाला व हे देशी शाळांचे तपासनीस ह्मणून नेमले गेले. हें काम बापूसाहेबांस सन १८१४ च्या सुमारास मिळालें व तें त्यांनीं १७ वर्षे केलें असें म्हणतात. या अवधींत त्यांनीं शिक्षणप्रसाराचें काम फार केलें अशी प्रसिद्धि आहे. यांनी लोकांस उपदेश करून इंग्रजी विद्येसंबंधाचे त्यांचे दुराग्रह नाहींसें केले व पुष्कळ गरीब मुलांस उत्तेजन देऊन त्यांस शिक्षणलाभ करून दिला.

परंतु ज्यावरून यांचें नांव महाराष्ट्रांत इतकें प्रसिद्ध आहे असें त्यांचें कृत्य म्हणजे ग्रंथलेखन हें होय. यांनीं केलेलं सुप्रसिद्ध असे दोन ग्रथ आहेत. ते बाळमित्र व इसापनीति हे होत. ह्या ग्रंथांचें मराठी भाषांतर करण्याची सूचना या वेळचे विद्याधिकारी यांनीं बापूसाहेबांस केली होती. त्या वेळीं बापूसाहेबांची मराठी भाषेंतील प्राविण्याविषयीं मोठी ख्याति होती. या वरील पुस्तकांचा विषय मनोरंजक आणि बोधप्रद आहे. त्यांत भाषांतरकार पूर्ण रसिक, मार्मिक

आणि उत्तम भाषावेत्ते मिळाल्यामुळें हीं भाषांतरें सर्वोत्कृष्ट उतरलीं आहेत. [ ज. र. आजगांवकर ]

**परशुराम बल्लाळ गोडबोले** ( १७९९–१८७५ ) नवनीताचे हे लोकप्रिय संपादक आणि नामांकित अर्वाचीन कवि वाई येथें जन्मले. हे जातीचे कोंकणस्थ हिरण्यकेशी ब्राह्मण. यांचें प्राथमिक शिक्षण वाई येथेंच झालें. नंतर नारायणशास्त्री देव ह्यांजपाशीं यांनीं संस्कृतचा अभ्यास केला. ह्याचें मोडी अक्षर फार सुंदर असून ह्यांना जमाखर्चाची माहिती चांगली होती. कविता करण्याचा नाद ह्यांना पूर्ववयांतच लागला, व तो त्यांच्या वयाबरोबर उत्तरोत्तर वृद्धिंगत होत गेला, आणि त्याच्यायोगानेंच हे प्रसिद्धीस आले. पुढें मराठी भाषेचा कोश तयार करण्यासाठीं सरकारी शिक्षणपरिषदेनें जें शास्त्रीमंडळ नेमलें त्यांत ह्यांची योजना झाली. हें काम करीत असतां पूना कॉलेजचे पहिले मुख्य गुरु मेजर कँडीसाहेबांचा आणि परशुरामपंतांचा परिचय झाला. त्यानंतर मराठी क्रमिक पुस्तकें रचण्याकरितां सदरहू साहेबांस सरकारानें मराठी भाषांतरकार म्हणून नेमलें तेव्हा तात्यांस त्यांनीं मराठी पंडीत या नात्यानें आपल्या मदतीसाठीं मागून घेतलें. त्या पुस्तकांतून कविता घालण्याचें सर्व काम कँडीसाहेबांनीं तात्याकडेच सोंपविलें होतें. यांच्या कारकिर्दीत विद्याखात्यानें जे जे मराठी ग्रंथ प्रसिद्ध केले त्यांचें तात्यांनीं मोठ्या मार्मिक रीतीनें संशोधन केलें. त्याच साहेबांच्या सूचनेवरून ह्यांनीं प्राचीन

मराठी काव्यांतून वेंचे निवडून ते ' नवनीत ' ह्या नांवानें प्रसिद्ध केलें ह्या नवनीतद्वारा महाराष्ट्रियांस आपल्या प्राचीन मराठी कवींची प्रथम ओळख तात्यांनींच करुन दिली, असें म्हटलें असतां चालेल. गद्यपद्यात्मक संस्कृत नाटकांचा मराठी भाषेंत प्रतिबिंब उतरण्याचा क्रमही त्यांनींच सुरू केला. उत्तररामचरित्र, वेणीसंहार, मृच्छकटिक वगैरे नाटकांचो ह्यांनीं केलेलीं भाषांतरें सर्वोत्कृष्ट असून प्रसिद्ध आहेत. पुढें माधव चंद्रोबा डुकले ह्यांनीं मराठी काव्याचा जीर्णोद्धार करण्याकरितां ' काव्यसंग्रह ' करण्याचें काम सुरू केलें. त्याचें संपादकत्वही परशुरामपंत तात्याकडेच होतें. वरील भाषांतराशिवाय यांनीं केलेले बालबोधामृत, वृत्तदर्पण, मराठ्यांच्या इतिहासावरील सोप्या कविता, नामार्थदीपिका वगैरे ग्रंथही प्रसिद्ध आहेत य.ची कविता सुलभ, हृदयंगम आणि प्रौढ आहे. [ अर्वाचीन कविता ]

**मेजर टी. क्यांडी** ( १८०६–१८७७ ) इंग्रज खिश्चन. हे सन १८२२ त हिंदुस्थानांत आले व ईस्ट इंडिया कंपनींत लष्करी अंमलदार झाले. कॅप्टन मोलस्वर्थनें जो मराठी कोश लिहिला त्यांत ह्यांनीं त्यांस साहाय्य केलें. मोलस्वर्थ विलायतेस गेल्यावर तो ग्रंथ तसाच अपूर्ण राहिला होता तो ह्यांनी सन १८४० त हातीं घेऊन सात वर्षांत पूर्ण केला. सन १८५१–१८५७ पर्यंत हे पूना कॉलेजचे प्रिन्सिपाल होते. माजी मराठी क्रमिक पुस्तकें यांच्याच हातचीं होत. इंडियन पिनलकोड आणि सिव्हिल प्रोसिजर कोडचें मराठी पहिलें भाषांतर यांनींच केलें. ( मनोरंजन )

**बाळ गंगाधर शास्त्री जांभेकर** ( १८१०–१८४६ ) पुराणेतिहास संशोधक * ह्यांचा जन्म दक्षिण कोंकणांत राजापुराजवळ पोंगुरले म्हणून एक गांव आहे तेथें झाला. हे सन १८२९ त एलफिन्स्टन इनस्टिटयूटचे शिक्षक झाले. शालोपयोगी पुस्तकें तयार करण्याचें काम आरंभीं यांनींच केलें. यांनीं ' दिग्दर्शन ' व ' दर्शन ' या नांवाचीं नियतकालिकेंही कांहीं दिवस चालविलीं होती.

**मोरोबा कानोबा विजयकर** ( १८१३–१८७१ ) पाठारे प्रभु. पाठारे प्रभु ज्ञातींतील पुनर्विवाहपक्षाचे अग्रणी होते व स्वतःच्या उदाहरणानें यांनीं तसा कित्ताही घालून दिला होता. हे सरकारी मोठमोठ्या हुद्यांचीं कामें करून सदर अमीनच्या हुद्यापर्यंत चढले होते व शेवटीं मुंबईतील स्मॉलकाज कोर्टाचे जज्ज झाले यांनीं ' घाशीराम कोतवाल ' नांवाची मराठी कादंबरी लिहिली आहे.

( मनोरंजन )

**दादोबा पांडुरंग तर्खडकर** ( १८१४–१८८२ ) वैश्य यांचें प्राथमिक शिक्षण मुंबईंत एलफिन्स्टन इन्स्टिटयूशनमध्यें झालें. विद्यार्थी असतांनाच यांनीं आपलें मोठें व्याकरण लिहून प्रसिद्ध केलें. दादोक्त व्याकरणाच्या साहाय्यानें मराठी भाषेचें ज्ञान सर्व महाराष्ट्रीयांस झालें आहे व होत आहे. सरकारानें ' रावबहादूर ' ही पदवी देऊन यांचा गौरव केला होता. यांनीं व्याकरणाशिवाय शिशुबोध, यशोदा-पांडुरंगी इत्यादि पुस्तकेंही केलीं आहेत. ( मनोरंजन )

---

*राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद. लोकशिक्षण वर्ष १ लें.

**गोविंद नारायण माडगांवकर** ( १८१५–१८६५ ) सारस्वत ब्राह्मण. हे नऊ वर्षांचे असतांना गोव्यांतून मुंबईस आले. इंग्रजी शिक्षण झाल्यावर यांनीं डॉ. विल्सन यांचे शाळेंत नोकरी धरली व शेवटपर्यंत याच शाळेंत हे हेडमास्तर होते. नोकरी संभाळून राहिल्या वेळांत हे गरीब विद्यार्थ्यांस परोपकारार्थ शिकवीत असत. अशा विद्यार्थ्यांपैकीं पुढें नांवालौकिकास चढलेले डॉ. भाऊ दाजी, ना. नारायण वासुदेव दाभोळकरप्रभृति यांचेच सच्छिष्य होत. फावल्या वेळेंत हे मराठी ग्रंथही लिहीत असत. यांची लेखनशैली नाणावलेली असे. यांनीं सृष्टींतील चमत्कार, मुंबईचें वर्णन, उद्भिजपदार्थविज्ञान, वृक्षवर्णन, सुलेखनविद्या इत्यादि दहा पंधरा पुस्तकें लिहिलीं आहेत. यांची भाषा शुद्ध सरळ व गोड असे. ( मनोरंजन )

**कृष्णशास्त्री केशव राजवाडे** ( १८२०–१९०१ ) भाषांतरकार. * कोंकणस्थ ब्राह्मण. यांनीं पुणें येथील विश्रामबाग पाठशाळेंत न्याय, अलंकार, वेदांत व धर्म या विषयांचें अध्ययन केलें. सन १८४१ त यांना त्याच पाठशाळेंत अलंकारशास्त्राच्या उपगुरूची जागा मिळाली. स. १८५६ त मराठी एज्युकेशन डिपार्टमेंटमध्यें पंडिताच्या जागीं यांची नेमणूक झाली. हे चांगले लेखक आणि कवि होते यांची मालतीमाधव, मुद्राराक्षस, उत्सवप्रकाश व ऋतुवर्णन वगैरे पुस्तकें प्रसिद्ध आहेत. ( मनोरंजन. )

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण वर्ष १ लें.

**गोपाळ हरि देशमुख** ( १८२३-१८९२ ) निबंधकार व सुधारक. + कोंकणस्थ ब्राम्हण. यांचा जन्म पुणें येथें झाला व मराठी आणि इंग्रजी शिक्षण पुण्यासच झालें. सन १८४४ त यांना पुण्याच्या जज्ज कचेरींत ७७ रुपये दरमहाची इंग्रजी ट्रान्स्लेटरची जागा मिळाली. ज्ञानप्रकाश छापखाना व पुणें नगर वाचनालय या सस्था यांनींच स्थापन केल्या. चार वर्षे हे ज्ञानप्रकाशाचे संपादक होते. मोठमोठ्या हुद्यांच्या नोकऱ्या करीत यांनीं सन १८७९ त पेन्शन घेतलें. यांना ' रावबहादूर ' ची पदवी देऊन सरकारानें गौरव केला होता. मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो, जे. पी., पहिल्या प्रतीचे सरदार, कायदेकौन्सिलचे सभासद, रतलामचे दिवाण इत्यादि मानाच्या जागा यांना मिळाल्या होत्या. हे मोठे जबर व बाणेदार लेखक होते. अर्वाचीन महाराष्ट्रग्रंथविश्वामध्यें हे ' लोकहितवादी ' या नांवानें प्रसिद्ध आहेत ( मनोरंजन )

यांच्याकडून पानपतची लढाई, हिंदुस्थानचा इतिहास, राजस्थानचा इतिहास, सुराष्ट्रदेशाचा इतिहास, बोधपत्र, जातिभेद, कलियुग, भिक्षुक, गीतातत्व इत्यादि दहा बारा पुस्तकें तयार झाल्याची नोंध आढळते.

( संपादक )

---

+ राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद लोकशिक्षण वर्ष १ ले.

**केरो लक्ष्मण छत्रे** ( १८२४–१८८४ ) गणितज्ञ व ज्योतिषी+ कोंकणस्त ब्राम्हण. यांचा जन्म कुलाबा जिल्ह्यांतील नागांव या गांवीं झाला व शिक्षण मुंबईंत झालें. एलफिन्स्टन कॉलेजांतून पहिल्यानें बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांपैकीं हे एक होते. ह्यांना लहानपणापासून गणित विषयाचा फार नाद असे. विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर ह्यांना आरंभी ५० रुपये दरमहाची जागा मिळाली. तेथून वाढतवाढत स. १८६५ सालीं पुण्याच्या कॉलेजांत हे गणितशास्त्राचे प्रोफेसर झाले. सन १८७७ च्या दिल्ली दरबारांत यांना 'रावबहादूर' हा किताब मिळाला. हे जबर विद्यव्यासंगी, उत्तम गणिती व शिक्षक होते. स्वभाव अगदी साधा, आनंदी व परोपकारी होता.

( मनोरंजन )

**कृष्णशास्त्री चिपळूणकर.** ( १८२४–१८७८ ) ग्रंथकार+ कोंकणस्थ ब्राह्मण. ह्यांचा जन्म पुणें येथें झाला. ह्यांच्या वडिलांनीं आरंभीं ह्यांच्याकडून वेदाभ्यास करविला. वयाच्या १४ व्या वर्षीं हे विश्रामबागेंतील पाठशाळेंत गेले व तेथें त्यांच्या हुशारीबद्दल त्यांना शिष्यवृत्ति मिळूं लागली. हे लहानपणापासून फार हुशार व बुद्धिमान होते. ह्यांनीं अल्पकाळांत अलंकार, न्याय व धर्म ह्या तीन शास्त्रांचा अभ्यास इतका उत्तम केला कीं, केवळ विनोदार्थ एके वेळीं

---

+ राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद लोकशिक्षण वर्ष १ लें.

त्यांचा व मोरशास्त्री साठे ह्यांचा पूर्वपक्ष उत्तरपक्ष होऊन त्यांत कृष्ण-शास्त्री यशस्वी झाले. तेव्हां मोरशास्त्री फार सतुष्ट होऊन त्यांनीं आपल्या अंगावरची शालजोडी ह्यांच्या अंगावर घातली व त्यांचा गौरव केला. तेव्हांपासून मोरशास्त्री ह्यांना ' बृहस्पति ' म्हणू लागले पुढें कृष्णशास्त्री यांनीं इंग्रजी भाषेचा अभ्यास केला व त्या भाषेंत प्राविण्य मिळविलें. नंतर त्यांनीं सरकारी नोकरी पतकरिली ते अनु-क्रमें भाषांतरकार, ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपाल व वर्तमानपत्रें आणि मासिकें यांचे रिपोर्टर होते. हें कसलेले लेखक व उत्तम कवि होत ह्यांचे मुख्य ग्रंथ अरबी भाषेंतील सुरस गोष्टी, अनेकविद्यामूलतत्त्व-संग्रह, अर्थशास्त्रपरिभाषा, साक्रेटिसाचें चरित्र, रासेलस आणि व्याक-रणावरील निबंध हे होत. ह्यांची पद्यरत्नावली व मेघदूत हीं काव्यें सर्वमान्य आहेत. यांची भाषा फार साधी, शुद्ध, प्रौढ व गोड असे. अव्वल इंग्रजींत मराठी भाषेची सेवा ज्या पंडितांच्या हातून झाली त्यांत हे अग्रेसर होते. ( अर्वाचीन कविता )

**गंगाधर रामचंद्र टिळक** ( १८२०–१८७२ ) कोंकणस्थ ब्राम्हण. हे स्वतःच्या प्रयत्नानें संस्कृत व गणित या विषयांत प्रवीण झाले. त्यांच्या संस्कृतविषयींच्या अध्ययनावरून तर त्यांना गंगाधरपंतापेक्षां गंगाधरशास्त्री या नांवानेंच लोक अधिक ओळखीत हे रामकृष्णपंत भांडारकरांचे मित्र होते आणि या मैत्रीला उभयतांची संस्कृत विषयाची आवड हेंच कारण प्रमुख होते. केवळ इंग्रजी न

आल्यामुळें हे मागे पडले. आणि गरीबीमुळें शालोपयोगी ह्मणजे पुष्कळ विक्री होऊन द्रव्यलाभ करून देणारीं पुस्तकें लिहून यांनां आपली महत्वाकांक्षा भागवून घ्यावी लागली. यांनीं केलेलीं पुस्तकें इंग्लंदचा इतिहास, गणित व व्याकरण हीं होत.

[ लो. टिळक यांचें चरित्र ]

माधव चंद्रोबा डुकले. [ १८२९–१८८९ ] सारस्वत ब्राह्मण. घरच्या अत्यंत गरीबीमुळें यांनां आरंभीं ६ रुपये दर-महाची नोकरी पतकरावी लागली. तरी विद्येची गोडी असल्यामुळें नोकरीशिवाय बाकीचा वेळ हे शिकण्यांत घालवूं लागले. पुढें यांनीं एक शिक्षाप्रेस घालून तत्कालीन विद्वानांच्या साह्यानें 'सर्वसंग्रह' हें मासिक पुस्तक काढण्यास सुरुवात केली. या मासिक पुस्तकांतून अनेक कवींची संस्कृत प्राकृत कविता मोठ्या प्रयासानें मिळवून, शुद्ध करून व टीपा देऊन यांनीं प्रसिद्ध केली. महाराष्ट्रां-तील कवींच्या कवितांचा संग्रह करण्याचा हाच पहिला प्रयत्न होय. यांनीं 'शब्दरत्नाकर' नांवाचा एक मोठा संस्कृत—मराठी कोश लिहून प्रसिद्ध केला आहे. [मनोरंजन १९१०]

गणेश सदाशिव लेले [ १८२९–१८९८ ] कोंकणस्थ ब्राह्मण हे प्रसिद्ध कवि आणि ग्रंथकार श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर येथें जन्मले. प्राथमिक शिक्षणानंतर मुंबई येथील एल्फिन्स्टन विद्या-

ल्यांत इंग्रजी अभ्यास करून हे प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाले. हे मोठे व्युत्पन्न, रसिक, समयोचित वक्ते, आणि सरस्वतीदेवीचे निःसिम भक्त असत. ह्यांनीं आपलें बहुतेक आयुष्य ग्रंथरचना करण्यांत घालविलें. ह्यांचा गद्यरचनेपेक्षां पद्यरचनेवरच विशेष कटाक्ष होता. ह्यांनीं केलेलें रघुवंशाचें पद्यात्मक भाषांतर लोकप्रिय व प्रसिद्ध आहे. या शिवाय शिवाजीचरित्र, हिन्दुलोकांचे सण, गंगाचरित्र, सीमंतिनीचें आख्यान, शिवस्तुति, कृष्णाकुमारी, अमरुशतक व महिम्नस्तोत्र इत्यादि बरेच गद्यपद्य ग्रंथ यानीं केलें आहेत. यांची कविता प्रौढ, जागोजागीं अलंकृत व रमणीय आहे.

[ चं. शि. गोऱ्हेकृत अर्वाचीन कविता ]

**विष्णु भिकाजी गोखले उर्फ विष्णुबुवा ब्रह्मचारी** [ १८२९–१८७१ ] समदर्शीन्, ग्रंथकार व वादिमत खंडनकार+ ह्यांचा जन्म कुलाबा जिल्ह्यांतील शिखली या गांवी झाला. घरच्या गरीबीमुळें यांनी आरंभी कांहीं दिवस शेतकी व नंतर नोकरी केली. प्रथमपासूनच धार्मिक प्रवृत्तीचे असल्यामुळें बुवांनी नोकरी शिवाय बाकीचा सर्व वेळ वाचन, श्रवण व मनन ह्यांत घालविला सन १८६९ ते १८७१ पर्यंत हे मुंबईस समुद्रकांठीं धर्मपर व्याख्यानें देत व त्या वेळीं बोकाळलेल्या खिस्ती मिशनऱ्यांशी

+ राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांचीं मोजदाद, लोकशिक्षक, वर्ष १ लें.

वाद करीत. यांनीं स्वतःचें एक आत्मचरित्र, मानवधर्मप्रकाश, वेदोक्तधर्म प्रकाश, भगवद्गीताटीका, भावार्थसिंधु, बोधसागर रहस्य, सेतुबंधनटीका, सहगमनस्थितीचा निबंध व चतुःश्लोकी भागवत इत्यादि दहाबारां लहान मोठीं पुस्तकें लिहिलीं आहेत.

विष्णु परशुराम शास्त्री पंडित [ १८२७-१८७६ ] वर्तमानपत्रकार व पुनर्विवाहक. * कोकणस्थ ब्राह्मण. यांनीं लहानपणीं व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला. पुढें पुण्यास इंग्रजी शिकून यांनीं शाळाखात्यांत कांहीं वर्षें नोकरी केली. हे सन १८६४ सालापासुन इंदुप्रकाशाचें संपादक झाले. ह्यांनी पुनर्विवाहोत्तेजक मंडळीची स्थापना केली व हे पुनर्विवाहाच्या पक्षानें अखेरपर्यंत भांडले. सन १८७४ सालीं यांचे कुटुंब निवर्तले. या वेळीं पुन्हा विवाह करण्याचें जरी यांचें वय नव्हते तरी ‘ बोले तैसाचाले ’ हें खरें करून दाखविण्यासाठीं यांनीं स्वतः पुनर्विवाह केला. हे चांगले लेखक व कवि होते. [ मनोरंजन १९१० ]

जोतिराव गोविंदराव फुले [ १८२७-१८९० ] फूल माळी. हे आपल्या वयाच्या १९ व्या वर्षीं इंग्रजी शिकूं लागले. नंतर यांनीं मुलींची शाळा काढली व तींत आपल्या कुटुंबास पाठवूं लागले. यामुळें वडिलांनी या दोघांसही घरांतून काढून लाविलें.

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ लें.

तथापि यांनीं आपला क्रम सोडला नाहीं. यांनीं महारांसाठींही शाळा काढली. या कामीं जोतीरावांनां मेडोज टेलर वगैरेंनी फार उत्तेजन दिलें. सरकारानें मुद्दाम दरबार भरवून यांच्या कामगिरीचा गौरव करून यांना २०० रुपायांची शालजोडी बक्षिस दिली होती. सन १८७३ त यांनी 'सत्यशोधक' समाजाची स्थापना केली. जोतीरावांनी ब्राम्हणांवर फार तीव्र शस्त्र उचलले होते. व त्यांच्या पाडावासाठी गुलामगिरी, ब्राम्हणांचें कसब, सार्वजनिक सत्यधर्म वगैरे अनेक पुस्तकें लिहिलीं.

[ मनोरंजन १९१० ]

हिराचंद अमोलिक [ १८२९–१८९२ ] श्रावक. लहानपणापासून यांचें लक्ष वैराग्याकडे फार असे. यांनीं धार्मिक पुस्तकें वाचून आपलें मन प्रबुद्ध केलें. यांनीं मराठींत नळचरित्र, रामायण, धर्मसिंधु, पंचपूजा इत्यादि बरींच पुस्तकें लिहिलीं. हुंबड जातीसारख्या निरक्षर समाजांत जन्म पावून हे आपल्या प्रयत्नानें विद्वान झाले. [ मनोरंजन १९१० ]

बाबा पदमनजी. [ १८३१–१९०६ ] महाराष्ट्रीय ख्रिश्चन. यांचा जन्म बेळगांव येथें झाला व शिक्षण बेळगांवच्या मिशन हायस्कुलांत झालें. संस्कृताचा यांनीं चांगला अभ्यास केला होता. यांनीं मराठी कविता बहुतेक वाचली होती. सन १८५४ त यांनीं

बाप्तिस्मा घेतला. ख्रिस्ती झाल्यानंतर हे पुण्यास गेले व तेथें फ्रीचर्च मिशनच्या शाळेंत बरींच वर्षें अध्यापकाचें काम करीत राहिले. हे चांगले लेखक होते. यांनीं शंभरावर पुस्तकें लिहिलीं आहेत त्यांपैकीं अरुणोदय, अनुभवसंग्रह, यमुना पर्यटन कादंबरी, हिन्दु धर्माचें स्वरूप, सत्यदिपिका वगैरे पुस्तकें प्रसिद्ध आहेत. यांनीं एक इंग्रजी—मराठी डिक्शनरीही केली आहे. हे दीर्घोद्योगी व लोकहिता विषयीं कळकळ बाळगणारे होते.

[ मनोरंजन १९१० ]

भास्कर दामोदर पाळंदे [ १८३२–१८७४ ] कवि. * कोंकणस्थ ब्राम्हण. हे निबंधकार व कवि वाईजवळील मेणवली गांवी जन्मले. यांचें शिक्षण अनुक्रमें ठाणें व मुंबई येथें झालें. अभ्यास पूर्ण झाल्यानंतर ह्यांनीं सरकारी नोकरी पतकरिली. आणि आपल्या अंगच्या गुणांनीं अत्यंत गरीब स्थितींतून चढत चढत हे शेंवटीं स्मॉलकाज कोर्टांतील न्यायाधिशाच्या पदास पहोंचले. हे उत्तम लेखक व कवि होते. ह्यांनीं विक्रमोर्वशीय नाटकाचें गद्यपद्यात्मक भाषांतर, व गीतेचे ओवीबद्ध भाषांतर आणि ‘ रत्नमाला ’ नांवाचा एक सर्वोत्कृष्ट ईश्वरभक्तिपर पद्यग्रंथ लिहिला आहे.

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ लें.

**विश्वनाथ नारायण मंडलिक** [ १८३३–१८८९ ] धर्मेतिहास संशोधक* यांचें शिक्षण मुंबई येथें एलफिन्स्टन इन्स्टिट्युशन मध्यें झालें, सुमारे बारा वर्षे अनेक सरकारी हुद्यावर नोकरी केल्यानंतर वकीलीची परीक्षा देऊन हे हायकोर्टांत वकीली करूं लागले. थोडक्याच कालांत या धंद्यांत यांनी विलक्षण कीर्ति व संपत्ति मिळविली. हे चांगले लेखकही होते. यांनी एलफिन्स्टनकृत इतिहासाचें मराठींत भाषांतर केलें आहे. वक्तशीरपणाबद्दल यांची फारच ख्याति होती. हे सनातनधर्मभिमानी होते. सरकारानें आमच्या सामाजिक बाबतींत हात घालूं नये, असा यांचा कटाक्ष होता. [ मनोरंजन १९१० ]

**कृष्णशास्त्री गोडबोले** [ १८३१–१८८६ ] कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म वाई येथें झाला. यांचे वडील पांडुरंगपंत हे पुणें येथें सदर आमीन यांच्या कोर्टांत शिरस्तेदार होते; अर्थात शास्त्रीबुवांचा सर्व विद्याभ्यास पुण्यांतच झाला. ते आरंभीं पांडोबा तात्या दिवेकर यांच्या शाळेंत व नंतर विश्रामबाग पाठशाळेंत शिकत होते. शास्त्रीबुवास प्रथमपासून गणिताचा फार नाद असल्याकारणानें ते शंकरशास्त्री जोशी यांच्याजवळ ज्योतिषशास्त्र शिकूं लागले. पाठशाळेंत शास्त्रीबुवास दरमहा तीन पासून दहा रुपायापर्यंत शिष्य-

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोक शिक्षण, वर्ष १ लें.

वृत्ति मिळत असे. पुढें शास्त्रीबुवास पुना कॉलेजांत मराठी अध्यापकाची जागा देण्यांत आली, व या जागेवर त्यांनी ९ वर्षें काम केल्यानंतर सन १८६५ साली त्यांस पूना ट्रेनिंग कॉलेजचे सुपरिंटेंडेंट नेमण्यांत आले. या नंतर त्यांची बदली सिंध प्रांतांत झाली. तिकडे सहा वर्षे काम केल्यानंतर सिंधची हवा त्यांस न मानवल्यामुळें रजा घेऊन इकडे येणें भाग पडले. पुढे कांहीं दिवस पुणें व मुंबईतील एलफिन्स्टन हायस्कूलांत काम केल्यानंतर सन १८८२ त स्त्रीबुवांनी पेन्शन घेतलें.

त्या वेळच्या नांवाजलेल्या विद्वानांत शास्त्रीबुवा अग्रेसर होते. 'ग्रहलाघव' हे त्यांनी गुंफिलेल्या ग्रंथमालेचें पहिलें पुष्प होय. पंचांगें करणाऱ्या लोकांच्या संग्रहीं बहुधा हा ग्रंथ असतोच. त्यांचा दुसरा ग्रंथ ज्योतिःशास्त्र हा होय, हा ग्रंथ चेंबर्सच्या इंग्रजी ज्योतिःशास्त्राधारें स. १८६२ सालीं त्यांनी प्रसिद्ध केला. या ग्रंथास दक्षिणप्राईज कमेटीनें ३०० रुपये बाक्षिस दिले होते. शास्त्रीबुवांचा तिसरा व विशेष महत्वाचा ग्रंथ ह्मटला ह्मणजे तो 'मराठी भाषेचे नवीन व्याकरण' हा ग्रंथ होय. हा ग्रंथ शास्त्रीबुवांच्या महाराष्ट्र भाषा प्राविण्याची उत्तम साक्ष पटवितो. मराठी भाषेचे एक व्याकरणकार या नात्यानेच शास्त्रीबुवांची विशेष प्रसिद्धि आहे.

'मासानां मार्गशीर्षोऽहं ऋतूनां कुसुमाकरः' या गीतावाक्यावरून उत्तम मास मार्गशीर्ष व उत्तम ऋतु वसंत असे ठरते. तेव्हां

गीताकालीं वसंतऋतु मार्गशीर्षांत होता; तो हल्लीं चैत्रांत आहे. तेव्हां हा बदल होण्यास किती काळ लागला असावा, ह्यांचे गणित करून, ज्योतिषांतील आधार देऊन व दुसरे मुद्दे घेऊन शास्त्रीबुवांनी वेदाचा काल ख्रिस्ती शकापूर्वी १० हजार वर्षे, हा ठरविला हा ग्रंथ इंग्रजींत करून तो त्यांनी स. १८८२ सालीं प्रसिद्ध केला.

शास्त्रीबुवा अंकगणित, बीजगणित त्रिकोणमिती इ. कठिण विषयांतील बिकट उदाहरणें फार जलद सोडवीत. कधीं कधीं अत्यंत बिकट अशीं उदाहरणें त्यांनी कागद न घेतां पेन्सिलीनें नखावर सोडविली असल्याची माहिती मिळते. एकंदरींत त्या विषयाच्या प्रोफेसराच्या जागेस शास्त्रीबुवा सर्वस्वीं पात्र होते. परंतु अधिकाऱ्यांच्या गुणग्राहकतेच्या अभावीं त्यांच्या गुणांचे व्हावे तितके चीज झाले नाहीं.

[ ज. र. आजगांवकर यांचा लोकमित्रांतील लेख संक्षेप संपादक ]

**महादेवशास्त्री कोल्हटकर.** [ ? ] कोंकणस्थ ब्राम्हण. पुणें येथील पाठशाळेंत ज्योतिष व व्याकरण या शास्त्रांचा अभ्यास केल्यावर स्कॉलरशिप देऊन सरकारानें यांनां पांच वर्षें कँडीसाहेबांच्या हाताखालीं प्रथम ठेविले. तेथून सन १८५१ सालीं

पुण्याची संस्कृत पाठशाळा आणि इंग्रजी शाळा एक होऊन पूना कॉलेज बनले त्यांत महादेवशास्त्री यांनां मराठीचे प्रोफेसर नेमण्यांत आले. हे मोठे वक्ते आणि लेखक होते. यांनीं कोलंबसाचें चारित्र, अर्थशास्त्र, अथेल्लो नाटकाचें भाषांतर वगैरे पुस्तकें व कांहीं कविताही लिहिल्या आहेत.

**रामकृष्ण हरि भागवत** हे राजापूर तालुक्यांतील आपल्या कशेळी गांवाहून सन १८३० च्या सुमारास मुंबईस आले, इंग्रजी शिकले व म्युनिसिपालटींत नोकर झाले. मराठींत अनेक विषयावर हे निबंध लिहीत. उत्तरावस्थेत यांच्या मनाचा कल वेदांतमताकडे वळला होता. त्यांचें चित्र त्यांचे ‘ कायाजीसंवाद ’ हें काव्य व ‘ सायुज्यसदन ’ हें नाटक या दोन ग्रंथांत उतरसेलें दिसते.

**भास्कर हरि भागवत** एलफिन्स्टन कॉलेजांत शिकून इंग्रजींत चांगले विद्वान झाले. व मुंबई हायकोर्टांत एका मोठ्या हुद्यावर नोकर होते. हे रानड्यांचे सहाध्यायी होते. हे ज्ञानप्रकाशांत लेख लिहीत. राजाराममोहनरायचें चरित्र व करसनदास मूलर्जीकृत ‘ इंग्लंदचा प्रवास ’ या पुस्तकाचें भाषांतर यांच्या हातून झालें आहे.

**महादेव मोरेश्वर कुंटे** [ १८३५–१८८८ ] बहुश्रुतनिष्ठ

इतिहासकार व वक्ता. *हे लोकप्रसिद्ध वक्ते, आणि कवी साताऱ्याजवळ कृष्णातिरीं श्रीक्षेत्र माहुली येथें जन्मले. हे जातीचे कोकणस्थ आश्वलायन ब्राह्मण. ह्यांनीं बालवयांत आपले वडील वेदमूर्ति मोरभट कुंटे ह्यांजपाशी बहुतेक 'ऋकसंहिता' ह्मटली होती. पदरीं गरीबी असून लहानपणीं कोणी शास्ता नसल्यानें हे फार हूड असत परंतु बारा वर्षांचे झाल्यानंतर ह्यांस विद्या शिकावी असें वाटलें. ह्मणून ते आईस न विचारतां एकदम घरांतून निघून पुण्याकडे पळून गेले. पण मग पुढें ह्यांच्या मातुश्रींनीं त्यांस कोल्हापूर येथें विद्याभ्यासास ठेविलें. तेथें मधुकरीवर निर्वाह करून ह्यांनीं मराठी आणि इंग्रजी अभ्यास चांगला केला. पुढें इंग्रजीचें ज्ञान वाढविण्याच्या हेतूनें हे सन १८५६ ह्या वर्षीं मुंबई येथें डॉ. वुइल्सन ह्यांच्या शाळेंत विद्यार्थी झाले. हे स्वभावतः जबरदस्त अभ्यासी असल्यानें वुइल्सन साहेबांचे मेहेरबानीस पात्र झाले, आणि ते ह्यांस थोडेबहुत निर्वाहासही देऊं लागले. त्यामुळें अभ्यासक्रम सुरळीत चालून हे सन १८६४ त बी. ए. झाले. पुढें दुसऱ्याच वर्षीं ह्यांस कराचीच्या हायस्कुलांत हेडमास्तरची जागा मिळाली. नंतर सन १८६७ पासून कांहीं काल कोल्हापुरास नोकरी केल्या-नंतर सन १८७१ सालीं यांची निमणूक पुण्याच्या हायस्कुलावर झाली. या जागेवर ते अखेरपर्यंत होते. हे उत्कृष्ट वक्ते व शिक्षक असून ह्यांस कविता करण्यांचा नाद असे. हे कवि व ह्यांची कविता

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ ले०

निरंकुश आहेत. तथापि कोठें कोठें तिचें वास्तविक स्वरूप प्रसन्न व उज्वल दिसून येते. ह्यांनी ' राजाराम महाराज ' 'राजा शिवाजी आणि ' मन ' अशीं तीन काव्यें केलीं आहेत व तीं स्वतंत्र पुस्तक रूपानें प्रसिद्ध आहेत. " ( चं. शि. गोऱ्हेकृत अर्वाचीन कविता )

**सोकर बापूजी त्रिलोकेकर** [ १८३१–१९०८ ) पाठारे प्रभु. हे महाराष्ट्रांतील संगीताचे आद्यप्रवर्तक होत. त्या वेळचे, मुंबईतील प्रसिद्ध मराठी शिक्षक धोंडोपंत माळवणकर ह्यांच्या मराठी शाळेंत, सोकरजीचा प्राथमिक अभ्यास झाल्यावर, ते ' एलफिन्स्टन इन्स्टिटयूशन ' नामक पाठशाळेंत गेले. त्यावेळीं हल्लींचें विश्वविद्यालय स्थापन झालें नव्हतें. तरी, वरील पाठशाळेंत ' वेस्ट स्कॉलर ' च्या परीक्षेपर्यंत ह्मणजे हल्लींच्या बी. ए. इतकें त्यांचें शिक्षण झालें.

कॉलेज सोडल्यावर, रा. त्रिलोकेकर हे मुंबईतील ' प्रभु सेमिनरी ' नामक शाळेंत व नंतर सरकारी सेंट्ल स्कूलमध्यें कांहीं दिवस शिक्षक होते- पुढें १८६४ सालीं हायकोर्टांतील ट्रान्स्लेटर व इन्टरप्रिटरची जागा त्यास मिळाली. तेंथें वाढत वाढत शेवटीं ते सेकंड ट्रान्स्लेटर झाले व त्यांस दरमहा ४५० रुपये पगार मिळूं लागला. ह्या जागेचें काम त्यांनी इतक्या चांगल्या रितीनें बजविलें कीं, त्याबद्दल मुंबई हायकोर्टाचे मुख्य न्यायाधीश सर जोसेफ

आर्नोल्ड, सर चार्लस सार्जंट, सर चार्लस फॅरन व न्यायाधीश ग्रीब व म्यारियट यांनीं त्यांस उत्तम प्रकारची शिफारस पत्रें दिलीं आहेत.

सरकारी नोकरींत असतां, फावल्या वेळीं कांही स्फुट कविता करण्याचा रा. त्रिलोकेकर यांस फार नाद असे. पुढें १८७९ सालीं त्यांनीं ' नलदमयंती ' हे गद्यपद्यात्मक नाटक प्रसिद्ध केलें. त्याचे रंगभूमीवर पुष्कळ प्रयोग होऊन ते फार लोकप्रिय झालें. महाराष्ट्रांत रंगभूमीवर आलेलें पहिलें संगीत नाटक हेंच होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पुढें कै. किर्लोस्कर हे उदयास आले व त्यांनी आपल्या नाटकास ' संगीत ' हें विशेषण दिलें. वास्तविक पाहातां संगीत ह्या शद्बाचा अर्थ गायन असा आहे. अर्थात ' गद्यपद्यात्मक नाटकास संगीत हा शद्ब लावावा किंवा कसें हा मोठा प्रश्न आहे; व ह्या बाबतींत, त्यावेळीं किर्लोस्कर व त्रिलोकेकर यांचा बराच वाद होऊन, रा. त्रिलोकेकरांचे मत किर्लोस्करांनीं मान्य केलें व आपल्या शाकुंल नाटकाच्या प्रयोगाच्या हस्तपत्रकावर ' संगीत शाकुंतल ' असें न लिहितां ' गद्यपद्यात्मक शाकुंतल ' असें लिहिलें.

नळदमयंती नाटकाच्या मागून, रा. त्रिलोकेकरांनीं 'हरिश्चंद्र' नाटक लिहिलें व त्याचेही प्रयोग होऊन ते इतकें लोकप्रिय झालें कीं, त्याच्या कित्येक आवृत्यांच्या हजारों प्रती आजपर्यंत खपून गेल्या आहेत. या नाटकास द. प्रा. कॉमिटिनें बक्षीस दिलें आहे.

पुढें त्यांनीं ' सावित्री ' नाटक लिहिलें, त्यासही चांगलें यश आलें. ह्या नाटकासही दक्षिणाप्राइज कमिटीनें बक्षीस दिलें आहे. या नाटकाचीही दुसरी आवृत्ति झाली आहे. इंटरप्रिटरच्या जागा असल्यामुळें सोकरजींस गुजराथी भाषेंतही चांगलें ज्ञान झालें व त्या भाषेंत त्यांनीं ' शनीमहात्म्य ' ' चित्रसेन ' इत्यादि पुस्तकें लिहिलीं आहेत. [ ज. र. आजगांवकर. ]

तुकाराम तात्या पडवळ [ १८३६–१८९८ ] भंडारी; जन्मस्थान मुंबई. यांचे आइबाप हे ९ वर्षांचे असतांना निवर्तल्यानंतर यांना यांच्या भावजयीनें दत्तक घेतलें; आरंभीं रेल्वे, व्हालकार्ट ब्रदर्स वगैरे कंपन्यांत नोकरी केल्यानंतर हे शांताराम नारायण यांच्या कंपनींत राहिले व तेथेंच यांचा भाग्योदय झाला. हे थिऑसफिस्ट होते. होमिओपाथी वैद्य म्हणूनही यांची प्रसिद्धी असे; हे गोरगरीबांस साह्य करावयास सदैव तत्पर असत; कावसजी पटेल व काळबादेवी रस्त्यावर यांनीं मोफत दवाखाने काढले होते; या दवाखान्यांचा खर्च चालवा म्हणून यांनी ' तत्वविवेचक ' छापखानाही काढला होता; या छापखान्यांतून यांनी तुकाराम, नामदेव, एकनाथ वगैरे भगवद्भक्तांच्या अभंगांच्या गाथा व दुसरीं बरींच तत्वज्ञानविषयक इंग्रजी मराठी पुस्तकें प्रसिद्ध केलीं.

[ मनोरंजन १९१० ]

**सूर्याजी सदाशिव महात्मे** [ १६३७–१८९९ ] सारस्वत ब्राम्हण. यांचा जन्म गोमांतकांत झाला. गोव्यास हे फ्रेंच व पोर्तुगीझ शिकले; त्या शिवाय इंग्रजींचाही चांगला अभ्यास केला; हे चांगले विद्वान व उत्तम मराठी लेखक होते. त्या वेळच्या मासिक पुस्तकातून हे अनेक लेख लिहीत असत. यांनी ' आनंद-लहरी ' नांवाचे मासिक पुस्तक सन १८७० त चालविलें होतें. यांनी तंतुवाद्यावर एक चांगला ग्रंथ लिहिला आहे. वामनपंडिताचे समग्रग्रंथ शुद्ध करून आणि टिपा देऊन यांनीं प्रसिद्ध केले. ह्यांनी लिहिलेली ' वेषधारी पंजाबी ' ही कादंबरी विद्वन्मान्य व लोकप्रिय आहे. मराठींत स्वतंत्र समाजविषयक कादंबरी लिहिण्याचा हा पहिलाच प्रयत्न होय. यांची भाषा सरळ, सोपी व चटकदार असे. स्वभाव साधा, प्रेमळ व परोपकारी असून विचार उदात्त होते.

[ मनोरंजन १९१० ]

**बजाबा रामचंद्र प्रधान.** [ १८३८–१८८६ ] कायस्थप्रभू यांचा जन्म कोंकणांतील दापोली गांवीं व अभ्यास दापोली आणि पुणें येथें झाला. मॅट्रिक्युलेशनची परीक्षा उतरल्यावर पुणें येथील पाठशाळेंत ह्यांनी कांहीं वर्षें अभ्यास केला. तेथें आपल्या बुद्धिमत्तेनें आणि वाचनाच्या नादानें ह्यांनीं आपल्या सोबत्यामध्यें नांव मिळविलें. पुढें यांनीं शाळाखात्यांत नोकरी पतकरिली, व आपल्या कर्तबगारीनें चढतचढत सन १८८४ सालीं एज्युकेशनल इन्स्पेक्टर झाले.

सृष्टिसौंदर्योचे ठायीं ह्यांचे लहानपणापासूनच प्रेम असे. हे एक उत्तम महाराष्ट्रभाषा लेखक व कवि होऊन गेले. ह्यांनी सरवॉल्टर स्कॉटच्या 'लेडी ऑफधिलेक' ह्या काव्यांतील कथाभागाच्या आधारें 'देवसेनी' नामक एक लहानच पण सरसरमणीय काव्य केलें आहे. या काव्याच्या आजपर्यंत दोन चार आवृत्या निघाल्या आहेत. ह्यावरून त्याची योग्यता व्यक्त होते.

[ चं. शि. गोऱ्हेकृत अर्वाचीन कविता भाग १ ]

श्री बापूसाहेब कुरुंदवाडकर [ १८३८–१८९९ ] हे लोकप्रसिद्ध राजकवि कुरंदवाड येथें जन्मले. ह्यांच्या लहानपणाची विशेष माहिती कळली नाहीं, तरी हे गर्भश्रीमंत असल्यामुळें ह्यांचें बालपण स्वस्थतेंत व आनंदांत गेलें असावें, हें उघड आहे. तरी हे स्वभावतःच विद्यान्यसनी होतें. ह्यांचा साधारण लिहिण्या-वाचण्याचा अभ्यास झाल्यानंतर हे संस्कृत पुष्कळ शिकले. ह्यांत ह्यांची गति इतकी झाली होती कीं, हे ह्या भाषेंत चांगल्या चांगल्या शास्त्री पंडितांशी वादविवाद करीत असत. सन १८६९ च्या सुमारास कुंटे यांचें 'राजा शिवाजी' हे प्रसिद्ध झालेलें काव्य या राजकवीच्या पाहण्यांत आलें तेव्हां त्यावर ह्यांनी कांहीं प्रतिकूल टीका केली असतां ह्यांचे चुलते ह्यांस किंचित् लावून बोलले कीं, "टीका करणें सोपें आहे, पण कृति करण कठीण आहे" हे शब्द या राजकवीच्या मनास फार लागले, आणि लागलीच

याच रात्रीं ह्यांनी शिवाजीवर आठ दहा नवीन श्लोक रचून आण्णासाहेबांस दाखविले. ते त्यांना फार आवडले. व संतोष झाला. हाच प्रस्तुत राजकवीच्या काव्यरचनेचा आरंभ होय. ह्यांनीं 'गंगावर्णना,' 'गणेश पुराण आर्या,' 'मद्वंशकाव्य,' 'स्ववंश वर्णन' इत्यादि काव्ये केलीं आहेत. ह्यांचीं कविता बहुधा आर्याछंदांत असून ती प्रौढ व अलंकारमंडित आहे. ती वाचतांना बरोबरच प्राचीन कविवर्य मोरोपंत यांची आठवण होते. यांचें पूर्ण नांव श्रीमंत गणपतराव हरिहर उर्फ बापूसाहेब पटवर्धन असे होते.

[ चं. शि. गोऱ्हेकृत अर्वाचीन कविता भा. १ ]

जावजी दादाजी चौधरी [ १८३९–१८९२ ] मराठे. जन्म मुंबईत. हे छापखान्याच्या धंद्यांत केवळ स्वपराक्रमानें उदयास आले. आरंभीं हे तीन रुपायांवर नोकर होते. तेच स्वतः पुढें मालक होऊन दरमहा चार चार हजार रुपये लोकांस पगार वाटूं लागले. सन १८६४ सालांत ह्यांनीं स्वतंत्रपणें टैप पाडून ते विकण्याचा धंदा आरंभिला. सन १८६९ त स्वतःचा छापखाना घातला याच छापखान्याचें नांव सुप्रसिद्ध 'निर्णयसागर' होय. नवीन सुंदर व अनेक प्रकारचे टाइप करण्यांत आणि सुबक पुस्तकें छापण्यांत यांनीं मोठी कीर्ति मिळविली. गुणीग्रंथकारांना यांनीं यथाशक्ति साहाय्य केलें. संस्कृत, मराठी, हिन्दी, गुजराथी, इंग्रजी भाषेंत

महत्वाचीं शेंकडो पुस्तकें प्रासिद्ध करून ग्रंथकारांस उत्तेजन दि व वाङ्मयांत अमूल्य भर घातली. हे स्वभावानें कोमल, दयाळू सुशील व निगर्वी होते. [ मनोरंजन १९१० ]

**सखाराम अर्जून राऊन** [ १८३९–१८८५ ] सोमवंशी क्षत्रिय. जन्म मुंबईत. यांचें वडील यांच्या अकराव्या वर्षी निवर्तल्या-मुळें स्वावलंबनानें हे उदयास आले. यांचें शिक्षण प्रथम एल्फि-न्स्टन इन्स्टिटयूटमध्यें व पुढें ग्रांट मेडिकल कॉलेजांत झालें सन १८६२ सालीं हे एल् एम. झाले. कॉलेजांत हे फार हुशार असा यांचा लौकिक होता. त्याचप्रमाणें पुढें आपल्या धंद्यांतही यांनीं मोठीं मान्यता संपादिली. हे जे. जे. हॉस्पिटलमध्यें असि. सर्जन, ग्रां. मे. कॉलेजांत बॉटनीचे प्रोफेसर, व्हाक्सिनेशन खात्याचे सुपरिं-टेंडेंट, व्हाइसरायांचे ऑ. असि. सर्जन, युनिव्हर्सिटीचे फेलो व जे पी. होते. हे आस्थेवाइक सामाजिक सुधारक तसेंच चांगले लेखक होते. ' वैद्यतत्व ' व ' गर्भविद्या आणि प्रसूतिकरण ' हे यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. [ मनोरंजन १९१० ]

**विनायक कोंडदेव ओक** [ १८४०–१९१९ ] बालो-पयोगी निबंधकार* कोंकणस्थ हिरण्यकेशी ब्राम्हण. हे लोक प्रसिद्ध ग्रंथकार व कवि रत्नागिरि जिल्ह्यांत गुहागर येथें जन्मले. ह्यांची

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण वर्ष १ लें.

आईबापे हे चार पांच वर्षांचे असतांच मरण पावलीं. लहानपणाचा अभ्यास ह्यांच्या मूळच्या गांवीं म्हणजे हेद्वी येथें खासगी पंतोजी जवळ झाला. पुढें कांहीं दिवस हे चिपळुणच्या मराठीं शाळेंत विद्यार्थि होते. त्यानंतर सन १८५८ पासून १८६१ पर्यंत सातारा येथील इंग्रजी शाळेंत इंग्रजी शिक्षण मिळाले. पुढें सन १८६१ पासून १८९९ पर्यंत यांनी शिक्षकाचें व दुय्यम एज्युकेशनल इन्स्पेक्टराचें काम केलें. आणि नंतर पेन्शन घेतलें. ह्यांचा मराठी भाषेंत गद्यपद्य लिहिण्याचा व्यासंग सतत चाळीस वर्षे चालू होता. त्यामुळें मराठी भाषेंतलि सुप्रसिद्ध ग्रंथकारांत ह्यांची गणना झाली आहे. याचीं अमीर अबदुल रहिमान, एब्राहाम लिंकन, डयूक ऑफ वेलिंगटन, पीटर धीग्रेट, शिकंदर बादशहा, व महन्मणिमाला. इत्यादि चरित्रें, रोम, इतिहास तरंगिणी, हिंदुस्थान कथारस, इत्यादि इतिहासग्रंथ, अनुकरण, प्रपंचरहस्य, मधुमक्षिका, मुलांचे कल्याण, शिरस्तेदार, फुलांची परडी, आनंदराव इत्यादि सुमारे पंचवीस पुस्तकें प्रसिद्ध असून शिवाय यांनीं 'बालबोध' हें मासिक फार उत्तमपणें चालविलें होतें. यांची भाषा आणि कविता व्याकरणशुद्ध आणि सरळ असून बोधप्रद आहे.

[ चं. शि. गोऱ्हेकृत अर्वाचीन कविता ]

**विनायक जनार्दन कीर्तने [ १८४०–१८९१ ] कऱ्हाडे** ब्राम्हण जन्म पुणें जिल्ह्यांत राजुरी येथें. यांचें प्राथमिक शिक्षण

कोल्हापूर येथें झालें. वयाच्या १२ व्या वर्षी यांनीं एक निबंध लिहिला; त्याची फार तारीफ झाली. सन १८५६ त मुंबईस शिकावयास आले. व १८५९ साली प्रवेश परिक्षा पास झाले. पुढें अपयश आल्यानें यांनीं शिकणें सोडलें व शाळाखात्यांत नोकरी धरली. यांनीं १८६० सालीं ' थोरले माधवराव ' व पुढें दोन वर्षांनीं ' जयपाळ ' नाटक लिहिलें. सन १८६९ त ते इंदुरास गेले व तेथें श्री. शिवाजीराव होळकर यांचे शिक्षक झाले. तसेंच पुढें सन १८७३ न्यायाधीश व सन १८७५ बडोद्यांत नायब दिवाण म्हणून गेले. सन १८८८ त पुन्हा इंदुरास दिवाण झाले. तथापि १८९० त होळकरांचा आणि यांचा बेबनाव होऊन यांनीं इंदूर सोडलें व पुण्यास वस्ती केली महाराष्ट्रांत यांची आद्य-नाटककार म्हणून प्रसिद्धी आहे. यांचें ' जयपाळ ' नाटक फारच सुंदर आहे; या तोडीचें नाटक मराठींत आजवर एकही झालें नाहीं.

[ मनोरंजन १९१० ]

" इंग्रजीच्या धाटणीवर जीं जीं नाटकें झालीं आहेत त्यांत ' थोरले माधवराव ' ' जयपाळ ' व ' मनोरमा ' हीं आम्हांस उत्कृष्ट वाटतात. " [ भाषापद्धति, निबंधमाला. ]

**शंकर पांडुरंग पंडित** [ १८४०–१८९४ ] विद्वान वेद ग्रंथ प्रकाशक * सारस्वत ब्राह्मण. जन्म सावंतवाडी संस्थानांत

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्यापुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ लें.

बांनुळी गांवीं. लहानपणीं साधारण मराठी अभ्यास होऊन हे कुळकर्णीपणाचें काम करूं लागले. पुढें इंग्रजी शिकण्याची इच्छा होऊन १८५८ सालीं बेळगांवास गेले. तेथें फार कष्ट आणि अडचणी सोसून विद्याभ्यास केला व प्रवेश परीक्षा देऊन सन १८६१ सालीं एल्फिन्स्टन कॉलेजांत गेले. व १८६९ सालीं बी. ए आणि एम् ए ह्या दोन्ही परीक्षा उत्तीर्ण झाले. हे प्रथम कांहीं दिवस एल्फिन्स्टन कॉलेजांत फेलो होते; पुढे पुण्याच्या कॉलेजांत फेलो व दक्षिणाप्राईझ कमेटीचे सेक्रेटरी झाले. पुण्यास संस्कृत व जर्मन भाषांचा अभ्यास करून त्यांत प्राविण्य संपादिलें. १८६८ सालीं डेक्कन कॉलेजांत असि. प्रोफेसर व मागाहून ओरिएंटल भाषांचे प्रोफेसर झाले. पुढें खानदेश व सुरत येथें डे कलेक्टराचें काम केलें. १८७७ सालीं सरकारनें यांनां इंटरनॅशनल कॉंग्रेसला प्रतिनिधि म्हणून युरोपांत पाठविले. तिकडून आल्यावर मुंबईस इनकमटॅक्स कलेक्टर, ओरिएंटल ट्रन्सलेटर वगैरे हुद्यांचीं कामें करून शेवटीं पोरबंदर संस्थानचे ॲडमिनिस्ट्रेटर झाले. यांचा विद्याव्यासंग त्याचप्रमाणें लेखन दांडगे होत. ‘ वेदार्थयत्ना ’ सारखा प्रचंड ग्रंथ यांच्या दीर्घोद्योगीपणाची साक्ष देतो. तुकारामाच्या अभंगांची गाथा हा यांचा ग्रंथही प्रसिद्ध आहे. स्वभाव फार करारी, बाणेदार व सत्यप्रिय होता.

[ मनोरंजन १९१० ]

**गोपाळ शिवराम वैद्य**–[ १८४०–१८९० ] कोकणस्थ ब्राह्मण. जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत लागवण गांवीं. शिक्षण मुंबईत प्रभुसेमिनरींत व एलफिस्टन इन्स्टिटयूटमध्यें झालें. पुढें ग्रांट मेडिकल कॉलेजांत पगारी विद्यार्थ्यांची जागा मिळून सन १८६४ सालीं हे एल. एम् झाले. याच वर्षीं बाटलीवाल्याचे दवाखान्यांत त्यांना असि. सर्जन नेमिलें. त्यांनीं शस्त्र वैद्यकावर एक व न्याय वैद्यकावर एक असे दोन चांगले ग्रंथ मराठींत लिहिले आहेत. या शिवाय प्रसंगोपात हे वैद्यकविषयावर निबंधही लिहीत असत. हे शस्त्र-वैद्यकांत अत्यंत प्रविण होते. स्वभाव निगर्वी, परोपकारी, कनवाळु व मनमिळाऊ असे. हे जे. पी] व युनिव्हर्सिटीचे फेलो होते.

[ मनोरंजन १९१० ]

**काशिनाथ गोविंद नातू** [ १८४०–१८९७ ] " कोकणस्थ ब्राह्मण. नातू यांचें मूळ गांव आचरें. हे मालवण तालुक्यांत आहे. काशिनाथपंताचें मराठी शिक्षण ताह्मनकर म्हणून मास्तर होते त्यांचे हाताखालीं झालें. व ते संपल्यानंतर इंग्रजी शिकण्याकरितां पुण्यांतील मिशनस्कूलमध्यें जाऊं लागले. ही शाळा आदितवार पेठेंत फडक्यांचें वाड्यांत असे. त्या वेळेस या शाळेचे हेडमास्तर गार्डन साहेब होते. हे फार दयाळु असत. काशिनाथपंताची हौस पाहून त्यांस समाधान वाटे. त्यांची तरतरी व चलाखी पाहून साहेबांची त्यांचेवर विशेष मर्जी बसली. १८६४ सालीं नातू मेट्रिक

झाले. व नातुस्कूल या नांवाची इंग्रजी शाळा स्थापन केली. याच सुमारास त्यांणीं जुलियस सीझर या नाटकाचें विजयसिंग नांवाचें नाटक (१८७२) प्रसिद्ध केलें. भाषांतर या दृष्टीने ते फार सुरेख वठलें आहे. व ते कृष्णशास्त्री चिपळुणकर यांस अर्पण केलें आहे.

सन १८७४ सालीं हे वकीली पास झाले व फौजदारी कोर्टांतील एक उत्तम वकील असा त्यांचा लौकिक लवकरच झाला. त्यांचें भाषण स्वभावें पण चटकदार असे. पुण्यामध्यें भाषणांचे जे अनेक प्रसंग येत त्या वेळीं नातूंचें भाषण ऐकावयास न मिळालें तर लोकांचा विरसच होई. त्यांचें भाषणांत विनोद ओतप्रोत भरलेला असे. नाटककार ही पात्रता अंगीं येण्याला प्रत्यक्ष नाटककृति उत्तम पाहिजे किंवा नाटक रचणाराची योग्यता, वजन व रसिकता ही सामाजिकदृष्ट्या आदरणीय पाहिजेत. नातू यांनीं फारशी नाटकें लिहिलीं नाहींत, तरी वरील कारणांनीं त्यांची योग्यता नाटककारांच्या मालिकेत आम्ही अधिक समजतो. पुण्यामध्ये वजनदारीनें, विद्वत्तेनें किंवा धंद्यानें प्रसिद्ध माणसांचा जेव्हां एक मोसम होता, त्यापैकी नातू हे एक होत. ते प्रसिद्ध वकील होते, उत्तम वक्ते होते, विनोदी होते, तसेंच ते नाटककार होते. त्यांनीं एकाच नाटकाच भाषांतर प्रसिद्ध केलें आहे, तरी त्याच्या योगानें त्याचें नांव महाराष्ट्र वाङ्मयांत कायम झालें आहे.

[ शं बा. मुजुमदारकृत 'महाराष्ट्रीय नाटककार' ]

**बळवंत पांडुरंग किर्लोस्कर** [ १८४३–१८८५ ] प्रतिभावान सं. नाटककार* कऱ्हाडे ब्राम्हण. जन्म बेळगांव जिल्ह्यांत गुर्लेहुसूर गावीं. यांचा मराठी व कानडी अभ्यास घरीं झाला. यांनां लहानपणापासून कविता करण्याचा नाद असे. लहानपणीं हे शंकर-जयंतीचा उत्सव करीत. सन १८६३ सालीं पुण्यास आले व तेथें इंग्रजीचा अभ्यास केला. व बेळगांवांत अँग्लो व्हर्नाक्युलर शाळेंत मास्तराची नोकरी पतकरिली. सन १८७३ त यांनीं 'श्रीशांकर-दिग्विजय' नाटक छापून प्रसिद्ध केलें. यांनीं नाटकमंडळ्या व हरिदास यांच्यासाठीं पुष्कळ आरव्यानें लिहून दिलीं आहेत. युक्तिच्या सिद्धांतांवर यांनीं कांहीं पद्यें केलीं आहेत. ता. १३ आक्टोबर १८८० रोजीं यांच्या शाकुंतल नाटकांतील पहिल्या तीन अंकांची तालीम झाली. व ता. १३ आक्टोबर रोजीं पुण्यांतील आनंदोद्भव नाटकगृहांत त्याचा पहिला प्रयोग झाला. सन १८८२ सालीं यांचें सौभद्र नाटक रंगभूमीवर आलें. रामराज्यवियोगाचा पहिला प्रयोग २० आक्टोबर १८८४ रोजीं झाला. या तिन्ही नाटकांची सर्वांकडून फारच वाहवा झाली. यांनीं रंगभूमीवर शेवटची भूमिका दशरथाची केली. यांची कविता रसाळ, प्रसादपूर्ण व उच्चप्रतीची आहे. मराठी संगीत नाटक मंडळ्यांचे हे आद्यप्रवर्त्तक होते.

[ मनोरंजन १०१० ]

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची भोजवाद, लोकशिक्षण, वर्ष १लें.

" संगीताचें आद्यकर्तृत्व रा. त्रिलोकेकर यांजकडे जरी येते तरी ती चाल जारीनें प्रचारांत आणून तिला नांवारूपास चढविण्याचें श्रेय रा. बळवंत पांडुरंग उर्फ आण्णा किर्लोस्कर यांजकडेच आहे.

[ आ वि कुळकर्णीकृत मराठी रंगभूमि ]

**रामचंद्र भिकाजी गुंजीकर** [ १८४३–१९०१ ] सारस्वत ब्राम्हण. जन्म बेळगांव जिल्ह्यांत जांबोटीं गावीं. यांचें प्राथमिक शिक्षण बेळगांवास व इंग्रजी शिक्षण मुंबईस झालें. दोन वर्षे हे कॉलेजांत होते, पण घरच्या गरीबीमुळें पुढें कॉलेज सोडून यांनां नोकरी धरावी लागली. यांनीं शाळाखात्यांत बरींच वर्षे काम करून सन १८९८ त पेन्शन घेतलें. मराठी भाषेची यांनीं पुष्कळ सेवा केली. यांनीं ' विविधज्ञानविस्तार ' मासिक पुस्तक काढले. हे उत्तम लेखक होते. यांचे व्याकरणावरील निबंध मोठे मार्मिक आहेत. यांची ' मोचनगड ', ' सौभाग्यरत्नमाला ' 'महाराष्ट्र भाषेची लेखनशुद्धि', ' लाघवीलिपि ', कन्नडपरिज्ञान ', ' कौमुदी महोत्सव ' व ' रामचंद्रिका ' वगैरे पुस्तकें प्रसिद्ध आहेत. यांची भाषा सरळ, सोपी आणि प्रासादिक असे.

[ मनोरंजन १९१० ]

" रामभाऊ गुंजीकर यांची सर्वत्र ख्याती आहे ती ते उत्तम शिक्षक अथवा विद्वान गृहस्थ होते म्हणून नव्हें, तर ते मराठी

आर्षेंतील एक मार्मिक ग्रंथकार होतें, म्हणून होय. ज्या वेळीं मराठामध्यें 'ज्ञानप्रसारक' हेंच एक मासिक पुस्तक होतें त्या वेळीं म्हणजे स. १८६७ सालीं रामभाऊनी कांहीं मित्रांच्या साह्यानें 'विविधज्ञानविस्तार' चालू केला व आपल्या मार्मिक आणि ज्ञानपरिपूर्ण लेखानीं त्यास मोठ्या योग्यतेस चढविले. विस्ताराची टीकाकार म्हणून जी प्रसिद्धी आहे ती त्यास मूळ रामभाऊमुळेच प्राप्त झाली."

[ मृत्युलेख, वि. ज्ञा. विस्तार, मार्च १९०१ ]

**पुरुषोत्तम गोविंद नाडकर्णी** [ १८४४–१९०० ] सारस्वत ब्राम्हण, जन्म सांवतवाडी संस्थानांत कसाल गांवी. यांचा विद्याभ्यास मुंबईस झाला. विविधज्ञानविस्ताराशी यांचा संबंध १८७० सालात जुळून आला व पुढें त्याची सर्वमालकी १८७४ सालीं यांचाकडे आली. संकटांस न जुमानत यांनी ३० वर्षे विविज्ञान विस्ताराचें पालन केलें व त्याचा लौकिक कायम राखून तो वाढविला. गणपत कृष्णाजीच्या छापखान्याचे कांहीं वर्षे हे व्यवस्थापक होते. यांनीं नामांकित ग्रंथकारांचीं बरींच मराठी पुस्तकें प्रसिद्ध करून मराठीं वाङ्मयांत भर घातली.

[ मनोरंजन १२१० ]

**आण्णा मोरेश्वर कुंटे** [ १८४४–१८९६ ] कोंकणस्थ ब्राह्मण. जन्म साताऱ्याजवळ माहुली क्षेत्रीं. विद्याभ्यास पहिल्यानें

कोल्हापुरास व नंतर मुंबईस झाला. हे सन १८६६ सालीं एल्फिन्स्टन कॉलेजांतून बी. ए. झाले. पुढें १८७० त एल्. एम्. व १८७४ त एम. डी झाले हे मुंबई इलाख्यांतील पहिले एतद्देशीय एम्. डी. होत. चिकित्सेंत हे फार निष्णात होते. यांनीं वाग्भट ग्रंथ शुद्ध करून प्रसिद्ध केला. स्त्रीरोगचिंकित्सा या नांवाचें एक पुस्तकहीं यांनीं लिहिलें आहे. पुष्कळ परिश्रम करून यांनीं स्वदेशी आगकाड्या तयार करण्याचा एक कारखाना मुंबईस काढला होता. हे बरींच वर्षे ग्रांट मेडिकल कॉलेजांत शारीरशास्त्राचे प्रोफेसर होते. पारमार्थिक ज्ञानाची यांनां गोडी होती. यांनीं ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हे ग्रंथ अर्थनीर्णायक टीपा देऊन प्रसिद्ध केले आहेत.

[ मनोरंजन १९१० ]

**गोविंद शंकरशास्त्री बापट** [१८४४–१९०४] कोंकणस्थ ब्राह्मण. जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत पुळ्यांचे गणपती गांवीं. यांचें मराठीं शिक्षण पूर्ण झाल्यावर वडिलांच्या हाताखालीं वेदाध्ययन झालें. पुढें पुण्यास येऊन न्याय व व्याकरण पढले. नंतर ट्रेनिंग कॉलेजचीं परीक्षा दिली. सन १८६८ साली यांना ठाण्याच्या हायस्कूलांत शास्त्री नेमिले. तेथून अहमदनगर येथें गेले व फिरून तेरा वर्षांनी ह्मणजे सन १८८१ सालीं मुंबईस एल्फिन्स्टन हायस्कूलात यांची बदली झाली. त्याच जागीं हे पेन्शन घेईपर्यंत

होते. यांनीं खासगी रितीनें इंग्रजी अभ्यास करून त्या भाषेंत प्राविण्य संपादिलें. हे उत्तम मराठी ग्रंथकार होते. यानीं पुष्कळ पुस्तकें लिहिलीं आहेत. ' पाल आणि व्हर्जिनिया ', ' दिनार्बेस ', ' सद्वर्तन ', ' हरि आणि त्रिंबक ', ' गद्यरत्नमाला ' ' दाशरथी रामचरित्र ' ' नीतिमंदिर ' इत्यादि यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. यांची भाषा शुद्ध, सरळ व गोड असे.

[ मनोरंजन १९१० ]

**पांडुरंग गोविंद शास्त्री पारखी** [ १८४०–१९११ ] देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. हे ग्रंथकार आणि कवि पुणें जिल्ह्यांत खेड तालुक्यांतील मौजे कडूस येथें जन्मले. हे कडूस येथील वृत्तिवान् असून नानाफडणीसाचे आश्रित होत. त्यांच्या मातोश्री हे अगदीं लहान असतांच निवर्तल्यामुळें हे आपल्या चुलत्याचा परिवारांत असत. ह्यांचे बहुतेक बालपण उनाड मुलांच्या संगतींत खेळण्यांत गेले, व त्यांत विद्येची फार हेंडसाळ झाली हे सुमारे तेरा वर्षांचे झाल्यावर आपल्या वडिलांजवळ अध्ययन करूं लागले. नंतर पुण्यास येऊन येथील संस्कृत पाठशालेंतील प्रसिद्ध पंडित बाळशास्त्री देव ह्यांजपासीं ह्यांनीं व्युत्पत्ति, व्याकरण आणि अलंकार शास्त्राचें चांगलेच परिशीलन केलें. पुढें घरच्या गरीबीमुळें ह्यांनां सरकारी नोकरी पतकरावी लागली. संस्कृत भाषेचे चाहते डॉ. सिंक्लेअर साहेब वऱ्हाडांत डायरेक्टर झाल्यावर त्यांनीं सन १८६७

साली तिकडील शाळाखात्यांत पुण्याहून कित्येक लोक नेले, त्यांत रा. पांडुरंगशास्त्री होते. तिकडे गेल्यावर ह्यांनीं शालोपयोगी अनेक विषयांचें इंग्रजीचें ज्ञान संपादन करून सरकारी नोकरी उत्तम प्रकारें बजाविली. आणि मोठमोठ्या विद्वान अधिकाऱ्याकडून वाहवा मिळविली. पेन्शन घेतल्यानंतर हे नानाफडनवीस यांच्या बेलबागेंत पुराण सांगत असत. ह्या कवीनें ' कादंबरीसार ', ' मित्रचंद्र ' ' बाणभट्ट ' ' हर्ष ' वगैरे गद्यग्रंथ व ' षट्ऋतुवर्ण ' ' कृष्णाकुमारी ' व ' बोधामृत ' वगैरे काव्यें केलीं आहेत. कित्येक ठिकाणचे क्लेशदायक श्लेष वजा केले असतां ह्या कवीची कविता प्रौढ, नानारसालंकारांनीं मंडित व उच्च प्रतीच्या वाचकांचे मनोरंजन करणारी आहे.

[ चं. शि. गोऱ्हे कृत अर्वाचीन कविता पूर्वार्ध ]

**वामन दाजी ओक** [१८४४–१८६१] कोंकणस्थ ब्राह्मण. जन्म कोकणांत गुहागराजवळील हेद्वी गांवीं. स्थिति फारच गरीबीची होती. अभ्यास रत्नागिरी हायस्कुलांत झाला. सन १८७० मॅट्रीक झाले. मुंबईस खासगी शाळांतून दोनतीन वर्षे नोकरी केली. स. १८७५ सालीं नागपूर सिटिस्कूल मध्यें फर्स्ट असिस्टंटच्या जागी नेमणूक झाल्यानंर याच शाळेचे ते हेडमास्तर झाले. नंतर संबलपूर व रायपूर हायस्कुलांत हेडमास्तर झाले. १८९० पासून आपल्या अंतकालापर्यंत ' काव्यसंग्रहाचें संपादक होते. हे उत्तम कवि आणि

लेखक होते. 'श्रीमन्माधवनिधन', 'गणपतिनिधनविलाप' वगैरे यांचे काव्यग्रंथ प्रसिद्ध आहेत. मराठी कवितेचा व्यासंग दांडगा होता. स्वभावानें शांत, निगर्वी व निर्व्यसनी होते.

[ मनोरंजन १९१० ]

जनार्दन बाळाजी मोडकः—[ १८४५–१८९० ] काव्यसंशोधक व ज्योतिष जिज्ञासु.* कोकणस्थ ब्राह्मण. जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोली तालुक्यात पंचनदी गावीं. मराठीं शिक्षण बारशीस व इंग्रजी शिक्षण पुणें हायस्कुलांत झाले. स. १८६६ त मॅट्रिक व स. १८७० डेक्कन कॉलेजांतून बी. ए. झाले. नाशिक व रत्नागिरी येथील हायस्कुलांत फर्स्ट असि. मास्तर व पुढें ठाण्यास हेडमास्तर झाले. यांच्या कारकिर्दीत ठाणें हायस्कूलची फार भरभराट झाली. हे उत्तम शिक्षक होते. स्वभाव शांत, प्रेमळ पण करारी असे. नेहमी कर्तव्यतत्पर व टापटीप फार. ज्योतिष व काव्य यांचा व्यासंग दांडगा होता. हे उत्तम लेखक होते. निबंधमाला व विविधज्ञानविस्तारांत यांचे पुष्कळ लेख प्रसिद्ध झाले आहेत. काव्येतिहास संग्रहाचे हे उत्पादक व चालक होते. काव्यसंग्रहाचेहीं हे कित्येक वर्षे संपादक होते.

[ मनोरंजन १९१० ]

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषांची मोजदाद. लोकशिक्षण; वर्ष १ ले.

"जनार्दनपंत स्वतः कवि होते किंवा नाहीं हें अम्हांस माहित नाहीं. परंतु ते रसिक होते ही गोष्ट निर्विवाद आहे. कवितेचा भोक्ता व रसिक होण्यास मनुष्यानें स्वतः कवि असलेच पाहिजे असें नाहीं. एका जुन्या कवीचें या संबंधानें असें ह्मणणें आहे कीं 'कवि करोति काव्यानि रसंजानति पंडितः"

[ हरि माधव पंडितकृत चार चरित्रात्मक लेख. )

**आनंदराव सखाराम बर्वे** [ १८४५–१८९३ ] कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म कोकणांतील अथणी गावीं झाला. बर्व्यांचे घराणे मूळचे गरीबच होते, पण आनंदरावांचे आजे कृष्णराव यांनीं अव्वल इंग्रजींत मामलत संपादन केली, त्यामुळें आनंदरावांच्या जन्माच्या वेळीं बर्वे घराण्याची साधारण बरी स्थिति होती. प्राथमिक शिक्षण ठाण्याच्या आंग्लोव्हर्नाक्युलर शाळेंत सुरू झाले. सन १८६३ त प्रवेश परिक्षा पास झाले व नंतर डॉ. उइलसनच्या कॉलेजात दाखल झाले. या पुढील कॉलेजांतला खर्च ते स्कॉलरशिपा व शिकविण्यावर भागवीत. दुसरी परिक्षा पास झाल्यावर यांनीं कायद्याची टर्म भरली व बी. ए. झाल्या नंतर डॉ. विल्सनचे हायस्कुलांत शिक्षकाचें काम केलें. १८७२ सालीं सर टी. माधवराव इंदूरचे दिवाण असतां त्यांनीं यांस प्रांत न्यायाधिशाची जागा दिली. तेथें यांनीं सन १८७७ पर्यंत काम केलें. सन १८७८ च्या डिसेंबर महिन्यांत आनंदरावांस बडोद्यांस सिटी जज्जाची जागा

मिळाली. पुढें सन १८८२ त मिलटरी सेक्रेटरी व १८९२ त हे वरिष्ट कोर्टचे न्यायाधिश झाले हें काम ते अखेरपर्यंत करीत होते.

आनंदरावांस मराठी भाषा फार उत्तम रितीनें सजवितां येत असे. ' ठगाची जबानी, हा ग्रंथ वाचीत असतां तो इंग्रजी ग्रंथाचे भाषांतर आहे या गोष्टीची वारंवार विस्मृति पडते. पण या कृतींत मार्मिक व यथारूप भाषांतरापलीकडे कर्त्याची विशेष कांहीं कर्तबगारी प्रगट झाली आहे, असें दिसत नाहीं ' हिंमतबहादूर ' या नाटकांत मात्र त्याच्या कर्त्यांची करामत फार उत्तम तऱ्हेनें व्यक्त झाली आहे. इंग्रजीचा गंध नसणाऱ्यास देखील तें कोठेही दुर्बोध वाटणार नाहीं. मूळ नाटककाराच्या कृतींतले रहस्य व हृद्गत यांत यथासांग उतरलें आहे. तथापि, भाषांतर असून देखील ही कृति स्वतंत्र आहे असा भास होतो. आणि तिच्या जनकाची प्रसंशनीय कल्पकता व योगकता याविषयीं फार अनुकूल ग्रह होतो. खरोखर या कृतीवर त्यांची रसभरित लेखणी शेवटीं फिरती तर ती याहूनही अधिक रमणीय व चित्ताकर्षक झाली असती.

[ विविधज्ञान विस्तार पु. ३३ तील देव याचा लेख संक्षेप ]

**महादेव चिमणाजी आपटे** [ १८४९–१८९४ ] ग्रंथ संग्रहकार *यांचा जन्म शके १७६७ च्या फाल्गुन महिन्यांत झाला

---

+ राजावाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण वर्ष १ लें.

हे लहानपणापासून मोठे बुद्धिमान आणि अभ्यासी असत. घरचीं चांगलीशी स्थिति नसतांही हे आपल्या वयाच्या बाविसाव्या वर्षीं बी. ए. आणि चोविसावे वर्षीं एल. एल. बी. झाले. ह्या दोन्ही परीक्षांत. ते पहिले आले होते. एल. एल. बी. झाल्यावर हे कांहीं काल मुंबईतल्या नानाशंकर शेटच्या इंग्रजी शाळेंवर हेडमास्तर होते. हे फार चांगले शिक्षक होते. यांना भाषाविषय फार आवडत असत ह्यांची योग्यता जाणून ह्यांस सरकारनें युनिव्हर्सिटीचे फेलो नेमिलें होतें.

ह्यांस मराठी चांगलें लिहितां येत असे. " भौजेच्या चार घटिका ' ह्मणून त्यांनी शाकुंतल नाटकाचें भाषांतर लिहून प्रसिद्ध केले. त्यांत त्यांची पुष्कळ मार्मिकता व्यक्त झाली आहे. त्यांस जर अवकाश सापडतां तर त्यांचें हातून आणखी कितीएक चांगले ग्रंथ उत्पन्न झाले असते. हे आपल्या इच्छेप्रमाणें शेवटीं ' आनंद-सरस्वति ' या नांवानें समाधिस्थ झाले.

वडिलोपार्जित घर अगदीं मोडकळीस आलेले पाहून तें नीट करण्याची उत्कृष्ट इच्छा व्हावी, हें स्वदेशाभिमाचें मोठे अंग आहे. आणि ते माणसास फार भूषणावह आहे. तें महादेवरावांच्या ठायीं होते आणि पदरचे लाख दीड लाख रुपये खर्चून, प्राचीन संस्कृत ग्रंथाच्या जीर्णोद्धारार्थ ' आनंदाश्रम ' ह्मणून जी एक चिरस्थायी

संस्था ह्यांनीं पुणें शहरांत करून ठेविली आहे, तीवरून ह्याची साक्ष चांगली पटत आहे. ह्या संस्थेमध्यें नुसत्या प्राचीन ग्रंथांचा जीर्णोद्धार व्हावयाचा आहे, असें नाहीं. तर, प्राचीन संस्कृत विद्येचा अभ्यास करणाऱ्या दहा बारा विद्यार्थ्यांची सर्व प्रकारची सोय व्हावी, आणि प्रत्यहीं पांच संन्याशांस तरी पुडी तेथें मिळावीं अशी योजना त्यांनीं करून ठेविली आहे.

[ बालबोध, पु. १४ वें. ]

**बाळाजी प्रभाकर मोडक** [ १८४७–१९०६ ] भौतिक-शास्त्र भाषांतरकार* कोंकणस्थ ब्राम्हण. मराठी शिक्षण सांगली येथें व इंग्रजी शिक्षण बेळगांव व मुंबई येथें एफ ए. पर्यंत झालें. १८६९ सालीं कोल्हापुरास राजाराम हायस्कुलांत शिक्षकाची नोकरी पत्करली व हें काम करीत असतां रसायन व इतर शास्त्रांचा खासगी रितीनें अभ्यास करून दीर्घोद्योगानें त्यांत प्राविण्य संपादिलें. पुढें कांहीं दिवस हे श्रीमंत मिरजकर व श्रीमंत महाराज छत्रपति यांचे ट्यूटर होते. १८८० सालीं कोल्हापुरास कॉलेजची स्थापना झाली. त्या वेळीं यांनां रसायनशास्त्राचे प्रोफेसर नेमिले शिक्षणाचें काम संभाळून राहिलेल्या वेळांत यांनी ऐतिहासिक व

+ राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षक. वर्ष १ लें.

शास्त्रविषयक सुमारे ३५–३६ ग्रंथ लिहिले आहेत. यांचा ' शक व सन यांची जंत्री ' हा ग्रंथ उपयुक्त आहे.

[ मनोरंजन १९१० ]

" या ( १८७५–१८८० ) काळांतील मराठी शास्त्रीय वाङ्मयाचे खरे अध्वर्यु बाळाजी मोडक हे होत. प्रबलउद्योगप्रियता दृढनिश्चय आणि साधेपणा हे यांच्या अंगचे गुण खरोखर अवर्णनीय होते. सन १८६०–६५ सालीं सर्व महाराष्ट्र आंग्लमय होण्याची जी लाट उसळली होती तिला परत फिरविण्याचें कामीं ज्यांनीं अलोट प्रयत्न केले–त्या विष्णुशास्त्र्यांच्या तोडीची कामगिरी–शास्त्रीय विषयापुरती तरी–बाळाजी प्रभाकरांनीं केली यांत संशय नाहीं. "

[मराठी शास्त्रीय वाङ्मयाचा इतिहास, वि. ज्ञा. विस्तार पु. ३९ वें ]

**नारायण धोंडदेव खांडेकर** [ १८४७ ] कऱ्हाडे ब्राम्हण. हे कवि साताऱ्यानजीक तीन चार कोसावर कृष्णातिरीं असलेल्या निंब नांवाच्या खेडेगांवी जन्मले. हे सुमारे ५ वर्षांचे असतां यांचे वडील यांस बडोदें येथें घेऊन आले. व हे ११ वर्षांचे होईपर्यंत त्यांनीं यांजकडून वेदाध्ययन करविलें. परंतु वेदाची केवळ घोकंपट्टी करण्याचा कंटाळा आल्यानें यांचे लक्ष त्या विद्येकडे लागेनासें झालें. सबब, ' ही विद्या यांचें कपाळीं नाहीं ' असें

समजून वडिलांनी ह्यांस मराठी शाळेंत घातलें. तेथें यांनीं तीन वर्षें सामान्य व्यवहारोपयोगी शिक्षण मिळविलें. नंतर खासगी गुरू-जवळ यांनी गणितशास्त्र. संस्कृतकाव्यें व अलंकारशास्त्र ह्यांचें बरेंच परिशीलन केलें. आपल्या वयाच्या २२ व्या वर्षीं यांनीं सर-कारी नोकरी पतकरिली. मार्कंडेयचरित्र रतिविलाप, भट्टपादचरित्र व शंकराचार्यजन्म अशी चार आख्यानें व इतर स्फुट कविता मिळून ह्या कवींनीं सुमारें १०० कविता रचेली आहे. यांचीं कविता प्रौढ व नीतिपर असून तींत शद्बलालित्य हा गुण प्रधानत्वानें दिसून येतो.

[ चं. शि. गोऱ्हे कृत. अर्वाचीन कविता पूर्वार्ध ]

**कृष्णाजी परशुराम गाडगीळ**–[१८४७-१८९१] कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म पुणें येथें झाला. घरची स्थिति फार गरीबीची होती. विद्याभ्यास पुणें येथें स्कॉलरशिपा वगैरे मिळवून बी. ए. पर्यंत झाला. सन १८६७ त शाळाखात्यांत नोकरी धरलीं. व खान-गीरीतींनें अभ्यास करून १८७८ सालीं वकीलीची व १८७९ सालीं मुनसफाची परीक्षा दिली. यांनी अनेक ठिकाणीं मुनसफाचें काम केले. यांना विद्येची मोठी गोडी होती. व यांचा व्यासंग सतत चालू होता. यांनीं मराठींत पुष्कळ लेख लिहिले आहेत. यांचे 'संसारसुख', 'सिसिरोचे निबंध', 'समाजघटना', 'वेषविभ्रम' हीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. हे चांगले कविही होते. 'देवीश्रीविद्वि-

क्टुरिया सार्वभौमिनी ' या राष्ट्रगीताचे कर्ते हेच आहेत. हे उत्तम शिक्षक होते. संन्यास घेऊन ' विद्यानंदस्वामी ' या नांवानें हे समाधिस्त झाले. "

[ मनोरंजन १९१० ]

**आण्णा मार्तंड जोशी** [ १८४८-१८९८ ] हेही आण्णासाहेब किर्लोस्कर यांचे समकालीन नाटककार होत. हे आण्णासाहेबास गुरुस्थानीं समजत असत. आण्णासाहेब बेळगांवास असतांना ' भरतशास्त्रोत्तेजक ' या नांवाची एक मंडळी त्यांच्या देखरेखे खालीं स्थापन झाली होती. तिच्या उत्पादकापैकी आण्णामार्तंड एक होते. त्यानंतर मुंबईस १८७९ सालीं उद्योगानिमित्त आले असतांना याच नावानें तेथील हौशी मंडळी जमा करून ते प्रयोग करीत असत. त्यांनीं सं. सौभाग्यरमा, सं. सावित्री, व सं शिवछत्रपतिविजय अशीं तीन स्वतंत्र नाटकें रचलेलीं उपलब्ध आहेत. या नाटकांचे प्रयोग ' आर्यनाट्यकलोत्तेजक ' नांवाच्या मंडळीच्या द्वारें फक्त मुंबई शहरांत होत असत. सौभाग्यरमा नाटक सामाजिक होते. त्यामुळें त्याच्या प्रयोगासंबंधानें कांहीं दिवस मुंबई शहरांत नाटक पहाणारे लोकांस उत्सुकता होती. आण्णामार्तंड हे सुधारक मताचे होते. त्यांनीं नाटकाच्या द्वारें अबला स्त्रियांच्या दुःखदस्थितीचें चित्र रमा नाटकांत उठविलें आहे. नोकरी संभाळून ते नाटकें लिहिण्याचें काम करीत, व तीं

तयार झाली म्हणजे आपल्या छात्रवर्गाकडून त्याचे रंगभूमीवर प्रयोग करवीत. संगीत मृच्छकटिक व उत्तर रामचरित्र अशीं आणखी दोन नाटकें त्यांनी तयार केली आहेत. परंतु तीं आतां उपलब्ध नाहींत. संगीत नाटकाच्या पहिल्या अमदानींतले किर्लो-स्करांचे अनुयायी डोंगरे यांच्या प्रमाणेंच आण्णामार्तंड यांचें नांव निघाल्याशिवाय राहणार नाहीं.

[ शं. बा. मुजुमदारकृत महाराष्ट्रीय नाटककार ]

नारायण मेघाजी लोखंडे [ १८४८–१८९८ ] फूल माळी. जन्म ठाणें येथें. मराठी व इंग्रजी शिक्षण ठाणें येथें होऊन नंतर हे मुंबईस आले. रेल्वेखात्यांत व पोस्ट ऑफिसांत कांहीं दिवस काम केल्यावर पुढें मांडवीमिलमध्यें यांना स्टोअरकीपरची जागा मिळाली. महाराष्ट्र सत्यशोधक समाजाच्या संस्थापकांपैकीं हे एक होते. सन १८८१ सालीं 'दीनबंधू' चें संपादकत्व यांच्याकडे आलें. मागसलेल्या जातींच्या सुधारणेविषयीं व गिरण्यांतील लोकांच्या दुःखासंबंधानें त्या पत्रांत अनेक लेख लिहून यांनीं लोकमत जागृत केलें, 'मिलह्यान्डस् असोसिएशन' यांनींच स्थापन केली. यांच्या चळवळीमुळें सरकारास गिरण्यांच्या स्थितींच्या चौकशीसाठीं एक कमीशन नेमावें लागलें व त्याचें चांगले परिणाम झाले. जंगलाच्या कायद्यापासून लोकांना त्रास होत असे, त्या संबंधानेंही यांनीं पुष्कळ लिहिलें व त्याच्या बराच उपयोग झाला.

यांच्याच प्रयत्नानें मागसलेल्या वर्गातील विद्यार्थ्यांस सरकारांतून कांहीं सवलती मिळाल्या. यांची कामगिरी पाहून यांनां सरकारानें जे. पी. केले व रावबहादुर हा किताब दिला.

[ मनोरंजन १९१० ]

**हरि माधव पंडीत** [१८४९–१८९९] टीकाकार.* कोंकणस्थ ब्राम्हण. जन्म सांगली संस्थानांत हरिपूर गावीं मराठी शिक्षण हरिपूरास व इंग्रजी शिक्षण मुंबईस मिशनरी शाळेंत झालें. १८६९ सालीं मॅट्रिक झाले व कॉलेजांत जाऊन तीन वर्षे अभ्यास केला पण कौटुंबिक अडचणीमुळें कॉलेज क्षिशण सोडून यांनां नोकरी पतकरावी लागली. सन १८७२ त सालीं नागपूर सिटी स्कूलच्या हेड मास्तरच्या जागीं नेमणूक झाली. १८८२ सालीं नागपूरकर भोसले यांच्याकडे डेप्युटी मॅनेजर झाले. १८८६ त जबलपुरास कोर्ट ऑफ वार्डचे डे. म्यानेजर झाले व १८९१ त ही जागा सोडून यांनीं 'देशसेवक' पत्र सुरू केले व पुन्हां भोसले यांच्याकडे पूर्वीच्या जागीं राहिले. 'विविधज्ञानविस्तारा' चे त्या मासिक पुस्तकाच्या सातव्या वर्षापासून तो आपल्या देहावसान कालापर्यंत हे संपादक होते. हे उत्तम शिक्षक, कसलेले लेखक व मार्मिक टीकाकार होते. तसेंच सामाजिक सुधारणेचेही कट्टे पुरस्कर्ते होते.

[ मनोरंजन १९१० ]

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ ले.

" ग्रंथ परीक्षणांत त्यांचा ( पंडिताचा ) मोठा हातखंड असे. ग्रंथांतल्या चांगल्या अल्पही गुणाबद्दल ग्रंथकारास पुष्कळ शाबा-सकी द्यावयाची, दोष मोठे असले तर ते अशा रितीनें दाखवावयाचे कीं त्या विषयीं ग्रंथकारास वाईट न वाटतां, त्यावरून आपल्या सुधारणेची दिशा त्यास कळून, टीकाकाराविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न व्हावयाची, आणि ग्रंथकारास ती टीका वाचतांना गुद-गुल्या व्हावयाच्या. "

[ बालबोधांतील मृत्युलेख. ]

**कान्होबा रणछोडदास कीर्तिकर** [ १८४९–१९१७ ] सूर्यवंशी पाठारे प्रभू हे सुप्रसिद्ध ग्रंथकार आणि कवि मुंबई येथें जन्मले. यांचें मराठी आणि प्राथमिक इंग्रजी शिक्षण 'प्रभुशाला', 'एलफिन्स्टस इंन्स्टिट्यूट' व 'विल्सनस्कूल' ह्या विद्यालयांत झालें. सन १८६६ त एफ. ए. ई. च्या परिक्षेंत हे उत्तीर्ण झाले. व १८७४ सालीं आंग्ल वैद्यकाचा अभ्यास करण्यासाठीं इंग्लंडास गेले. तिकडे मोठमोठ्या नामांकित पाठशाळांत उत्तम प्रकारें अभ्यास करून व अनेक विद्यावेतनें व बाक्षिसें मिळवून सन १८७७ त आय. एम. एस. (इंडियन मेडि. सर्विस) झाले. नंतर हिंदुस्थानांत येऊन हे सरकारी दवाखान्यांत नोकर झाले. नोकरीच्या संबंधानें यांनां हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणी फिरावें लागले, इतकेंच नव्हे तर त्यांनां बलुचिस्तान व अफगणिस्तान ह्या देशांतही मोठा कष्टतर

प्रवास करावा लागला. हे मोठे शोधक वैद्य, उत्तम वक्ते आणि शास्त्रीय विषयावर मराठींत व इंग्रजींत लेख लिहिणार असून शिवाय एक चांगले अर्वाचीन कवि आहेत. ह्यांनीं ' भक्तिसुधा ', ' विलापलहरी, ' ' इंदिरा ' ही काव्यें व ' रशिया ' वगैरे गद्यग्रंथ लिहिले आहेत यांची कविता प्रसन्न आणि रसाळ आहे. विशेषतः ' विलापलहरी ' हें काव्य हृद्यंगम उतरलें आहे.

[ वा. शि. गोऱ्हेकृत अर्वाचीन कविता पूर्वार्ध. ]

" नवीन पद्यवाङ्मय गद्याकडे जास्त वळलेलें असतें. तेव्हां ' ही कसली कविता ? ' असें ह्मणून पुष्कळ वाचक नाकें मुरडतात. त्यांचें ' राजा शिवाजी ' काव्य आणि कीर्तिकरांचें ' इंदिरा ' काव्य प्रसिद्ध झालें, तेव्हां त्यावर अशाच प्रकारच्या टीका झाल्या. टेनिसनच्या ' प्रिन्सेस ' चे हे भाषांतरमय काव्य अगदीं नवीन प्रकारचें आहे. "

[ मराठी भाषेची घटना पृ. २८४ व २९० ]

**सिमियन बेंजामिन बॉकर** [ १८४९ ] ज्यू. यांचा जन्म आलिबागेस झाला. तेथें यांच्या वडिलांचें कापडाचें दुकान होते व तें बेंजामिन साहेबांच्या सचोटीच्या व्यवहारामुळें फार भरभराटींत चाले. परंतु हें दुकान बेंजामिनसाहेबाच्या अकाळ मरणानें एकाएकीं खालीं बसलें व यानंतर सिमियन साहेबांस

मुंबईस येऊन चारितार्थ साधनासाठीं ह्मणून नोकरीचाकरी पहावी लागली. परंतु निसर्गतःच त्यांनां तत्वज्ञान व वाङ्मय या दोन विषयांची आवड विशेष असल्यामुळें यांच विषयाकडे ते आपणास अधिकाधिक वाहून घेऊं लागले. मराठींत हे विविध विषयांवर निबंध लिहीत व हे सर्व निबंध त्या वेळीं लोक फार आवडीनें वाचीत. वक्तृत्वकलाही यांच्या अंगीं उत्तमरितीनें वास करीत होती व यांचीं भाषणें ऐकतांना श्रोतृसमुदाय तल्लीन होऊन जात असे. त्या वेळच्या सरकारी क्रमिक मराठी पुस्तकांतून शिरलेल्या कांहीं अश्लील कविता यांच्याच प्रयत्नानें दूर करण्यांत आल्या. यांच्या निरलस उद्योगावरून तर कै. म. गो. रानड्यांनीं यांनां 'हिन्दुस्थानचा सार्क्रेटीस' ही पदवी बहाल केली होती. यांनी मार्कस एरालिअस याची बोधवचनें, योग साधन, अपशब्दनिषेध. कामदृष्टि, मुलांस वागविण्याची रीत इत्यादि लहानमोठीं दहाबारा पुस्तकें लिहिलीं आहेत. [ संपादक ]

**नारायण हरी भागवत**–हे मराठी भाषेचे प्रसिद्ध प्रहसनकार होत. ह्यांचा जन्म पुणें येथें ता. १९ सप्टेंबर, इ. स. १८४९ रोजीं झाला. यांचें मुळगांव मुरवाड, तालुका संगमेश्वर, जि० रत्नागिरी, हें होय. ह्यांचे वडील हरी पंत भागवत हे कथेकरी होते.

नारायणरावांचा विद्याभ्यास पुणें येथें झाला. ते १८६१ चे सप्टेंबर महिन्यांत, पुणें येथील हायस्कुलांत दाखल झाले; व

१८६५ च्या मार्चीत त्यांनीं हायस्कूल सोडण्याचें कारण त्यांच्या वडील बंधूचा मृत्यु होय. घरची गरीबी असल्यामुळें त्यांस लवकरच नोकरी धरणें भाग पडलें. ते पहिल्यानें फॉरेस्ट खात्यांत इन्स्पेक्टर होते; ते काम वर्ष दीड वर्ष केल्यावर, ते मुंबईत बी. बी. सी. आय्. रेलवेत नोकरीवर राहिले. तेथें कांहीं वर्षे गेल्यावर, १८७१ सालीं ते खानेसुमारीच्या खात्यांत शिरले. तेथें सुमारे तीन वर्षे राहून, ता. १ जुलई १८७४ साली ते सॅनेटरी कमीशनरचे कचेरींत काम करूं लागले व शेवटपर्यंत ते तेथेंच होते. त्या खात्यांत असतांनां, वरिष्ठ कामदार लोकांची त्यांजवर चांगली कृपादृष्टि असे.

नारायणरावांचा काल हा इंग्रजीराज्याचा आरंभकाल असल्यामुळें, त्यावेळीं, महाराष्ट्रातील बडे बडे लोक इंग्रजी विद्येनें आणि सुधारणेने दिपून गेले होते. त्यांची, आपलें तेवढें सगळेंच बाईट व इंग्रजांचें तेवढें सगळें चांगलें, अशाप्रकारची स्वाभिमानशून्यतेची समजूत होऊन त्यांच्या वर्तनांत, लेखांत व भाषणांत त्याच विचारांचा गोंधळ माजून राहिला होता. प्रसिद्ध ‘ लोकहितवादी ’ यांचे ग्रंथ, ह्या स्थितीची साक्ष उत्तमप्रकारें देतात. अशा कालीं, निबंधमालाकार, कै० ना. बा. कानिटकर व. कै० नारायण हरि भागवत यांच्या ग्रंथांचा महाराष्ट्रांत स्वाभिमानाचा पुनरुद्गम करण्याच्या कामीं प्रमुखत्वानें उपयोग झाला. निबंधमालाकारांचे सणसणीत लेख, कानि-

टकरांचीं सामाजिक नाटकें व भागवतांचीं बाष्कळ सुधारणांचे दुष्परिणाम समाजास दाखविणारीं प्रहसनें यांनीं, लोकांच्या विचारांत मोठीच क्रांति केली, यांत संशय नाहीं. नारायणराव भागवत हे मोठे जाडे विद्वान् होते असें नाहीं, तथापि प्रहसनकाराच्या अंगी जे गुण असावे लागतात, ते त्याच्या अंगीं पूर्णत्वानें वास करीत होते व मराठी भाषेचें ज्ञानही त्यांस चांगलें होतें. त्याच्या सर्व ग्रंथाची यादी पुढें दिली आहे.

प्रहसनें—मोर एल्. एल्. बी. ( १८८२ ), स्त्रीविद्यावैचित्र्यदर्शन ( ३ री आ. १८८९ ), फॅशनेबल वाईफ अथवा विचार सन्निपात ( १८८९ ); फरडामुत्सद्दी ( १८८९ ); पुनर्विवाह दुःखदर्शन ( १८८४ ) राष्ट्रीयविचार; हुंडाप्रहसन.

नाटकें—भाषासुंदरी अथवा विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें नाट्यावतरण ( १८८४ ); भार्याप्रमाद अथवा पतिविडंबन, मसलत फसली अथवा राजविजय.

चरित्रें—अक्कलकोटच्या स्वामींचें चरित्र २ भा. ( १८७९ ) ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र.

निबंध—सद्यःस्थितीचा रंग अथवा प्रहसन पुस्तकावरील खटला; सभ्यांचे तट अथवा आमच्यांतील ठळक ठळक भेद, स्त्रिया साहसी किंवा दुराचारी होण्यास बालविवाह कारण आहे काय (१८७७), धंद्याची विल्हेवारी ( १८७९ ).

वेदांत—गीताज्ञानेश्वरीरहस्य; सार्थपरमामृत.

किरकोळ—रामजन्म; कृष्णजन्म; एकादशी; मगळागौरी, व सीतास्वयंवर, ह्या प्रमाणें त्यांचीं एकंदर छापलेलीं पुस्तकें २३ आहेत. व त्यांतील बहुतेक पुस्तकांच्या पुष्कळ आवृत्ति निघाल्या आहेत; ह्यावरून त्यांच्या पुस्तकांची लोकप्रियता चांगली व्यक्त होते; आणि हीं सगळीं पुस्तकें, त्यांनीं आपली नोकरी संभाळून लिहिलीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. त्यांनीं आपलीं प्रहसनें ज्या कालास अनुलक्षून लिहिलीं आहेत, तो काल हल्लीं पालटला आहे, तथापि भाषा व तत्कालीन परिस्थिति समजून घेण्यास हीं पुस्तकें फार उपयोगीं आहेत त्यांत संशय नाहीं. त्यांचे निबंध तर अवश्य वाचण्यासारखे आहेत. त्यांच्या निबंधांची भाषा फार जोरदार व कोटिक्रमयुक्त असून, प्रतिपक्षाच्या मर्मस्थानावर मारा करण्याची त्यांची पद्धति निबंधमालेच्या पद्धतीसारखी दिसते. एकंदरीत पाहिलें असतां, त्यांच्या मनावर, भाषेवर, विचारांवर निबंधमालेचा बराच पगडा बसला असावा असें दिसतें.

नारायणराव हे, त्यावेळीं मुंबईत निघणाऱ्या ‘ वार्ताहर ’ नामक पत्राचे सात वर्षें संपादक होते. मुंबईत, ‘ प्रिंटर्स—पब्लिशर्स—बुकसेलर्स असोसियेशन ’ ह्या नांवाची एक संस्था होती, तिचे ते सेक्रेटरी होते. ही सभा, नारायणरावांच्या मृत्यूनंतर नामशेष झाल्याचें समजतें. प्रहसनांपैकीं ‘ मोर एल्. एल्. बी. ’ प्रहसनावर

१८८६ साली फिर्यादही झाली होती, परंतु त्या पुस्तकांत आक्षेपजनक असें कांहींच न आढळल्यामुळें ती काढून टाकण्यांत आली! यानंतर, 'अभिनव तरुणीविद्या' प्रहसनावरही, त्याच वर्षी, फिर्याद करण्यांत आली व चौकशींत लेखक व प्रकाशक हे दोषी ठरून त्यांस दंड करण्यांत आला व पुस्तकें जप्त झालीं. ह्या प्रहसनाचे लेखक कोणी दुसरे गृहस्थ होते, पण त्यांत भागवतांचेंही थोडेंसें अंग होतेंच. ह्या फिर्यादी झाल्यावर रा. भागवत यांनीं, त्याच सालीं, 'सद्यःस्थितीचा रंग अथवा प्रहसन पुस्तकावरील वावटळ ' व ' सध्यांचे तट व आमच्यांतील ठळक ठळक भेद ' हे निबंध लिहून प्रसिद्ध केले; त्यांत ह्या फिर्यादी संबंधाची सविस्तर हकीकत आहे. भागवतांच्या कांहीं प्रहसनांचे रंगभूमिवर प्रयोगही झाले होते; परंतु ते निर्लोभी असल्यामुळें, प्रयोगाच्या हक्काबद्दल, कोणत्याही नाटकमंडळीकडून त्यांनीं कांहीं घेतलें नाहीं. सांगलीकर नाटक मंडळीचे मालक रा. बोंडोपंत सांगलीकर ह्यांनीं, मोर एल्. एल्. बी. प्रहसनाच्या प्रयोगच्या हक्काबद्दल, त्यांस एकदां ५०० रुपये देऊं केले होते, परंतु ते त्यांनीं घेतले नाहींत."

[ ज. र. आजगांवकर. ]

**शिवराम रामकृष्ण नित्सुरे** [ १८५०–१८७८ ] हे कवि मुंबईत कामाठी पुऱ्यांतील शाळेंत शिक्षक होते, आणि ह्यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यांत झाला होता, ह्याच्या पलीकडे ह्यांची कांहीं

एक माहिती मिळत नाहीं. ह्या कवीची कविता सरळ, सरस आणि गोड आहे. पित्याचें नांव अखंड चालविलें.

[ चं. शि. गोऱ्हे कृत अर्वाचीन कविता पू. ]

**विठ्ठल भगवंत लेंभे** [ १८९०–१९२० ] शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण. हे कवि पुणें जिल्ह्यांत ढमढेरे यांचे तळेगावीं जन्मले. ह्यांचा मराठी अभ्यास तळेगावीं झाला. नंतर पुणें येथें बाबा गोखले यांच्या इंग्रजी शाळेंत ह्यांस प्रवेशपरीक्षेपर्यंत प्राथमिक शिक्षण मिळालें. ह्यांचे मामा हरिशास्त्री, जे कै. वा. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे सहाध्यायी होते, यांनीं लेंभे यांस नवनीतांतील मोरोपंताच्या सर्व कविता शिकविल्या. त्यामुळें ह्यांस कविता करण्याची इच्छा झाली. पुढे वृत्तदर्पणाचा अभ्यास करून ह्यांनीं कित्येक किरकोळ कविता केल्या. घरगुती अडचणीमुळें यांना लवकरच रेल्वेची नोकरी पतकरावी लागली. पाकणी येथें असतां याचा रा. रा. शंकर गणेश देशपांडे यांच्याशी परिचय झाला. त्यांच्याजवळ ह्यांनीं कित्येक प्रसिद्ध संस्कृत काव्यांचें अध्ययन केलें. त्याच प्रमाणें रसमाधुर्य, अलंकार, वनश्रीवर्णन इत्यादि उदात्त कवितेला लागणाऱ्या साहित्याचेंही यांनीं परिशीलन केलें त्या योगें ह्यांची कविताशक्ति प्रगल्भ झाली. ह्यांनीं 'मित्रदर्शन,' 'विष्णुनिधन,' 'शोकावर्त्त' आणि इतर बऱ्याच स्फुट कविता लिहिल्या आहेत. पैकीं शोकावर्त्त हे काव्य अत्यंत हृदयंगम उतरलें आहे.

[ अर्वाचीन कविता पू. ]

" एकोणिसाव्या शतकांत अगदीं परवश झालेल्या मराठी कवितेला स्वतंत्र व शुद्ध वळण लावण्याचा व तिचें ऐश्वर्य वाढविण्याचा प्रयत्न ज्या थोर कवींनीं केला त्यांत वि. भ. लेंभे यांची गणना होते. " अशी यांची किर्ति आहे.

[ संपादक. ]

**शंकर मोरो रानडे** [ १८५०–१८९९ ] कोंकणस्थ ब्राह्मण. जन्म वाई येथें. मराठी शिक्षण वाईस व इंग्रजी शिक्षण पुण्यांस झालें. सन १८६८ हे मॅट्रिक व १८७२ त डेक्कन कॉलेजांतून बी. ए. झाले. कांहीं दिवस सरकारी नोकरी केली पण अधिकाऱ्यांशी जमेना म्हणून राजिनामा देऊन ' नाट्यकथार्णव ' मासिक पुस्तक काढण्यास सुरुबात केली. कांहीं दिवस हे ' इंदुप्रकाश ' व ' नेटीव्ह ओपिनियन ' या पत्राचे संपादक होते. सन १८८४ सालीं ह्यांनां श्री. सयाजीराव महाराजांनीं आपल्या पदरीं ठेविले. तेथेंच अखेरपर्यंत होते. बडोद्याची ' सहविचारणी सभा ' यांनीच स्थापन केली. हे उत्तम ग्रंथकार व लेखक होते. ह्यांनीं पुष्कळ पुस्तकें लिहिलीं आहेत. हे सुधारक होते. उत्तम कविही होते. "

[ मनोरंजन १९१०. ]

**महादेव बाळकृष्ण चितळे उर्फ बापूसाहेब भाजेकर**— हे पुण्यांत रावसाहेब भाजेकर म्हणून एक प्रसिद्ध गृहस्थ होते,

ह्यांचे कनिष्ठ बन्धु होते. ' मनोरमा ' ह्मणून सुमारें ४ वर्षांपूर्वी एक सामाजिक नाटक प्रसिद्ध झालें होतें, त्याचे कर्ते भाजेकर होत. डेक्कनकॉलेजांत विद्यार्थि असतांनां त्यांनीं हे नाटक स. १८७१ त लिहिलें. यांत सद्यःस्थितीचें चित्र फार चांगलें दाखविलें आहे. सुनांना सासवांचा जाच, लग्नकार्यांतले विहिणींचे रुसवाफुगवीचे प्रकार, वृद्धांशी तरुण मुलींचीं लग्नें, गतभर्तृकेचें वाईट मार्गांत पाऊल पडलें असतां घडलेले दुष्परिणाम, विद्यार्जनाकरितां परदेशीं गमन, इत्यादि सामाजिक चर्चेंतले विषय या नाटकांत कर्त्यानें गोंविले आहेत. पुनर्विवाहाच्या व बालविवाहाच्या वादाचा आरंभ याच सुमारास होता. तेच विषय नाटकरूपानें पुढें आणलेले आहेत कित्येक ठिकाणीं या नाटकांत अश्लीलपणा झाला आहे व ह्याबद्दल त्या वेळीं वर्तमानपत्रांतून व मासिक पुस्तकांतून टीकाही आल्या होत्या. ते दोष बाजूला ठेवले तर हे नाटक भाषेच्या दृष्टीनें व रचनेनें चांगले उतरलें आहे.

रा. भाजेकर हे बाबा गोखले यांच्या शाळेंत मधून शिक्षकांचेंही काम करीत असत. भाव्यांची शाळा जिला हल्ली ' नेटीव्ह इन्स्टिटयूशन ' म्हणतात, तिच्याही उत्पादकांत हे होते. कित्येक वर्षे हे ज्ञानचक्षूंतही लिहित असत. पुढें इंदूर संस्थानांत रामपुरा येथील डिस्ट्रिक्ट जज्ज होते. तेथेंच हे १८९२ सालीं वारले.

भाजेकर यांचे समकालीन नातू, कीर्तने यांनीं जरी एकेक किंवा दोन नाटकें लिहिलीं आहेत तरी तेवढ्यावरून पुढील पिढीच्या नाटककारांस नाटकें लिहिण्याची स्फूर्ति झाली, हें एक व दुसरें यांच्या नाटकांवरून त्या वेळची नाट्यकलेची स्थिति कळून येते ह्मणून सहरहु नाटककाराचें ऐतिहासिक दृष्टीनें महत्व आहे.

[ शं. बा मुजुमदारकृत महाराष्ट्रीय नाटककार ]

**वासुदेव नारायण डोंगरे** [ १८५०–१९०९ ] डोंगरे यांचा जन्म शके १७७२ च्या वर्षप्रतिपदेच्या दिवशीं रत्नागिरी जिल्ह्यांत वाडाजून येथें झाला. यांचा मॅट्रिकपर्यंतचा इंग्रजी अभ्यास मुंबईच्या विल्सन शाळेंत झाला. हे ' सुज्ञानबोधक ', ' स्वदेशमित्र ', ' सत्यमित्र ' वगैरे पत्रांतून लेख लिहीत असत. पुढें संस्कृतचे अध्ययन करून इ. स. १८८० मध्यें त्यांनीं नाटकें लिहिण्यास सुरुवात केली, व नाटक मंडळीं काढून सरासरी १८९५ पर्यंत त्यांनी तो धंदा चालविला. कै आण्णा किर्लोस्कर यांनीं संगीत शाकुंतल नाटकाचा प्रयोग केल्यावर लगेच पुढें चार पाच महिन्यांनीं म्हणजे इ. स. १८८२ च्या एप्रिल महिन्यांत यांनीं मुंबईस संगीत शाकुंतल नाटकाचा प्रयोग करून दाखविला. हा प्रयोग आण्णांच्या शाकुंतल नाटकावरून केला नसून रा. डोंगरे यांनीं मूळ संस्कृत नाटकाचें नवें भाषांतर व नवीं पद्यें घालून केला. रा. डोंगरे यांची कवित्वशक्ति चांगली असून, त्यांच्या नाटकांत ' भिन्नरागदर्शन

विशिष्ट आहे '. म्हणजे गवयी लोक चीजा गातात त्या पद्धतीवर रागबद्ध पद्यांची रचना केली आहे रा डोंगरे यांनी आपला शाकुंतल नाटकाचा प्रयोग लोकप्रिय झाला असें पाहिलें तेव्हां वेणीसंहार रत्नावली, मृच्छकटिक, विक्रमोर्वशीय, मालतीमाधव वगैरे नाटकांचीं संगीतांत भाषांतरें करून त्यांचेही प्रयोग रंगभूमिवर आणले.

रा. डोंगरे यांचें विशेष लोकप्रिय झालेलें नाटक म्हटलें म्हणजे ' संगीत इंद्रसभा ' हें होय या नाटकाचा प्रयोग नृत्यगायनयुक्त असा होत असे. यांच्या नाटकांकडे लोकांचा ओढा लागण्यास हें एक दुसरें कारण झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

डोंगरे यांची स्वतंत्र नाटक रचना काय ती ' रंगी नायकीण ' या प्रहसनाची आहे. वेश्यागमनाच्या दुर्व्यसनाचें चित्र दाखविण्याच्या उद्देशानें त्यांनीं हें लिहिलेलं आहे. तथापि, त्यांतील भाषा संविधानकाची ठेवण हीं हलक्या दर्जाची असल्यामुळें व त्याचा प्रयोग करतांना पात्रेंही आपआपल्या इच्छेप्रमाणें हवी तितकी स्वतंत्रता घेत असल्यामुळें नाटकांतील उद्दिष्ट हेतूचा परिणाम लोकांच्या मनांवर न होतां उलट ग्राम्य करमणुकीस एक प्रकारें उत्तेजन दिल्यासारखें झालें. या एका नाटका खेरीज डोंगरे यांची बहुतेक सर्व नाटकें चांगलीं असून त्यांचें प्रयोगही चांगले होत असत. [ आ. वि. कुळकर्णीकृत मराठीरंगभूमि. ]

**विष्णु कृष्ण चिपळूणकर** [ १८५०–१८८२ ] प्रतिभावान व कर्तृत्ववान निबंधकार * कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म पुणें येथें झाला. १८६९ सालीं मॅट्रिक होऊन डेक्कन कॉलेजांत गेले. तेथें अभ्यासापेक्षां ग्रंथवाचनाकडे फार लक्ष दिल्यामुळें बी. ए. व्हावयास यांनां पांच वर्षें लागलीं यांनीं शाळाखात्यांत नोकरी केली. परंतु १८७९ सालीं नोकरीचा राजीनामा देऊन स्वतंत्र उद्योगास आरंभ केला 'निबंधमाला' काढून तिच्यांतील लेखांनीं यांनी महाराष्ट्र हालवून सोडला. 'न्यू इंग्लिशस्कूल' 'चित्रशाळा.' 'किताबखाना ह्या संस्था काढल्या व 'केसरी' व 'मराठा' हीं वर्तमानपत्रें सुरू केलीं. हे असामान्य बुद्धिमान्, उद्योगी, करारी व बाणेदार पुरुष होते. तसेंच मोठें विद्वान् व खंदे लेखक होते. सर्वच बाबतींत पाश्चात्य अनुकरणाचें बंड विशेषतः सुशिक्षित लोकांत जास्त माजलें व लोकांस आपलेपणाचा विसर पडूं लागला, इतकेंच नव्हें तर पाश्चात दुर्गुण शिक्षित ह्मणविणाऱ्या लोकांत मान्यता पावूं लागले. अशा वेळीं आपलेपणाची स्मृति ह्यांच्यां लेखांनीं जागृत केली. व सर्व महाराष्ट्र खडबडून जागा झाला. सुशिक्षितांचें लक्ष लोकशिक्षण आणि लोकसेवा ह्या श्रेष्ठ कर्तव्याकडे ओढलें जाऊन, मराठी भाषेच्या सेवेंत व स्वदेशाच्या इतिहासांत त्यांचें मन अधिकाधिक रमूं लागलें. साधी राहणी, उदात्त विचार, स्वावलंबन व देशप्रीति

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण वर्ष १ ले.

इत्यादि महाराष्ट्रीय सद्गुणांची जाणीव ह्यांच्या लेखांनीं तरुण पिढींत प्रदीप्त केली. ह्यांचे लेख व आपल्या आयुष्याच्या अल्पावकाशांत ह्यांनीं केलेली देशसेवा महाराष्ट्र कधींहीं विसरणार नाहीं.

[ मनोरंजन १९१० ]

आमच्या या छोटेखानी पुस्तकांत अर्वाचीन मराठी वाङ्मयांत वाङ्मयदृष्ट्या शिवाजी राजाच्या यशाचा हक्क सांगणाऱ्या या महारथीच्या लेखनपद्धतीचा यथायोग्य परिचय करून देतां येणे शक्य नाहीं. परंतु ज्या निबंधमालेवरून त्यांचें नांव अ. म. वाङ्मयांत चिरस्मरणीय झालें आहे, त्या निबंधमालेचा त्यांचा समारोप उद्धृत केला असतां तेवढ्यावरून देखील त्यांचा ओजस्वी लेखणीची थोडी बहुत कल्पना सहज होऊं शकते. ते म्हणात,

" गेल्या आठ वर्षांत सदरील पुस्तकाचा ( निबंधमालेचा ) जो आम्हीं अव्याहत उद्योग केला त्याला आमच्याच देशांत काय, पण पाश्चात्य देशांतही तोड सांपडणार नाहीं असें ह्मटलें असतां गर्वोक्ति केल्याचा दोष माथी येईल असें आम्हांस वाटत नाहीं. मासिक किंवा त्रैमासिक पुस्तकांचा कोठेंही स्थिति पाहिली तर एवढा डोलारा कोणी एकट्यानेंच शिरीं बाळगिला आहे असें अह्मांस तर अद्याप कोठें आढळलें नाहीं. केवळ भाषांतररूप किंवा प्रकाशनरूप पुस्तक असलें तर वरील गोष्ट सुसंभाव्य आहे. पण

स्वतंत्र निबंधरचनेचा विचार केला असतां ती पद्धत वरच्याहून किती भिन्न आहे हें कोणाच्याही सहजरीत्या लक्षांत येणारें आहे. असलें काम म्हणजे चार चौघांचे जेव्हां हात लागतील तेव्हा तें उठायाचें ! आज अमक्यानें लिहिलें; उद्यां तमक्यानें लिहिलें, हा विषय एकानें घेतला, दुसरा विषय दुसऱ्यानें घेतला, या प्रमाणें ‘ दसकी लकडी एकका बोजा ’ या न्यायानें प्रस्तुतसारखा उद्योग उभारला जाऊन चालत असतो. तर हें बहुजनसाध्य कार्य आह्मीं स्वतःच अंगिकारलें असता त्यांत इतक्या अडचणी आल्या व तें वरचेवर मागें पडत असे या गोष्टीचें वस्तुतः—पाहतां कोणास आश्चर्य करण्यास कारण नसून इतक्या विषयावर इतका काळपावेतों आह्मी लेखणी चालविली, आणि कोणापाशीं एक छदाम किंवा एक ओळही न मागतां, अगर मेहेरबान डायरेक्टरसाहेब किंवा ट्रान्सलेटरसाहेब यांच्या मेहेरबानीची बिलकूल फिकीर न करितां हे महासत्र संपवून आज अवभृथस्नानाला मोकळे होणार हीच विशेष गोष्ट असें ह्मणण्यास फारशी हरकत दिसत नाहीं. त्यांतून आजपर्यंत बडबड्या मंडळीनें कितीका प्रकारचे मानसिक संकल्प केलेले आहेत व कितीकाप्रकारचे प्रचंड उद्योग हातीं धरून ‘ आरंभशूर ’ त्वाच्या प्रसिद्ध सुत्रांस मात्र दृढतरत्व आणलें आहे, ही गोष्ट मनांत आणली असतांही आमच्या चतुरशीतिपुष्पमालेकडे पाहून आम्हांसच काय, पण प्रत्येक भाषाहितेच्छूला आनंद झाल्याविना राहणार नाहीं, असें आम्हांस वाटतें. आम्हीं विद्यार्थीदशेंत असून आम्लभौमानिर्मित

विद्यापर्वतमार्ग क्रमीत असतांही बाजूंच्या वृक्षलतांच्या पुष्पपल्लवांनीं कित्येक वेळां आकर्षितांतः कारण होऊन मधें मधें गमत होतो, व विद्यालयांतील सोळा संस्कार लागून स्वतःसिद्ध होत्साते बाहेर पडतांच वरील वृक्षवाटिकांतच आराम पावून धन्यता जोडावयाची हा आमचा कृतसंकल्प होता. पुढें जगदीशकृपेनें तसाच योग घडून येऊन आम्हीं 'टेम्पेस्ट मधील एरियलाप्रमाणें बंधमुक्त होतांच त्याचाच क्रम स्वीकारला, आणि त्याचें फळ प्रस्तुत पुस्तक हें होय. आमच्या पूर्वीचे विद्वानमंडळ हें फार झालें तर आपल्या ठिकाणींच आपण रममाण होऊन वरील पुष्पांचा मकरंद सेवीत असें. पण आम्हीं आपल्या देशबंधूंची आठवण करून त्यांस गीर्वाण व आंग्लभौम पुष्पाकरांतील मधुबिंदूचा व सौरभाचा यथावकाश व यथाशक्ति लाभ करून द्यावा हें मनांत आणलें. विद्यापिठरूप महानीडांतून पांख फुटून भरारी मारल्यास आज आम्हांस दहा वर्षच काय तीं झालीं; पण या एका दशकांतच आमचा पूर्वोक्त संकल्प किती सिद्धिस गेला हें पाहून आम्हांस बरेंच समाधान वाटतें. व पुढील काळाकडे नजर दिली असतां खूप उमेद येते. आमच्या वडिलांनीं आह्मांस विद्योपासनसमयींच लेखनप्रविष्ट करून ठेवलेच होतें; व वरील नीडत्यागाच्या वेळेस तर माजी 'शालापत्रका'चे धुराकर्म त्यांनीं सर्वस्वीच आम्हांवर लोटून दिले. हें धुरीणत्व चार वर्षेपावेतों आमच्याकडे होते. पण १८७४ सालापासून तें एका जबरदस्त दुष्ट ग्रहाच्या फेऱ्यांत पडलें व

मनुष्य किंवा होडी भोंवऱ्यांत सांपडली असतां कालेंकरून जशी त्यांची गति केंद्रप्रवण होत होत त्यांचा शेवटीं लय होतो, त्या प्रमाणेंच पुढील सालापर्यंत वरील ग्रहग्रस्त पुस्तकाची मजल जेमतेम आटपून शेवटीं बुडाले ! हा महान् अनर्थ होण्यास कारण काय झालें म्हणाल, तर मराठी कविता. सदरील विषयाचे पूर्व भाग आटपून महाराष्ट्र कवितेवर आम्ही येऊन ठेपलों होतो, व आरंभीं थोडासा उपोद्घात केला होता. या उपोद्घातांत सदरील कवितेचे शत्रु जे मिशनरी त्यांच्या संबंधानें कांहीं मजकूर आला होता. पण एवढेंच कारण ट्रान्स्लेटर साहेबांसारख्या सुज्ञ व सद्धर्मी मनुष्याचा पित्तक्षोभ होण्यास बस होऊन तावडतोब डायरेक्टर साहेबांचा खलिता सुटला कीं, असला निबंध या मासिक पुस्तकांत पुनः आला तर खबरदार ! असो; तर या प्रकारें करून ‘ शालापत्रका ’ च्या द्वारें आमचा प्रथमतः लेखनसरस्वतीच्या मुलुखांत प्रवेश झाला. हा होऊन दोन वर्षें झालीं तो आम्हांस स्वतंत्र पुस्तककर्तृत्वाची हौस वाटून प्रस्तुत मालेचा प्रादुर्भाव झाला. याही गोष्टीस आज आठ वर्षे लोटून गेलीं. इतक्या काळांत प्रस्तुत पुस्तकाच्या संबंधानें किती उलाढाली झाल्या, व तितक्यांतून पार पडून आज स्वतंत्र शाळा, स्वतंत्र छापखाना, स्वतंत्र वर्तमानपत्रें, इत्यादि नवीन सृष्टींत आम्हीं कसें येऊन पडलों, हें यापूर्वी आमच्या प्रिय वाचकांस निवेदन केलेलेंच आहे ! ”

[ निबंधमालेचा उपसंहार ] मांडे आवृत्ति.

"इंग्रजी विद्यावृक्षाला महाराष्ट्रांत पहिलें सरस फळ आलें तें निबंधमाला' होय."

[ पांगारकरकृत निबंधमालेचें स्वरूप व कार्य. ]

शृंगार-वीर-नय-लेख आतां कशाचे !
येईल मात्र भरतें करुणारसाचें
गंभीर धीर रस पुरित वाग्विलास,
गेला लया तव पित्यासह आजि खास !
ज्यांच्या गुणीं मुदित पंडित सर्व झाले,
गर्वोद्धतासहि जिहीं मदहीन केले,
सर्वत्र ज्यास जयपत्र मिळेच जाण,
ऐसे आतां लिहिल निस्पृह लेख कोण ?

वि. म. लेभें.

**काशीनाथ नारायण साने** [ १८५१–१९२७ ] काव्येतिहाससंशोधक * कऱ्हाडे ब्राह्मण. बाबासाहेबांचा जन्म ठाणें जिल्ह्यांत वसई नजीक झाला व त्यांचें बालपणाचें शिक्षणही तेथेंच झालें. प्रवेशपरीक्षेनंतर डेक्कन कॉलेजांत त्यांनी प्रवेश केला आणि स. १८७१ सालीं बी. ए. होऊन बाहेर पडले. डेक्कन कॉलेजांत असतानांच कै. रा. ब. कीर्तने, जिनसीवाले, विष्णुशास्त्री चिपळूण-

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ लें.

कर इत्यादिकांच्या सहवासानें त्यांच्या मनांत इतिहासाच्या वाचनाची व संशोधनाची आवड उत्पन्न झाली होती व ती आमरण कायम राहिली. पदवीधर झाल्यानंतर लवकरच ते सरकारी शाळाखात्यांत शिरले, तथापि सरकारी नोकरींत असतांना देखील त्यांनी कै. वासुदेव शास्त्री खरे व विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या सहकारितेनें काव्येतिहास संग्रहाच्या प्रकाशनाचें काम चालविलें, आणि मराठ्यांच्या इतिहासावर प्रकाश पाडणाऱ्या बखरी प्रथमच छापून काढण्याचें श्रेय त्यांनीं मिळविलें.

**राजाराम रामकृष्ण भागवत** [१८५१–१९०८] वेदविद्यासंशोधक * कऱ्हाडे ब्राह्मण. यांचा जन्म राजापूर तालुक्यांतील कशेळी गांवी झाला व शिक्षण मुंबईत झालें. हे सन १८६७ सालीं प्रवेशपरिक्षा पास झाले. पुढें तीन वर्षे मेडिकल कॉलेजांत घालविली पण नंतर तो क्रम सोडून संस्कृताचा अभ्यास केला. सन १८७७ त यांनी मनीस्कूलांत शिक्षकाची नोकरी पतकरली व पुढें सेंट झेविअरमध्यें शास्त्र्याच्या जागी यांची नेमणूक झाली. सन १८८६ सालीं यांनीं ‘मराठा हायस्कूल’ नांवाची शाळा काढली व ती थोड्याच वर्षांत लौकिकास आणिली. मराठी भाषेंत यांनी ‘मराठ्यासंबंधानें चार उद्गार’ ‘श्वेताश्वतर उपनिषद’ व ऐतरेय उप-

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण. वर्ष १ लें.

निषद्' व 'कैसरकडून सुलतानाकडे' इत्यादि ग्रंथ लिहिले आहेत. यांचा व्यासंग दांडगा व ज्ञानलालसा आणि शोधक बुद्धि विलक्षण होती. हे कट्टे सुधारक व स्पष्टवक्ते होते, मागसलेल्या जातींच्या उन्नतीविषयीं यांनां मोठी कळकळ वाटे व त्या कामीं यांनी पुष्कळ लिहिलें व अतोनात प्रयत्न केला. अस्पृश्य जातीचा प्रश्नही याच्याच प्रयत्नांनी विशेष पुढें आला असें ह्मटलें तरी चालेल.

[मनोरंजन १९१०]

"'वाङ्मयविषयक चर्चा आणि त्याबरोबर प्राचीन इतिहासासंबंधीं विचार या संबंधानें प्रो. भागवत यांचीं 'संस्कृत भाषेची विचिकित्सा' आणि 'प्राकृतभाषेची विचिकित्सा' हीं पुस्तकें आणि विविधज्ञानविस्तारांतील त्यांचे 'पंचजनविचार' वगैरे निबंध फार शोधकबुद्धीनें लिहिलेले आहेत.

[रा. भि. जोशीकृत मराठी भाषेची घटना.]

**विष्णु मोरेश्वर महाजनी** [१८५१–१९२३] सुलभनिबंधकार.* कऱ्हाडे ब्राम्हण. यांचा जन्म पुण्यास आपल्या मातुलगृहीं झाला. व शिक्षण धुळ्यास प्रथम गांवठी शाळेंत व नंतर धुळे हायस्कुलांत झालें, पुढें पांच वर्षांनीं हे पुन्हां मातुलगृहीं गेले व सन १८६४ त मॅट्रिक व सन १८६९ त डेक्कन कॉले-

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण वर्ष १ लें

जांतून बी. ए. झाले. आणि सन १८७४ त एम. ए. झाले. यानंतर ते सरकारी नोकरींत शिरले. पहिल्यानें आकोल्यास आसि. मास्तर व नंतर हे उमरावती हायस्कूलचे हेडमास्तर झाले.

उमरावतीस असतांना विष्णुपंत मधून मधून तेथील प्रमोद-सिंधूंत व मुंबईच्या नेटीव्ह ओपिनियन पत्रांत आणि विविधज्ञान-विस्तारांत लेख लिहित. याच वेळीं त्यांनी आपली काव्य 'कुसुमांजळि' प्रसिद्ध केली. आकोल्यास असतांना तेथील त्या वेळचे डे. इन्स्पेक्टर रा. ब. श्रीराम भिकाजी जठार यांच्याशी विष्णुपंतांचा स्नेह जडला, व उभयतांच्या विचारानें 'ज्ञानसंग्रह' मासिक काढण्याचें ठरलें. पहिला अंक सन १८६२ च्या जानेवारींत छापिला. परंतु हें मासिक सन १८७४ त बंद पडले. सन १८७७ त उमरावतीस इचलकरंजीकर नाटक मंडळी आली होती. तिचे म्यानेजर राघोपंत हे सभ्य असून शिष्ट मंडळींत वागत असत. त्यांच्या आग्रहावरून शेक्सपियर कवीचीं कांहीं नाटकें मराठींत उतरून तीं रंगभूमीवर आणावी असें ठरलें. पहिलें श्री. भि. जठार व ब. रा. प्रधानकृत 'भ्रांतिकृत चमत्कार' हें 'कामेडी ऑफ एरर्स' चें रूपांतर पुढें आलें व दुसरें नाटक विष्णुपंतांनीं सिंबेलाईनच्या आधारें केलें तें 'तारानाटक'. हे दोन्ही प्रयोग लोकांनां फार आवडले व इचलकरंजीकरांस त्यावर चांगला पैसा व लौकिक मिळाला. येथेंच पुढें विष्णुपंतांनीं 'मोहविलसित' व 'वल्लभानुनय'

हीं नाटकें शेक्सपियरच्या 'विंटर्स टेल' व 'आलज वेल दॅट एण्डस् वेल' यांच्या आधारें रचिलीं.

महाजनी यांनी शेक्सपियकरची एकंदर तीन नाटकें मराठी भाषेंत उतरलीं. पैकीं तारा नाटक चाळीस वर्षांपूर्वी रंगभूमीवर पुष्कळदां येत असे. इंग्रजी भाषेंतलें नाटक मराठी भाषेंत इकडच्या रीतरिवाजा बरहुकूम करण्याच्या हेतूनें झालें असें हें पहिलेंच नाटक म्हटलें तरी चालेल. या पूर्वी शेक्सपियरच्या चार पांच नाटकांचीं निवळ भाषांतरें झालीं होतीं. परंतु प्रयोगाच्या दृष्टीनें त्यांचा तादृश उपयोग झाला नाहीं. तो तारा नाटकानें चांगला केला. एखाद्या गोष्टीचा चोंहोकडून बोलबाला होत असला म्हणजे तिला हातभार लावणारे ( उचले ) पुष्कळ मिळतात. परंतु तिचाच पडत्या काळांत उद्धार करणारे थोडे. नाट्यकलेची म्हणण्यासारखी प्रसंशनीय स्थिति ज्या वेळीं नव्हती अशा वेळीं महाजनी यांनीं तिची सेवा करण्याचें मनांत आणिलें व या कामांत त्यांस यशाही आलें.

मराठी भाषेसंबंधानें वऱ्हाड प्रांत तीस चाळीस वर्षांपूर्वी आतां इतका सुधारलेला नव्हता. यामुळें खुद्द तिकडचे असे मराठी भाषेचे लेखक तिकडे कोणी झाल्याचे दिसत नाहीं. परंतु बजाबाप्रधान, जठार व महाजनी यांनीं विद्याविषयक चळवळी सुरू करून वऱ्हाडची एक प्रकारची बाजू राखली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

[ श्री. बा. मुजुमदारकृत 'महाराष्ट्रीय नाटककार' ]

**बळवंत खंडूजी पारख** [ १८५१–१९०४ ] मराठे. यांचा जन्म यांच्या आजोळीं ओझर गांवीं झाला. व शिक्षण तेथील सरकारी मराठी शाळेंत झाले. हे अगदीं लहान असतांनाच, ह्यांची पाठशक्ति जबर असे. उजळणी होण्याचे आधींच ते, इतर मुलांच्या तोंडची ऐकून, हिंन्दुस्थानांतील शहरें भराभर म्हणून दाखवीत. शिवाय हे बोलके चांगले असत. अल्पवयांत देखील त्यांना चांगलें बोलावयास सुचे आणि तालमीचा नाद ह्यांना पहिल्यापासून असल्या-कारणानें ह्यांचें शरीरही फार मजबूत असे. ह्या सगळ्या गुणांवरून सर्व माणसे त्यांनां फार चाहात असत.

आरंभीं कांहीं दिवस यांनी शिक्षणखात्यांत व नंतर पोलिस-खात्यांत नोकरी केली. परंतु पुढें कांहीं कामावरून ह्यांच्या अधि-काऱ्याशी ह्याचें बनेनासें होऊन सन १८८९ त्याही चाकरीचा ह्यांनीं राजिनामा दिला. बळवंतरावास लहानपणापासून ज्ञानसंपा-दनाची मोठी आवड होती. कोठें कांहीं सुभाषित कानीं पडलें कीं तें टिपून ठेवावयाचें, असा त्याचा पाठ होता. अशा सुभाषितांनीं भरलेल्या त्यांच्या कितीएक वह्या आहेत. त्याचप्रमाणें ग्रंथाचा यांनां मोठा शौक होता. चांगलें पुस्तक पाहिलें कीं, तें विकत घ्याव याचें; मग त्यास कितीही किंमत पडो, अशी त्याची रीत असे. शिवाय ही त्यांची ग्रंथभक्ति जाणून त्यांनां चाहणारे गो. ह. देश-मुख, म. गो. रानडे, गं. न. केतकर इ. मोठे गृहस्थ त्यांनां ग्रंथ

[ब]क्षिस देत. बळवंतरावांची अर्धी प्राप्ति ग्रंथसंग्रह करण्याकडे खर्च [ह]ोत असे, इतके सांगितलें ह्मणजे त्यांच्या ग्रंथभक्ति विषयीं कांहीं [अ]धिक सांगण्याचें कारण रहात नाहीं. त्यांत विशेष संतोषाची [ग]ोष्ट ही होती कीं, ते ग्रंथ विकत घेऊन नुसते ते पुजून ठेवीत नसत [त]र ते लक्षपूर्वक वाचीत असत. आणि त्यांतल्या गोष्टी त्यांस पाहिजे [त]ेव्हां आठवत असत. ते आपले ग्रंथ फार जपून ठेवीत. त्यांचे [वे]गळे वेगळे रुमाल बांधलेले व व्यवस्थित रीतीनें ठेवलेले आहेत. [म]राठी ग्रंथाचा एवढा मोठा संग्रह सगळ्या महाराष्ट्रांत दुसऱ्या कोणापाशीं नाहीं. पुस्तकांची नक्की संख्या कळली नाहीं, तरी गेल्या पन्नास पाऊणशें वर्षांत शिळेवर अथवा टाइपावर छापलेल्या प्रत्येक पुस्तकाची एक प्रत त्यांच्या संग्रहीं आहे आणि त्यांची एकंदर संख्या पांच हजारा पेक्षां अधिक असावी असें वाटते. त्यांच्या एकंदर किंमतीचा आंकडा रु. ३,६३४-१०-० इतका त्यांच्या हातचा टिपलेला आहे !

बळवंतरावांचा भर गद्यापेक्षां पद्यावर फार असे. त्यांनां [क]िदान पांच हजार तरी पद्यें मुखोद्गत असावी. तुकाराम, मोरोपंत आणि वामन हे त्यांचे मोठे आवडते कवि होते त्यांचीं प्रकरणांचीं प्रकरणें त तोंडपाठ ह्मणत. शिवाय संस्कृत आणि हिन्दी सुभाषितांचा त्यांचा भरणा मोठा होता. कोणताहि विषय निघो, त्यांवर त्यांची सुभाषितें तयार असत, आणि त्यांच्या योगानें ह्यांच्यां भाषणास फार रंग चढत असे.

बळवंतरावांनीं गद्यापेक्षां पद्यच पुष्कळ लिहिलें आहे. त्यांतले थोडे छापलें आहे, आणि पुष्कळ तसेंच पडून राहिलें आहे. ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र, दुर्व्यसननिषेधाष्टक, आणि विष्णुसहस्त्रनाम मंजरी. हीं पुस्तकें निर्णयसागरच्या मालकांनी छापिलीं आहेत बळवंतरावांस इतर वृत्तापेक्षां कटाव आणि फटके फार चांगले साधत व ते त्यांनीं शेंकडो विषयावर लिहिले आहेत. किंबहुना त्यांच्या वेळचा महाराष्ट्रांतला एकही प्रचलित विषय त्यांतून सुटला नाहीं, असें ह्मटले तरी चालेल. त्यांतले कांहीं वर्तमानपत्रांतून छापले आहेत. असे कटाव अथवा फटके ते बोलतां बोलतां रचीत असत. ते त्यांच्या तोंडून ऐकावयास फारच गोड लागत. ते कानीं पडले ह्मणजे बळवंतराव हे सध्याच्या काळचे 'फंदी' आहेत, असें श्रोत्यांस वाटत असे. मद्यपाननिषेधाच्या पद्यांत त्यांनीं वर्णन केलें आहेः—

**' मी कोण, करितो काय, भेद हा जाय, बाप ना माय**
**आठवे त्यासी । हटकून अग्निच्या तोंड लावी भात्यासी ॥**
**वाढवी शरीरीं पित्त, शोषिते रक्त, नरा करी मत्त, धातुला**
**नाशी । मस्तकी शूळ ऊरांत करी वातासी ' ॥**

ज्ञानेश्वर महाराजांच्या चरित्राबद्दल त्यांस दाक्षिणा प्राइझ कमेटीनें बक्षीस दिलें होतें. व श्री. तुकोजीराव होळकर, श्री. सया-

जीराव गायकवाड, जव्हारचे राजे इत्यादि राजे रजवाड्यांनींही ह्यांचीं काव्यें ऐकून कित्येक वेळीं ह्यांची चांगली संभावना केली होती. [ बालबोध पु. २४ ]

**पांडुरंग व्यंकटेश चिंतामणिपेठकर.** [१८५१–१८७९] देशस्थ ब्राह्मण. यांचे वडील चिंतामणिपेठ येथील वतनदार जोशी होत. हे पुण्यास नोकरी मिळविण्याच्या हेतूने आले व पुढे भोर संस्थानांत कारभारी झाले. पण लवकरच ते पुणें येथें परलोकवासी झाले. त्या वेळीं पांडुरंगपंत तेरा वर्षांच होते. नंतर यांच्या मातोश्रीनें यांचें संगोपन करून चांगले शिक्षण दिलें. हे सन १८६८ सालीं प्रवेश परीक्षा व सन १८७४ सालीं बी. ए. ची परीक्षा पास झाले. सन १८७६ त हे कानडी भाषेचे भाषांतरकार व सन १८७७ व सन १८७८ ह्या वर्षी अनुक्रमें धारवाड व बेळगांव येथें डे. ए. इन्स्पेक्टर या हुद्यावर नेमले गेले. परंतु दुर्दैवानें हे फार अल्पायु निपजले. मरण समयीं ह्याचें वय सारे अठ्ठावीस वर्षांचें होतें. तथापि एवढ्या अल्पवयांत ह्यांनी मराठी, कानडी संस्कृत, गुजराथी, उर्दू व मराठी व संस्कृत या भाषांत ह्यांचा अधिकार फार मोठा असे. ह्यांनीं ‘ गंगावर्णना ’ ह्मणून एक सरस आणि सोज्वळ काव्य केलें आहे. त्यातील वाक्यप्रवाहांत उदात्त रसांच्या लहरीवर लहरी उसळत असून, त्या स्वदेशाभिमानाच्या सूर्यप्रकाशानें सारख्या चमकतात. ह्या काव्यास दक्षिणा प्राइझकमे-

टीनें चारशे रुपयांचे बक्षीस दिलें होतें, ह्यावरून त्याची योग्यता किती आहे हें सहज दिसून येईल.

[ चं. शि. गोऱ्हेकृत ' अर्वाचीन कविता. ]

**विष्णु गोपाळ आपटे** [ १८५१ १८९९ ] कोंकणस्थ ब्राह्मण. मराठी व इंग्रजी शिक्षण धारवाड व कोल्हापूर येथें झाले. राजाराम हायस्कूलांतून मॅट्रिक झाल्यावर आलफ्रेड स्कॉलरशिप मिळून मेडिकल कॉलेजांत गेले, व सन १८७८ सालीं पहिल्या वर्गांत एल, एम. एस. झाले. याच सुमारास धारवाडास कॉलऱ्याचा उपद्रव सुरू झाला होता, त्या वेळीं यांनीं आपण होऊन तेथील डाक्टरांस चांगली मदत केली; त्यामुळें सरकारानें यांना हावेरी येथें दोनशे रुपयांवर आसि. सर्जन नेमले. तेथे चार वर्षें नोकरी केल्या नंतर सन १८८३ सालीं हे कोल्हापुरास आसि. दरबार सर्जन झाले. अखेरपर्यंत हे याच हुद्यावर होते. यांनीं 'ग्रामवैद्य' ' प्रसूतिचिकित्सा ' व ' न्यायवैद्यक ' हीं पुस्तकें लिहिलीं आहेत. हे धंद्यांत निष्णात असल्यामुळें व शांत, निराभिमानी आणि परोपकारी स्वभावामुळें सर्वत्र अत्यंत प्रिय झाले होते.

[ मनोरंजन सन १९१० ]

**लक्ष्मण कृष्ण चिपळूणकर** [ १८५२-१९०० ] कोंकणस्थ ब्राम्हण. सन १८७५ सालीं बी. ए. झाले व वऱ्हाडांतील शाळा-

खात्यांत नोकर झाले. हे चांगले लेखक होते. आपले ज्येष्ठबन्धु विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें ह्यांनीं विस्तृत चरित्र लिहिलें असून त्या ग्रंथाची फार वाखाणणी झाली आहे. ह्यांनीं महाराष्ट्राचा इतिहासही लिहिला आहे. महाराष्ट्राचा हा पहिलाच इतिहास होय.

[ मनोरंजन, सन १९१० ]

**नारायण बापूजी कानिटकर** [ १८५२–१८९७ ] कोंकणस्थ ब्राम्हण. ह्यांचा जन्म पुणें येथें झाला. मराठी शिक्षण पुण्यास व इंग्रजी शिक्षण मुंबई येथें एलफिन्स्टन हायस्कुलांत झालें. सन १८६९ सालीं मॅट्रिकची व सन १८७६ सालीं वकीलीचीं परीक्षा पास झाले, व नंतर पुण्यास वकीली करूं लागले. शेवटचीं सात आठ वर्षे हे चिंचवड संस्थानचे ट्रस्टी होते. हे नामांकित लेखक व नाटककार होते. यांनीं सामाजिक व ऐतिहासिक मिळून बारा नाटकें लिहिलीं; त्यापैकीं ‘ शिवाजी, ’ ‘ सरदार बाजी देशपांडे, ’ ‘ बाजीराव–मस्तानी ’ व ‘राजाराम’ हीं नाटकें विशष प्रसिद्ध आहेत. सामाजिक सुधारणेवर यांनीं शस्त्र तीव्र उचललें होते. ‘ तरुणिशिक्षण नाटिका ’ ‘ शीघ्रसुधारणा दुष्परिणाम ’ व ‘ सम्मतिवयाच्या कायद्याचें नाटक ’ वगैरे नाटकें लिहून यांनीं सुधारकांची टर उडविण्याचा प्रयत्न केला.

[ मनोरंजन सन १९१० ]

" मराठी भाषेंत जे आधुनिक नाटककार होऊन गेले आहेत त्यांपैकीं रा. कानिटकर हे एक प्रमुख होत. सामाजिक आणि ऐतिहासिक विषयांवर नाटकें लिहून, बरेच दिवस यांनीं लोकांचें रंजन केलें. यांचीं नाटकें रंगभूमीवर लोकप्रिय असत. यांच्या सामाजिक नाटकांमुळें सुशिक्षित मंडळींत यांनां कित्येक शत्रु उत्पन्न झाले होते, हीच साक्ष यांच्या नाटकांच्या लोकप्रियतेला पुरे आहे. हे जसे विनोदी लेखक असत, तसेंच यांच्या लेखणींतून विचारी, आवेश व उत्साह उत्पन्न करणारी गंभीर भाषाही सहज निघत असे. अलीकडे जसे राजकीय विचारांत दोन पक्ष झाले आहेत तसे वीस बावीस वर्षांपूर्वीं सामाजिक विचारांत दोन पक्ष माजलेले होते. प्रत्येक पक्षाच्या पुढाऱ्याच्या लेखांतून व भाषणांतून जे विचार त्या वेळीं प्रसिद्ध होत ते नाटकरूपानें रा. कानिटकरांनी प्रसिद्धीस आणिले. परंतु त्या करितां आरंभीं सांगितल्याप्रमाणें त्यांनां त्यांच्या स्नेहीवर्गांत सुद्धां कांहीं शत्रु उत्पन्न झाले होते व ते कानिटकरांनां ' पुष्करणी शेक्सपियर ' ( कानिटकरांचें घर पुण्यांत पुष्करणी हौदाशेजारी आहे ) म्हणत असत "

[ शं. बा. मुजुमदारकृत ' महाराष्ट्रीय नाटककार ' ]

**कृष्णाजी नारायण आठल्ये** [ १८५२–१९२६ कऱ्हाडे ब्राम्हण. हे सुप्रसिद्ध ग्रंथकार आणि कवि सातारा जिल्ह्यांतील मौजे टेंभू येथें जन्मले. ह्यांचे तीर्थरूप नारायणभट्ट हे चांगले

दशग्रंथी विद्वान होते. त्यांनीं ह्यांजकडून ल्हानपणीं वेदाभ्यास करविला. पुढें बरेंच प्रौढवय झाल्यावर ह्यांनी स्वावलंबनानें प्रवेशपरीक्षा दिली व पुणें येथील ट्रेनिंग कॉलेजांत अभ्यास करून हे ट्रेनिंगची परीक्षा पास झाले व नंतर हिंगणगांव, कऱ्हाड वगैरे ठिकाणीं शिक्षकाचें काम केलें. परंतु पुढें यांचे मुख्य शिक्षकाशी जमेनासे होऊन ह्यांनीं आपल्या जागेचा राजीनामा दिला. नंतर हे मुंबई, सातारा, बडोदें वगैरे बऱ्याच ठिकाणीं फिरले आणि आपली चित्रकला दाखवून ह्यांनीं अनेक श्रीमान लोकांकडून बक्षिसें व आश्रय मिळविला. पण हे कोठेंही स्थायिक झाले नाहींत. शेवटीं हे मलबारांत कोची येथें गेले, आणि तेथील कित्येक गृहस्थांच्या सहानुभूतीनें व उत्तेजनानें ह्यांनीं 'केरळकोकिळ' नांवाचें एक मासिक काढलें. तें सुप्रसिद्ध असून ह्या मासिकाच्या द्वारें ह्यांचें कवित्व आणि इतर लेखनचातुर्य लोकविश्रुत आहे.

[ चं. शि. गोऱ्हेकृत ' अर्वाचीन कविता '

**पुरुषोत्तम भास्कर डोंगरे.** कोकणस्थ ब्राह्मण. हे मूळचे अलीबागकडचे राहणारे यांचा विद्याभ्यास पुण्यास पूर्वी 'सीटीस्कूल असे त्यांत व हायस्कुलांत झाला. प्रवेश परीक्षा उतरल्यावर यांनीं सरकारी नोकरी धरली. अलीबाग येथें मामलेदार कचेरींत ते अव्वलकारकुनाच्या हुद्यापर्यंत चढले होते. परंतु त्यांच्या सात्विक स्वभावाला सरकारी नोकरीच्या अंगभूत असणारे गुण खपत नस-

त्याकारणानें वरिष्ट अधिकारी नको नको ह्मणत असतां त्यांनीं नोकरी सोडली व लहानशा भांडलावर एक दुकान घातले परंतु, त्यांत ह्यांनां यश न येऊन तें यांना मोडावें लागलें. हे सरकारी नोकरींत असल्यापासूनच यांनां नाटकरचनेचा नाद असे. ह्यांचीं 'जरठोद्वाह' 'भीमसिंह आणि पद्मिनी' 'चंद्रसेना' व 'चंद्रहास हीं नाटकें प्रसिद्ध आहेत. कोल्हापुरास पूर्वीं गद्यनाटकांनां उत्तेजन देणारी मंडळी निघाली होती. तिच्या विद्यमानें दुर्गा, गुणोत्कर्ष इत्यादि जीं नाटकें प्रसिद्धीस आलीं त्याप्रमाणें डोंगरे यांचीं पहिली दोन नाटकेहीं त्याच मंडळीकडून उदयास आलीं. 'चंद्रसेना' हें नाटक स्वदेशहितचिंतक नाटकमंडळी करीत असे व 'चंद्रहास' किर्लोस्कर मंडळीनें पुढें आणिलें. हीं सर्व नाटकें लोकप्रिय आहेत. डोंगरे ह्यांचीं हीं नाटके अगदीं मार्मिकाच्या कसोटीला उतरण्या-सारखीं नसलीं तरी सामान्य जनसमूहाचें मनरंजन करण्याजोगीं तीं खास आहेत. डोंगऱ्यांना कुटुंब स्वास्थ्याचें सौख्य अनुभवण्यास मिळतें तर त्यांच्या हातून नाटकरचना याहीपेक्षां सरस वठली असती. परंतु संसाराच्या यातायातींनें नाट्यरचनेच्या पूर्णत्वाकडे लक्ष घालण्यास त्यांना वेळ मिळत नसे. तरीही त्यांची कविता रसाळ व प्रासादिक आहे. भक्तिरसपर कविता इतर कवितेकडून त्यांना चांगली साधत असे. पूर्वींचे भक्ति मार्गांतले संतकवि बहुतेक दरिद्रीच असलेले आढळतात, त्या प्रमाणें डोंगरे यांचीही स्थिति

होती ते उत्तम कवि होते. नाटककार होते व खरे देवभक्त आणि देशभक्त होते. ते पंचवीस वर्षे स्वदेशीचे व्रत चालवीत होते. साखरेला ते स्पर्शही करीत नसत. स्वदेशीची चळवळ निघाल्याबरोबर हातमागावर काम करण्याचें शिकून स्वतः काढलेलीं धोतरें ते वापरीत असत. सारांश, संसारांत राहून ते एक प्रकारचे साधु होते, म्हटलें तरी चालेल. परंतु व्यवहारिक दृष्टया त्यांचें चीज इहलोकीं व्हावयाचें नव्हतें व शेवटीं विपत्तीतच हे इहलोक सोडून गेले.

विविधज्ञानविस्तार व काव्यरत्नावली या मासिकांत त्यांच्या कांहीं कविता प्रसिद्ध झाल्या आहेत 'अंबुकण' आणि 'तान्हाजी-मालुसरे अथवा सिंहगडची मोहिम' यावर निरनिराळ्या वृत्तांत अनुक्रमें एकोणीस व सुमारे शंभर कविता त्यांनी केल्या आहेत. अंबुकणांत आकाशांतून पावसाचा एक बिन्दु प्रथम समुद्रांत पडत असतां त्याच्या मनाची स्थिति काय झाली व शेवटीं तो मोत्याच्या शिंपलींत जन्म पावून राजाच्या मस्तकावर तो कसा बसला हा विषय आहे. सिंहगड मोहिमेचा विषय सुप्रसिद्ध आहे.

[ शं. बा. मुजुमदारकृत 'महाराष्ट्रीय नाटककार ]

**शंकर बाळकृष्ण दीक्षित** [ १८५३ १८९८ ] ज्योतिष इतिहासकार. + कोंकणस्थ ब्राम्हण. ह्यांचा जन्म रत्नागिरी जिल्यांत

---

+ राजवाडेकृत महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ लें.

मुरुड गांवीं झाला. सन १८७० पासून यांनी तीन वर्षें पुणें ट्रेनिंग-कालेजांत अभ्यास केला व थर्ड ग्रेड झाले . सन १८७४ सालीं मॅट्रिक झाले व तेंव्हापासून सन १८८२ पर्यंत हे रेवदंडा व ठाणें येथील मराठी शाळेवर हेडमास्तर, व नंतर बार्शी येथील इंग्रजी शाळेंत व पुढें पुणें येथील ट्रेनिंग कॉलेजांत असि. मास्तर होते यांनां ज्योतिषशास्त्राचा नाद होता व त्या शास्त्राचा यांनीं उत्तम अभ्यास केला होता. हे चांगले लेखक होते. यांनीं मॅक्समुल्लरच्या धर्ममीमांसेचे मराठींत भाषांतर केले असून यांचे ‘ ज्योतिर्विलास ’ ‘ भारतीयज्योतिःशास्त्र, ’ ‘ भारतवर्षीयभूवर्णन, ’ ‘ सेवेल आणि दीक्षित याचे कॅलेन्डर ’ हे ग्रंथ सर्वमान्य आणि उपयुक्त माहितीनें भरलेले आहेत.

[ मनोरंजन, सन १९१० ]

“ दीक्षितांचे ‘ ज्योतिर्विलास ’ व ‘ भारतीय ज्योतिःशास्त्र ’ हे ग्रंथ मराठी भाषेंत या थोर पुरुषाची कीर्ति अमर करतील असा आह्मांस पूर्ण भरंवसा आहे. ’

[ मराठी भाषेची सांप्रतची स्थिति, विविधज्ञानविस्तार, पु. २९ ]

**मोरो गणेश लोंढे** [ १८५४–१९२० ] कोंकणस्थ ब्राह्मण यांचा जन्म पेण तालुक्यांतील वरसई गांवीं झाला. यांचें मराठी व इंग्रजी शिक्षण पेण येथें झालें. यांचे वडील भगवद्भक्त असून त्यांनीं कांहीं आरत्या केल्या होत्या. त्यांचें एक पुस्तकविक्रीचें

दुकान असे, तेथें प्रस्तुत कवींनीं लहानपणीं त्या आरत्या व तसेंच हरिविजय, पांडवप्रताप इत्यादि प्राकृत कविताग्रंथ वाचिले. त्यायोगानें यांनां कवितेची गोडी लागली. आपल्या वयाच्या १६ व्या वर्षीं शाळेंतील शिक्षणक्रम सोडून यांनां केवळ सहा रुपये पगारावर शिक्षकाची नोकरी धरावी लागली. तथापि ह्यांनीं उद्योगशीलतेनें व स्वावलंबनानें आपली मानसिक उन्नति करून घेतली. यांनीं विविध विषयांवर पुष्कळ कविता लिहिल्या व त्यांपैकीं बऱ्याच पुस्तकरूपानें छापून प्रसिद्ध झाल्या आहेत. ह्यांची कविता साधी, सरळ आणि व्याकरणशुद्ध असते. शिवाय ती नीतिबोधपर असल्यानें विशेषतः लहान मुलांस मनोरंजनद्वारा ज्ञानप्राप्त करून देण्याच्या कामीं फार उपयोगी आहे. ह्यांचीं ‘ बोधशतक ’, ‘ बोधसुधा ’, ‘ बोधमाला ’, ‘ पुष्पगुच्छ ’, ‘ पुष्पमाला ’ इत्यादि काव्यें प्रसिद्ध आहेत.

[ चं. शि. गोऱ्हेकृत ‘ अर्वाचीन कविता ’ ]

**गोविंद वासुदेव कानिटकर** [ १८५४–१९१८ ] कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म पुणें येथें झाला व प्राथमिक शिक्षण पुण्यास आणि इंग्रजी शिक्षण मुंबईस झालें. ह्यांनीं ‘ अकबरकाव्य ’, ‘ नारायणराव पेशवे ह्यांचा मृत्यु ’, ‘ कृष्णाकुमारी ’ आणि संमोहलहरी ’ चार मोठीं काव्यें केलीं आहेत, व तीं स्वतंत्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध आहेत. शिवाय, यांनीं विविध विषयावर लहानमोठीं

अनेक स्फुट पद्यें रचिलीं असून तीं विविधज्ञानविस्तार, काव्यरत्नावलि, करमणूक व मनोरंजन वगैरे मासिक पुस्तकांतून व वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालीं आहेत. ह्यांची कविता साधी आणि सरळ असून तींत रसाकडे विशेष लक्ष्य दिलेलें असतें. ‘ संमोहलहरी ’ हें काव्य चिंतनपर असून त्यांतील भाषा प्रौढ व विचारसरणी नवीन आहे.

[ चं. शि. गोऱ्हेकृत अर्वाचीन कविता ]

गद्यग्रंथांत यांची ‘ स्त्रियांची परवशता ’ व मोक्षमुल्लरकृत धर्मविषयक व्याख्यानें ’ हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध आहेत.

संपादक.

**वामन बाळकृष्ण रानडे** [ १८५४–१८२९ ] छापखानेवाला. * कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म नाशिक येथें झाला. हे रा. ब. गो. ह. देशमुख यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी होते. हे पांच वर्षें ‘ हिन्दुपंच ’ नामक विनोदी पत्राचे संपादक होते. तसेंच ‘ सूर्योदय ’, ‘ कल्पतरु ’, व शेवटीं ‘ ज्ञानचक्षु ’ पत्राचे संपादकत्व यांच्याकडे होतें. हे सुधारणाभिमानी, प्रेमळ स्वभावाचे, गुणाचे मोक्के, परोपकारी व मनमिळाऊ स्वभावाचे होते. ग्रंथलेखनाचें काम यांनीं पुष्कळ केलें आहे. मोठ्या पुरुषांचीं लहान लहान चरित्रें

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांचो मोजदाद. लोकशिक्षण; वर्ष १ ले.

यांनीं मोठ्या परिश्रमानें माहिती मिळवून लिहिलीं, व तीं ज्ञानचक्षूंत प्रसिद्ध केलीं.

[ मनोरंजन सन १९१० ]

हरि कृष्ण दामले [ १८९४-- ]सुलभग्रंथकार* कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म भोर संस्थानांत रावडी येथें झाला, व शिक्षण पुणें येथें बाबा गोखले यांच्या शाळेंत झालें. यांनी बरींच वर्षें खानदेशांत व पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलांत शिक्षकाचें काम केलें. नंतर हे विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या नवीन किताबखान्याचे व्यवस्थापक झाले. यांनां विद्यार्थिदशेंतच कविता करण्याचा नाद लागला. ह्यांनीं 'पार्वतीप्रकोप' नांवाचें एक काव्य केलें असून तें प्रसिद्ध आहे. ह्यांची कविता साधी, सरळ व सुरस आहे.

[ चं शि. गोऱ्हेकृत 'अर्वाचीन कविता.' ]

रा. दामले यांनीं 'अजब ऐनेमहाल,' 'बहारदानिष', 'थोरांच्या आख्यायिका' 'हिन्दुस्थानांतील योद्धयांच्या थोरवीच्या गोष्टी', 'शिक्षणसार', 'मुलांस नवी देणगी' व 'गलिव्हरचा वृत्तांत' इत्यादि लहानमोठीं दहाबारा पुस्तकें लिहिलीं आहेत. संपादक.

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्यापुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ लें.

**नारायण भवानराव पावगी** [ १८५४ ] दशस्थ ब्राम्हण. ह्यांचे वडील, आजे, हीं सर्व खानदानी घराण्यांतील होतीं; आणि वडील फर्स्टक्लास मामलेदार होते. यांच्या मातुश्री यांच्या १० व्या वर्षीं निवर्तल्या. या मुळें ठाणें व कुलाबा जिल्ह्यांत ज्या ज्या ठिकाणीं ह्यांचे वडील मामलतीवर जात, त्या त्या ठिकाणीं ह्यांचें मराठी व इंग्रजी चौथ्या इयत्तेपर्यंत शिक्षण झालें. सन १८७२ सालीं मॅट्रिक झाल्यावर यांनीं मुन्सफीचा अभ्यास सुरू केला, पण तिसरा वर्ग मॅजिस्ट्रेटच्या परीक्षेस बसून ते पास झाले. लगेच त्यांस अव्वल कारकुनाची जागा मिळाली, व तेव्हांपासून ते रेव्हेन्यू खात्यांत वाढत वाढत महालकरी व फर्स्टक्लास मामलेदार या हुद्यां-पर्यंत चढले.

एकीकडे सरकारी नोकरी करीत असतां दुसरीकडे यांनी वेळांत वेळ काढून वाङ्मयसेवा आरंभिली. भारतवर्षाचा खरा इतिहास आमूलाग्र लिहावा या हेतूनें यांनीं ‘ भारतीय साम्राज्य ’ नांवाचीं एकंदर २२ पुस्तकें लिहिण्याचा संकल्प केला. त्यापैकीं आज ११ पुस्तकें व एक त्यांचे ‘ आत्मवृत ’ हीं प्रसिद्ध झालेलीं आहेत; आणि बाकीचीं लिहून तयार असून अप्रकाशित आहेत.

भूस्तरशास्त्राचे वेदार्षिजनक, आर्यांची जन्मभूमि व उत्तर ध्रुवाकडील त्यांच्या वसाहती आणि वेदकालीन व वेदोत्तरकालीन भारतवर्षांतील स्वराज्य हे तीन ग्रंथ ह्यांनीं इंग्रजींत लिहिले आहेत.

मतभेद असले, तरी यांचे हे ग्रंथ चिंतनीय आहेत असे टिळकां-सारख्या विद्वानांचे अभिप्राय आहेत.

[ मोनेकृत ' महाराष्ट्रीय व्याकरणकार व प्रबंधकार ]

**गोपाळ गणेश आगरकर** [ १८५६-१८९९ ] कोंकणस्थ ब्राम्हण. सुधारक–वर्तमान पत्रकार * यांचा जन्म सातारा जिल्ह्यांत कऱ्हाडाजवळील टेंभू गांवीं झाला. गोपाळरावांचा जन्म झाला त्या वेळीं त्यांचे आईबाप अठरा–विस्वेदारिद्र्यांत होते व कसे तरी अब्रूनें दिवस काढीत होते. शिवाय टेंभूला शाळेची सोय कांहीं नव्हती. तेव्हा विद्याभ्यास करण्यांकरितां आपल्या आजोळीं कऱ्हाडला गेले, आणि अशा प्रकारें अगदीं बालवयांतच त्यांच्यावर आईबापावेगळे रहाण्याचा प्रसंग आला. विरुद्ध परिस्थितीशी टक्कर देण्याचें शिक्षण गोपाळरावांना एव्हांपासूनच मिळण्यास आरंभ झाला. आजोळीं राहून तीन इयत्तापर्यंत शिक्षण झालें; पण पुढें कऱ्हाडला अधिक शिक्षणाची सोय नव्हती, व पुण्याला वगैरे जाण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नव्हतें. यामुळें एव्हांपासूनच त्यांच्यावर खर्डेवाशीचा प्रसंग आला. ते कऱ्हाडच्या मुन्सफ कोर्टांत उमेदवारी करूं लागले. तथापि आहे त्या स्थितींत दिवस कंठणें गोपाळरावांस खपेना. तेव्हां रत्नागिरीला यांचें कोणी आप्त होते तिकडे जाऊन

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची ओळख, लोकशिक्षण, वर्ष १ लें

पुढची विद्या करावी असें त्यांनीं ठरविले. परंतु रत्नागिरीला ज्या आप्ताच्या भरंवशावर ते गेले होते. त्यानें त्यांच्याकडे पाठ फिरविली आणि आपल्या घरापासून दीडदोनशे मैलावर परक्या ठिकाणी उदरंभरण व विद्यार्जन यांच्यासाठी गोपाळरावांना वार लावावे लागले. रत्नागिरि येथें त्यांनी शागिर्दी केली अशीही माहिती मिळते. पण या सर्व संकटांशी त्यांनी टक्कर दिली. या वेळी त्यांना आपल्याकडील गृहस्थितीची खडानूखडा माहिती होऊन, बरें काय, वाईट काय, हें लक्षांत येऊन, पुढें ज्या विचारांचें त्यांनीं मंडन व प्रतिपादन केलें, त्यांचें बीजारोपण त्यांच्या चित्तांत झालें. सामाजिक अन्यायाची बरोबर कल्पना येण्यास समाजस्थिति आमूल पाहण्यास मिळाली पाहिजे व 'जावें त्याच्या वंशा' ही स्थिति प्रत्यक्ष अनुभविली पाहिजे. ती गोपाळरावांनी अनुभविली. परंतु इतक्या हाल आपेष्टा सोसूनही तेथें त्यांच्या विद्याभ्यासाचें जमेना. कारण रत्नागिरीला पोटासाठी कराव्या लागणाऱ्या उद्योगांतच त्यांचा सारा वेळ जाऊं लागला, व कऱ्हाडांतून रत्नागिरींत—ह्मणजे आगींतून फोपाट्यांत अशी त्यांची स्थिति झाली. आणि असें होतांच त्यांनी पुन्हा कऱ्हाडचा रस्ता सुधारला.

रत्नागिरी सुटून ते कऱ्हाडला आले तरी दारिद्र्यामुळें ज्याप्रमाणें एकदां खर्डेघाशीचा प्रसंग आला त्याप्रमाणे या खेपेस त्यांनी

तेथील दवाखान्यांत कांपौंडरची नोकरी धरल्यामुळें आतां बाटल्या धुऊन औषधें तयार करण्याचें काम त्यांच्यावर पडलें. पण पोटाला मिळविणें हें कांही गोपाळराव आपलें इतिकर्तव्य समजत नव्हते. त्यांना विद्यार्जन करावयाचें होतें. या मुळें त्यांनी ही नोकरी सोडली व ते आपल्या थोरल्या मामाकडे आकोल्यास गेले व तेथें मात्र त्यांचा अभ्यास निर्वेधपणें होऊन गोपाळराव स. १८७५त मॅट्रिकची परीक्षा पास झाले.

मॅट्रिक झाल्यानंतर गोपाळरावांनीं पुढील अभ्यासासाठीं पुण्यास डेक्कन कॉलेजात जाण्याचे ठरविले. अकोले सोडण्यापूर्वीं रा. सा. महाजनी आणि शाळेंतील दुसरे दोन गृहस्थ यांच्याकडून त्यांनी पन्नास रुपये उसने मिळविले व या पन्नास रुपायांच्या पुंजीवर पुण्यास जाऊन डेक्कन कॉलेजांत त्यांनी नांव तर घातलेच. तथापि जे हाल त्यांनी आतापर्यंत काढले, तेच त्यांना कॉलेजांतही काढावे लागले. कारण उसने काढलेले रुपये हां हां ह्मणतां संपून गेल्यावर कधीं वक्तृत्वसमारंभांत व्याख्यान देऊन, तर कधीं निबंध लिहून ते द्रव्यप्राप्ति करूं लागले. या वेळीं अंगांत घालण्याला गोपाळ-रावांजवळ अवघा एकच सद्रा होता असें ह्मणतात. असो.

सन १८७९ सालीं गोपाळराव बी. ए. झाले व दक्षिणा फेलोशिप मिळून ते एम. ए च्या अभ्यासाला लागले. गोपाळरा-

यांचा तत्वज्ञान हा ऐच्छिक विषय होता व विषयानुरोधानें या अवधींत मिल्ल व स्पेन्सर या पाश्चात्य तत्वज्ञांच्या ग्रंथाशी व विचाराशी त्यांनीं गाढ परिचय करून घेतला, व याच अवधींत त्या वेळीं डेक्कन कालेजांत असणाऱ्या लो. टिळकांशी त्यांची मैत्री झाली उभयतांनींही सरकारी नोकरी करून द्रव्यार्जन करण्याचा मार्ग आपणाला नको, असें ठरवून, राष्ट्राहितार्थं ज्ञानप्रसार: करण्यांतच आयुष्य वेंचण्याचें ठरविलें. आणि वर्तमानपत्र हें ज्ञानप्रसाराचें उत्तम साधन असल्यामुळें या नवीन मंडळींनी ' केसरी ' व 'मराठा' हीं वर्तमानपत्रें सुरू केलीं. केसरीचें संपादकत्व आगरकराकडे व मराठ्याचें टिळकांकडे होतें. वर्तमानपत्राप्रमाणे लोकशिक्षणाचे कार्यही या मंडळींनी हातीं घेतलें, व या कामीं ' निबंधमाला 'कार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी पुढारपिणा घेऊन न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना केली. परंतु पुढें विष्णुशास्त्री मरण पावले व आगरकर टिळकांत—मत भेद होऊं लागून सन १८८८ सालीं गोपाळरावांनी ' सुधारक ' वर्तमानपत्र सुरू केलें.

सुधारकांतील लेखांखेरीज ' आमचे डोंगरींतील १०१ दिवस, विकारविलसित ' व ' वाक्यमीमांसा ' ही गोपाळरावजींची पुस्तकें प्रसिद्ध आहेत. ' सुधारक ' काढला तेव्हांच आगरकारांची प्रकृति पुष्कळ बिघडली होती. त्यांतच कॉलेजच्या कामाचा बोजा पडल्या मुळें सन १८९५ सालीं त्यांची प्रकृति फारच बिघडली. आपला शेवट जवळ आला हे त्यांना कळलें. तथापि ते डगमगले नाहींत.

'मला जे लोकांना सांगावयाचें होते तें मी सर्व सांगितलें आहे; आतां केव्हांही मरण्याची माझी तयारी आहे' असें ते ह्मणत.

[मा. दा. आळतेकर, 'आगरकर अंक' मनोरंजन स. १९१६]

"ज्या तत्वाचें अवलंबन केल्यामुळें इतर राष्ट्रें अधिकाधिक सुधारत चालली आहेत, त्या तत्वांचा स्वीकार करण्यास आम्हीं आनंदानें तयार झालें पाहिजे तीं तत्वें हा सुधारक महाराष्ट्र लोका-पुढें वारंवार आणील. असें करण्यांत त्यास, आज ज्याचा जारीने अंमल चालत आहे त्या लोकमताविरूद्ध बरेंच जावे लागणार असल्यामुळें, फार त्रास पडणार आहे. पण त्याची तो पर्वा करीत नाहीं, कारण ज्या लोकमताचा पुष्कळांस बाऊ वाटतो, त्याचा सूक्ष्म दृष्टीनें विचार केला असतां असे दिसून येईल कीं, बऱ्याच बाब-तींत त्याचा आदर करण्यापेक्षा अनादर करणें हाच श्लाघ्यतर मार्ग होय कोट्यावधी अक्षरशत्रु व विचारशून्य मनुष्यांनी आपल्या आडाणी समजती प्रमाणें चांगलें ह्मटलें किंवा वाईट म्हटलें, अज्ञान व धर्मभोळ्या लोकांच्या अचरट धर्मकल्पनांची व वेडसर सामाजिक विचारांची प्रसंशा करून, त्यापासून निघेल तेवढी माया काढणाऱ्या स्वार्थपरायण उदरंभरू हजारो टवाळांनी शिव्यांचा भडिमार किंवा छी-थूः करण्याचा प्रयत्न केला; शेंकडो अविचारी व हेकड लोकांनी नाकें मुरडली किंवा तिरस्कार केला—सारांश ज्यांना मनुष्या-च्या पूर्णावस्थेनें रूप बिलकुल समजलेलें नाहीं किंवा ती घडून

येण्यास काय केलें पाहिजे हें ठाऊक नाहीं, अशांच्या पर्वतप्राय, झुंडीच्या झुंडी तुटून पडल्या तरी जो खरा विचारी आहे, ज्याला लोककल्याणाची खरी कळकळ आहे, सत्य बोलणें व सत्यास धरून चालणें यांतच ज्याचें समाधान आहे–अशानें वरच्यासारख्या क्षुद्र लोकांच्या अवकृपेला, रागाला किंवा उपहास्यतेला यत्किंचित न भितां आपल्या मनास योग्य वाटेल तें लिहावें बोलावें व सांगावें, हेंच त्यास उचित होय. त्याच्या अशा वर्तनांतच जगाचे हित आणि त्याच्या जन्माची सार्थकता आहे [सुधारक काढण्याचा हेतु.]

**बाळ गंगाधर टिळक** [ १८५६–१९२० ] कोंकणस्थ ब्राम्हण. प्रतिभावन् पुराणेतिहास संशोधक, संस्थास्थापक व श्रेष्ठ वर्तमानपत्रकार* यांचा जन्म रत्नागिरी येथें झाला. बळवंतराव-जींचा जन्म झाला तेंव्हा त्यांचे वडील रत्नागिरी येथें शाळाखात्यांत आसि. डेप्युटी होते. आपल्या वयाचे दहावे वर्षी ठिळक पुण्यास आले व त्यांचें पुढील शिक्षण पुण्यासच झालें. वयाच्या १६ व्या वर्षीं टिळक मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास होऊन सन १८७३ त डेक्कन कॉलेजांत गेले. नंतर सन १८७६ साली बी. ए. व सन १८७९ सालीं एल्. एल्. बी. झाले. एल्. एल्. बी. चे क्लासांत असल्यापासून आगरकर व टिळक यांचा स्नेह जमला व या

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण वर्ष १ लें.

उभयतांनीही सरकारी नोकरींत न पडतां आपलें पुढील आयुष्य राष्ट्रकार्याकडे खर्च करण्याचें ठरविलें. याच सुमारास कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे आपली सरकारी नोकरी सोडून पुण्यास येऊन राहिले होते. स्वतंत्र व्यवसाय करण्याचा त्यांचाही विचार असल्यामुळें टिळक व आगरकर त्यांस जाऊन मिळाले व सर्वांनी मिळून ता. २ जानेवारी सन १८८० रोजीं मोरोबादादा फडणवीस यांचे वाड्यात 'न्यूइंग्लिशस्कूलची स्थापना केली, व हीं शाळा पुढें लौकरच नांवारूपास आली. तथापि कोणत्याही उदयोन्मुख राष्ट्राच्या बाळपणाच्या चळवळींत तेथील पुढाऱ्यांचे चित्त छापखाने व वर्तमानपत्रें यांकडे अधिक वेधतें. या स्थूल नियमास अनुसरून कांहीं संघटिक प्रयत्न करण्याच्या इच्छेनें सन १८८१ पासून या मंडळींनी केसरी व मराठा हीं बर्तमानपत्रें सुरू केलीं आणि शाळेप्रमाणें हीं वर्तमानपत्रेंही तत्काल लोकप्रिय झालीं.

टिळकांच्या सार्वजनिक आयुष्यांतील पहिली क्रांतिकारक गोष्ट म्हणजे ते व त्यांचे स्नेही आगरकर यांना कोल्हापूर प्रकरणीं झालेली चार महिन्याची शिक्षा ही होय. तथापि या वेळीं या उभयतांनी दाखविलेलें धैर्य, करारीपणा व स्वार्थत्याग वाखणण्यासारखा होता. या शिक्षेच्या योगानें त्यांची मानहानी न होतां उलट त्यांचा नांवलौकिक वाढून ते आपले अंगकृत लोककार्य अधिक नेटानें करूं लागले.

यानंतर क्राफर्डप्रकरण ( १८८८–८९ ), संमतिबिलाची चळवळ ( १८९१ ), गणपतिउत्सव ( १८९३ ), शिवाजी-उत्सव ( १८९५ ), प्लेग व दुष्काळ ( १८९६–९७ ) ताई-महाराज केस ( १९०१ ) बाँबचे अत्याचार व त्यावरील अग्र-लेखावरून झालेली ६ वर्षांच्या काळेपाण्याची शिक्षा ( १९०८ ) इत्यादि लहानमोठ्या घटनांनी टिळकांचें जीवित व्यापृत असतां दुसरीकडे त्यांचें ग्रंथलेखनाचें कामही तितक्याच जोमानें चाललें होतें. कारण याच कालांत त्यांनी ' ओरायन ' ( १८९२ ) व ' आर्टिकहोम ' ( १९०३ ) हे दोन अद्वितीय ग्रंथ इंग्रजींत लिहिले हे दोन्ही ग्रंथ जगन्मान्य झाले असून त्यामुळे त्यांची कीर्ति जगभर झाली. तथापि ही साहित्यसेवा इंग्रजी भाषेची झाली. व 'गीतारहस्य' ( १९१५ ) व ' केसरी ' ही मराठींत लिहिल्यामुळें तेवढीच सेवा मायभाषेच्या पायीं रजू झाली.

तथापि केसरीद्वारा टिळकांच्या हातून घडलेली मराठी भाषेची साहित्यसेवाच श्रेष्ठ आहे. कै. विष्णुशास्त्री यांनी घालून दिलेला धडा टिळकांनी उत्कृष्टपणें गिरविला. त्यांच्या लेखनशैलींत ' यत्प्रौढित्व-मुदारता च वचसां यच्चार्थ तो गौरवम् ' या भवभूतीच्या वचनांत सांगितलेले बरेच गुण आढळतात इतकें सांगितलें असतां टिळकांच्या भाषेचें योग्य वर्णन झालें.

[ संपादक अ. म. वा. ]

**गोविंद बल्लाळ देवल. [ १८५६-१९१६ ] नाटककार*** कोंकणस्थ ब्राम्हण. यांचा जन्म सांगलीजवळील हरिपूर गावीं झाला. लहानपणापासून यांनां नाटकाचा नाद होता तरी हे सन १८७९ सालीं मॅट्रिक पास झाले. यांनां कविता करण्याचा नाद असल्यामुळें साहाजिकच त्या वेळीं बेळगांव येथें शिकत असणाऱ्या आण्णा-साहेब किर्लोस्करांशी त्यांचा चांगला परिचय झाला सन १८८४ सालीं देवल शेतकीची परीक्षा उत्तीर्ण झाले. अग्रिकल्चर कॉलेजांत असतांना आर्योद्धारक मंडळींत गोविंदराव काम करीत असत. तेव्हांच त्यांचा उत्तम नट म्हणून लौकिक झाला होता. कांहीं दिवस सरकारी नोकरी केल्यानंतर ती कायमची सोडून, ते नाट्य-वाङ्मयात भर घालूं लागले. किर्लोस्करांच्या खालोखाल नाट्यकवि म्हणून यांचे नांव पुढें येऊन बऱ्याच नाटकमंडळ्यांनां यांच्या नाटकांवर गबर होतां आलें. देवलांनीं संगीत व गद्य मिळून एकंदर आठ नाटकें लिहिलीं आहेत. तीं सं. विक्रमोर्वशीय, सं. मृच्छकटिक, सं. शापसंभम, सं. शारदा, सं. संशयकल्लोळ, दुर्गा, फाल्गुणराव व झुंझारराव हीं होत. या पैकीं पहिलीं तीन संस्कृत नाटकांची व शेवटचीं तीन इंग्रजी नाटकांचीं रूपांतरें होत. शारदानाटक काय तें एकच त्यांचें स्वतःचें व तत्कालीन समाजांत

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषाची मोजदाद, लोकशिक्षण वर्ष १ लें.

क्रांति करून सोडणारें नाटक होतें. जरठतरुणी विवाह हा या नाटकाचा विषय असून नाटककारानें आपल्या कवित्वानें तो उत्कृष्ट रंगविला आहे. त्या मुळें बराच काळ महाराष्ट्रीयांच्या मनावर याचा पगडा बसला होता.

[ महाराष्ट्रीय ज्ञानकोश विभाग १९ वा. ]

**पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी** [ १८५६– ] यजुर्वेदी ब्राम्हण. यांचा जन्म मुंबई येथें झाला. सन १८६९ सालीं हे मराठी पब्लिक सर्व्हिसची परीक्षा पास झाले व नंतर जगन्नाथ शंकरशेट यांच्या शाळेंत दाखल झाले. तेथें आणि जनरल आसें- ब्लीच्या विद्यालयांत ह्यांनां इंग्रजी व संस्कृत प्राथमिक शिक्षण मिळाले. सन १८७५ सालीं प्रवेश परीक्षेंत उत्तीर्ण झाल्यावर हे कांहीं काळपर्यंत विल्सन कॉलेजांत अभ्यास करीत होते. परंतु डोळ्याच्या आजारामुळें ह्यांनां शिक्षणक्रम सोडावा लागला. नंतर ह्यांनीं सरकारी नोकरी पतकरिली. ते अनुक्रमें जकात वसूल खात्यांत व गॅझेटियर कचेरींत नोकर होते. पुढें यांस सरकारानें प्राचीन इतिहासाचीं साधनें शोधून काढण्याच्या कामीं प्रो. फॉरेस्ट ह्यांचे मदद्‌गार म्हणून नेमले. तेथें असतां मराठ्यांच्या माहिती संबंधीं जी पुस्तकें छापून निघालीं त्यांच्या कामीं ह्यांनी प्रो. फॉरेस्ट यांनां चांगली मदत केली. नंतर हे पोलिटिकल खात्यांत असि.

सुपरिंटेंडेंटच्या जागीं नेमले गेले. व तेथें असतांनां पोवाड्याचे पुस्तक छापण्याच्या कामीं मे. ऑक्वर्थ आणि शाळिग्राम ह्यांनां चांगलें साह्य केलें. ह्यांनां आपल्या वयाच्या १४ व्या वर्षापासून मराठी व संस्कृत कविता करण्याचा नाद आहे. ह्यांनीं 'मुक्तावलि,' 'पद्यसुधा,' 'समाधिशतावलि,' 'शिवदुःखाश्रुमार्जन' व 'आनंदोद्गार' इत्यादि अनेक काव्यें केलीं आहेत. यांची रचना प्रौढ आणि हृदयंगम आहे.

[ चं. शि. गोऱ्हेकृत अर्वाचीन कविता. ]

रामचंद्र भिकाजी जोशी [ १८५७–१९२७ ] हे एक जुन्या पिढींतील कर्ते सुधारक व पुणें येथील 'न्यू इंग्लिशस्कूल' शाळेंतील शिक्षक होते. यांनी 'निबंधचंद्रिका' या नांवाचें एक मासिक कांहीं वर्षें चालविलें होते. हे मराठी शालापत्रकही बरींच वर्षें चालवीत होते. याशिवाय त्यांचा 'ज्ञानप्रकाश' व 'सुधारक' या दोन पत्रांशीं पूर्वीं निकट संबंध होता. रामभाऊंनी व्याकरणावर बरींच पुस्तकें लिहिलीं असून ती शाळांतून चालूंही आहेत. 'मराठी भाषेची घटना' हें त्यांचें पुस्तक त्यांचा मराठी भाषेचा दृढ व्यासंग चांगलाच व्यक्त करतें.

[ संपादक. ]

गंगाधर रामचंद्र मोगरे [ १८५७–१९०४ ] पळशे ब्राह्मण. ह्यांचा जन्म शिरगांव येथें झाला, व मराठी शिक्षणही

तेथेंच झालें. सन १८७३ पासून मुंबई येथें यांच्या इंग्रजी शिक्षणास प्रारंभ झाला. हें शिक्षण अनुक्रमें जगन्नाथ शंकरशेठ ह्यांच्या शाळेंत आणि एलफिन्स्टन हायस्कूलांत प्रवेश परीक्षेपर्यंत झाले. परंतु शरीर प्रकृती सुदृढ नसल्यानें शिक्षणक्रम सोडून ह्यांनां नोकरी पतकरावी लागली. सन १८८६ सालीं मुंबई येथील रॉयल एशियाटिक सोसायटीच्या ग्रंथसंग्रहालयांत ह्यांना कारकुनाची जागा मिळाली व या जागेवर ते आखेरपर्यंत होते. ह्यांनां कविता करण्याचा नाद अगदी लहानपणापासून असून आजमित्तीस हे कवि महाराष्ट्रभाषेंतील अर्वाचीन कवीमध्यें अग्रस्थानीं जाऊन पोहोंचले आहेत. यांनीं बाणकथेचें प्राकृत आर्याबद्ध काव्य केलें असून तें ' अभिनव कादंबरी ' या नांवानें प्रसिद्ध आहे. यांनीं स्फुट कविताही पुष्कळ केल्या असून त्या विविधज्ञानविस्तार वगैरे मासिकांत वेळोवेळीं प्रसिद्ध झाल्या आहेत. यांची कविता साधी, सरळ आणि प्रसन्न आहे.

[ चं. शि. गोऱ्हेकृत ' अर्वाचीन कविता ' ]

" प्राचीन विचार आणि प्राचीन वृत्तांची व रचनेची पद्धत बरीचशी कायम ठेवून रचना करणारे कवि मोगरे हे होत. यांची कविता चांगल्या प्रकारची आहे. यांनीं नवीन विषयांवर विशेषतः श्लोकवृत्तांत कविता लिहिली आहे. सुबोध व मधुर शब्दरचना हा मोगरे यांच्या कवितेचा मुख्य गुण आहे. त्यामुळें वाचकाचें मन

सहज मोहून जातें. मोगरे यांच्या कवितेचे विषय कठिण नसतात; आणि भाषाही साधी, शुद्ध, व्यवस्थीत अशी असते. यांनीं अवहेलन [ Satire ] या काव्यपद्धतीचा प्रथमतःच उपयोग करून कांहीं चांगलीं काव्यें लिहिलीं आहेत "

[ मराठी भाषेची घटना पृ. २९६ ]

**सीताराम रामचंद्र गायकवाड** [१८४८–१८९७] मराठे यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत बापर्डे गांवीं झाला. यांचा विद्याभ्यास मॅट्रिकपर्यंत झाला होता. पुढें संसाराचा बोजा अंगावर पडल्यानें यांनां नोकरी पतकरावी लागली. नोकरी करीत असतां यानीं रसायनशास्त्रसंबंधी व संस्कृत भाषेचा अभ्यास केला. यांनीं शाईचे कागद, गोळया, पूड वगैरे तयार करण्याची कल्पना काढून सन १८८८ सालीं त्यांत चांगली प्रसिद्धी मिळाविली. यांच्या शाईच्या कागदांची फार वाखाणणी झाली. सन १८९० सालीं हे कागद विलायतेंत एक लाख खपले ! पुढे सहा वर्षांनी यांनीं नोकरी सोडून याच धंद्यात लक्ष्य घातलें व शाईचा कारखाना स्थापन केला. हे जबर उद्योगी होते. हे चांगले लेखक व कवि होते आणि यांचा विद्याव्यासंग सतत चालू होता. 'पुणेशहर वर्णन', 'विजापूर वर्णन' व 'आसिरिया' वगैरे कित्येक पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत.

[ मनोरंजन, दिवाळी अंक १९१० ]

" केवळ स्थलवर्णनात्मक ग्रंथ म्हटलें तर मुंबईचे प्रख्यात ग्रंथकार गोविंद नारायण यांचें 'मुंबईचें वर्णन' चांगले आहे. त्याच नमून्यावर गायकवाडकृत 'पुणेशहरवर्णन' हें एक बऱ्यापैकीं पुस्तक आहे. "

[ मराठी भाषेची घटना, पृ. ३८७. ]

**रामकृष्ण रघुनाथ मोरमकर** [१८९८–१९२३] सारस्वत ब्राम्हण. ह्यांचा जन्म सावंतवाडींत झाला, व मराठी शिक्षण कै. गोविंदपंत खाडिलकर या सुविद्य गुरूच्या हाताखाली झालें. मॅट्रिकची मर्यादा ओलांडून कॉलेजांतील शिक्षणाचा लाभ घ्यावा असा विधिसंकेत नसल्यामुळें स. १८८१ सालीं ह्यांनां नोकरींत शिरावें लागले. रावसाहेबांना वाङ्मयविषयाचें बाळकडूच मिळाले होते, असें म्हणावयास हरकत नाहीं. सन १८९८ पासून यांच्याकडे विविध ज्ञानविस्ताराचें संपादकत्व आले आणि ते त्यानी ता हयात विस्ताराच्या लौकिकास साजेशा रितीनें चालविले.

[ विविधज्ञानविस्तारांतील मृत्युलेख ]

' रावसाहेबांचे विस्तृत लेख विस्ताराशिवाय इतर मासिकांतून प्रसिद्ध झाले आहे. विस्तारांत त्यांचे तसे लेख प्रसिद्ध झाल्याचें माहीत नाहीं. मलपृष्ठावरील त्रोटक परीक्षण मात्र बहुधा त्याचें एकत्याचच असे; व त्यांत निस्पृहपणा, मार्मिकता, रसिकता, विनोद

हे लेखकाचे सारे गुण थोड्या जागेंत दिसत असल्याकारणानें कधीं कधीं त्याचा वाचकांच्या मनावर विस्तृत टीकालेखांपेक्षांही अधिक परिणाम होत असे. विस्तारांतील मुख्य लेखांसारखे रुक्ष व पौष्टिक अन्न रुचकर वाटून पचनीं पडण्यास मल पृष्ठांवरील संक्षिप्त अभिप्रायाचा उपयोग मुख्य पक्वान्नाभोंवतीं पसरलेल्या चटण्याकोशिंबिरीसारखा होत असे. त्यांची खोंच व मुरड विस्तृत लेखांच्यामन्य पण साध्या छतास झालरीप्रमाणें दिसे. विस्तृत लेख लिहिण्याची योग्यता अंगीं असतांही पाहुण्यासाठीं मुख्य दिवाणखाना ठेवून स्वतः पडवीमध्येंच पडून राहण्यांत रावसाहेबांचा पराकाष्ठेचा निगर्वी स्वभाव व आतिथ्यपरत्व दिसून येई.'

[ श्री. कृ. कोल्हटकरांचा तिलांजलि, वि. ज्ञा. विस्तार. ]

**वासुदेव वामनशास्त्री खरे** [ १८५८–१९२४ ] इतिहास संशोधक कवि. * कोंकणस्थ ब्राम्हण. ह्यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत गुहागर येथें झाला. ह्यांचें मराठी शिक्षण गुहागर येथेंच झालें. लहानपणीं हे फार खेळाडू असत. सोळाव्या वर्षापावेतो ह्यांचा म्हणण्यासारखा विद्याभ्यास झाला नाहीं. पुढें अनुक्रमें सातारा येथें वे. शा. रा. अनंताचार्य गजेंद्रगडकर व पुणें येथ वे. शा. सं. नारायणशास्त्री गोडबोले ह्यांजपाशीं यांनीं व्याकरण-

* राजवाडेकृत महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष २ रें.

शास्त्राचें अध्ययन केलें. पुण्यास असता कै. विष्णुशास्त्री चिपळूण-करांशी ह्यांचा परमस्नेह जडला; व त्यांनी काढलेल्या न्यू इंग्लिश स्कूलांत ह्यांनी सुमारे आठ महिने शिक्षकाचें काम केलें. नंतर ह्यांना मिरजहायस्कुलांत शिक्षकाची जागा मिळाली. ही नोकरी मिळाल्या वर ह्यांनी इंग्रजी भाषेचें चांगलें ज्ञान संपादान केलें; व नोकरी संभाळून खासगी वेळांत अनेक उपयुक्त ग्रंथ आणि 'यशवंत महाकाव्य', 'समुद्र' व इतर स्फुट कविता लिहिल्या. ह्यांच्या रचनेंत अकृत्रिमता आणि प्रसाद हे दोन गूण प्राधान्येंकरून दिसून येतात.

[ चं. शि. गोऱ्हेकृत अर्वाचीन कविता. ]

"वासुदेवशास्त्री खरे यांचें 'यशवंतमहाकाव्य' हें या मध्यकालांतलेंच आहे. यांची रचना जुन्यातऱ्हेची असून कल्पना नवी आहे. खरे हे चांगले कवि आहेत. त्यांनी पुढें ऐतिहासिक लेखांच्या संग्रहाकडे लक्ष दिल्यामुळें कविता करण्याचा नाद सोडला यांची 'गुणोत्कर्ष' आणि 'तारामंडळ' हीं नाटकें चांगलीं आहेत." [ मराठी भाषेची घटना, पृ. २९० ]

**धोंडो केशव कर्वे** [ १८५८ ] समाजसुधारक व संस्था स्थापक * ह्यांचा जन्म मुरूड जवळील शेरवली गांवीं झाला. यांचे

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषाचीं मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ लें.

प्राथमिक शिक्षण मुरूड येथें व इंग्रजी शिक्षण मुंबई येथें मनी-स्कुलांत व एलफिन्स्टन कॉलेजांत झालें. सन १८८४ सालीं बी. ए. झाल्यावर सन १८८७ च्या आखेर हे एम. ए. ला बसले व तींत नापास झाल्यामुळें पुढें परीक्षेचा नाद सोडून दिला आणि सन १८९१ सालीं डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे सभासद झाले. यांचा पहिला विवाह यांच्या १५ व्या वर्षी झाला व पहिले कुटुंब निवर्तल्यानंतर सन १८९३ सालीं यांनीं पुनर्विवाह केला. सन १८९७ त ह्यांनी 'अनाथबालिकाश्रम' सन १९०७ त 'महिलाविद्यालय' व सन १९१० त 'निष्कामकर्ममठ' व पुढें 'वानप्रस्थाश्रम वगैरे महत्वाच्या संस्था स्थापन केल्या. ह्यांनी आपलें सर्व आयुष्य स्त्रीशिक्षणाच्या कामीं खर्च केलें व विशेषतः यांच्याच प्रयत्नानें स्त्रीशिक्षणाचें कार्य यशस्वी होत आहे. यांची 'नीतिशास्त्राचे सामान्य सिद्धांत' 'राजनीतीची मूलतत्वें' इत्यादि पुस्तकें पुण्याच्या दाभोळकर ग्रंथमालेत प्रसिद्ध झालीं असून मुबई-च्या मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीनें प्रसिद्ध केलेलें यांचें 'आत्मवृत्त सुप्रसिद्ध असून हेंच विशेष महत्वाचें आहे.

संपादक.

"आत्मवृत्त लिहिणें म्हणजे एकप्रकारची स्वतःची बढाई मारणें असें सत्कृद्दर्शनीं दिसतें. अण्णा कर्वे यांची ज्यांनां थोडी तरी ओळख आहे, त्यांना यांनी हें पुस्तक लिहिण्याचा धीर कसा केला

याचेंच आश्चर्य वाटेल; परंतु असल्या वृत्तापासून खरोखरचि फार फायदा होण्यासारखा आहे. अशी त्यांची पूर्ण खात्री झाल्याशि-वाय त्यांच्यासारखे विनयशील गृहस्थ या कामांत पडतेच ना! त्यांनी हें पुस्तक एक अवघड कर्तव्य म्हणूनच लिहिलें आहे. आमच्या मराठी भाषेंत असलीं पुस्तकें फार-मुळींच नाहीत, असें म्हटलें तरी चालेल. युरोपीय देशांत अशा प्रकारची आत्मवृत्तें, आठवणी वगैरे शेंकडो प्रसिद्ध होतात. तरी त्यांतील बहुतेक गप्पा किंवा कुटाळक्या यांच्याच दर्जाची असतात. मनुष्याच्या विचाराचें व कृतीचें हुबेहुब चित्र जणू काय प्रसिद्ध फ्रेंच ग्रंथकार रूसो यानें लिहिल्या प्रमाणें जगाच्या शेवटच्या दिवशीं परमेश्वराला आपल्या सर्व जीवीतावर जो निकाल द्यावयाचा असतो, त्या करितां आपण दिलेली जबानी अशा प्रकारची आत्मचरित्रें कोणत्याही भाषेंत जरी झालीं तरी अगदीं थोडीं असावयाचीं. तेंव्हा आपल्या मराठी भाषेंत अण्णा कर्वे यांनी हें जें आपलें आत्मचरित्र लिहिलें आहे त्यामुळें त्यांनी आपल्या देशाच्या उन्नतीकरितां जीं अनेक बहुमोल कामें केली आहेत त्यांतच आणखी एक महत्वाची भर घातली आहे, असेंच सर्व लोक समजतील, अशी माझी खात्री आहे"

[ र. पु. परांजपेकृत आत्मवृत्ताचा उपोध्दात. ]

**महादेव शिवराम गोळे** [ १८५९–१९०६ ] शिक्षक व ग्रंथकार.* कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म पुणें येथें झाला. घरीच अभ्यास करून हे सन १८७८ सालीं मॅट्रिक झाले. पुढें डेक्कन कॉलेजांतील फेलोशिपचीं वर्षें संपल्यानंतर हे न्यू इंग्लिशस्कूलच्या मंडळीस येऊन मिळाले; व शिक्षकाचें काम संभाळून सन १८८४ सालीं एम. ए. ची परीक्षा पास झाले. मि. आगरकर यांच्या निधनोत्तर हे फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल झाले. परंतु ह्या सुमारास यांचा प्रचलित शिक्षणपद्धतीवरील विश्वास उडत चालला आणि ह्या नवीन कल्पनांचें प्रतिपादन यांनी ' ब्राह्मण आणि त्यांची विद्या, ' ' हिन्दुधर्म आणि सुधारणा, ' ' शाळेचा अभिमान ' इत्यादि पुस्तकामध्यें केलें. ह्यांच्या स्वभावांत एक प्रकारचा विनोद भरलेला असे, व हे मोठे मार्मिक लेखक होते. यांची विचारसरणी पुष्कळांस पसंत पडणार नाहीं. परंतु यांच्या पुस्तकांनीं मराठी वाङ्मय संपत्तींत मोठी भर घातली आहे, यांत संशय नाहीं.

मनोरंजन, दिवाळी अंक सन १९१० ]

" गोळे यांचीं ' ब्राह्मण आणि त्यांची विद्या ' व ' हिन्दुधर्म आणि सुधारणा ' हीं भाषा आणि प्रतिपादनशैली या संबंधानें मराठी भाषेंतील दोन उत्तम पुस्तकें आहेत. "

[ मराठी भाषेची घटना, पृ. ३७६. ]

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ लें.

**विष्णु सीताराम** देव [ १८९९- ] कऱ्हाडे ब्राह्मण. राजापूर हें यांचे मूळचे ठिकाण. परंतु रोजगारानिमित्त हे बडोदे संस्थानांत गेले. प्रवेश परीक्षेंत उत्तीर्ण झाल्यावर यांनी इंग्रजी शाळाखात्यांत नोकरीं धरिली. अखेरपर्यंत हे बडोदें येथें याच जागेवर असत. यांनीं बंगाली कादंबरीच्या आधारें 'विषवृक्ष' या नांवाची एक सुंदर कादंबरी लिहिली आहे व कांहीं कविता व बरींचशी पदें केलीं आहेत. यांची भाषा प्रौढ व सुरस असून, यांच्या कवितेंत प्रसाद चांगला उतरला आहे.

[ सी. बा. पेंडसेकृत रसतरंगिणी ]

**मल्हार खंडेराव चिटणीस** [ १८६०-१९०८ ] चांद्रसेनीय कायस्थ प्रभु. हे लहानपणापासून अभ्यासांत फार हुशार असत. बी. ए. झाल्यावर यांनी कांहीं दिवस नोकरी केली. पण पुढें एल्. एल्. बी. ची परीक्षा देऊन कांहीं दिवस साताऱ्यास व पुढें उमरावतीस वकीली करूं लागले. हे मोठे विद्वान व बहुश्रुत होते. यांचा विद्याव्यासंग दांडगा होता. स्वभावानें विनोदी व मनमिळाऊ असून वर्तन शुद्ध व उदाहरणीय होते. हे नामांकित लेखक व कवि होते. यांचा 'अंतरिक्षांतील चमत्कार' हा ग्रंथ सुंदर आहे. यांच्या 'नवकुसुममाला' वगैरे कविता आहेत.

[ मनोरंजन, दिवाळी अंक सन १९१० ]

**वासुदेव बाळकृष्ण केळकर** [ १८६०–१८९५ ] कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म पूणें येथें झाला. हे एलफिन्स्टन कॉलेजांतून बी. ए. झाले. सन १८८२ सालीं कोल्हापूर प्रकरणामुळें न्यू इंग्लिश स्कूलच्या मंडळीवर मोठा प्रसंग गुदरला. त्या वेळीं त्यांनां मदत करण्याकरितां हे मोठ्या आनंदानें व उत्साहानें पुढे झाले व लवकरच त्यांच्याबरोबर देशकार्य करण्याचा निश्चय करून न्यू इंग्लिश स्कूलचे लाईफ मेंबर झाले हे उत्कृष्ट शिक्षक व पहिल्या प्रतीचे लेखक होते. इंग्रजी काव्यें व कादंबऱ्या शिकविण्यामध्यें यांची बरोबरी कोणीही करूं शकला नसता. केसरी व मराठा या दोन्ही पत्रांचे हे एकेवेळीं मुख्य संपादक होते. नाट्यकथार्णवांत यांनीं पुष्कळ लेख लिहिले आहेत. हे इंग्लिश ओपीनियन ऑन इंडिया ' नांवाचे एक नियतकालिकही कांहीं दिवस चालवीत असत. शाहूनगरवासी नाटक मंडळीच्या हृदयंगम अभिनयाचें श्रेय ह्यांनाच दिलें पाहिजे. जोपर्यंत त्राटिका नाटकाचे प्रयोग महाराष्ट्र रंगभूमींवर होत रहातील, तोपर्यंत यांचें नांव महाराष्ट्र केव्हांही विसरणार नाहीं.

[ मनोरंजन, दिवाळी अंक सन १९१० ]

" केळकर यांचे त्राटिका हें नाटक फार उत्तम झालें आहे. केळकर यांना नाटकें लिहिण्याची हातोटी फार चांगली साधली होती. यांच्या हातून नाट्यवाङ्मयाचे काम पुष्कळसें झाले नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट आहे. " [ मराठी भाषेची घटना पृ. ३१३

**विद्याधर वामन भिडे** [ १८६० ] कोंकणस्थ ब्राह्मण. मुंबई युनिव्हरसिटीची बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर यांनी सरकारी शाळाखात्यांत नोकरी धरली व अद्यापि ते याच खात्यांत काम करीत आहेत. यांनी गद्य व पद्य अशी विपुल ग्रंथ-रचना केली आहे. याचे 'मराठी शब्दांचें उद्घाटन' ( १९०९ ), 'मराठी भाषेचे वाक् प्रचार व म्हणी' (१९१०) 'निबंधलेखन व अनुवाद' (१९१०) इत्यादि गद्य आणि 'काव्यकुसुमांजलि' (१९०८) 'जीवजागृति' (१९१३) व 'राघवियपरिवाह' इत्यादि पद्य ग्रंथ प्रसिद्ध आहेत. याशिवाय 'केंजळगडचा कबजा, गुणवंत-गडाचा गडकरी' इत्यादि ऐतिहासिक कादंबऱ्या यांनी अगदी अलीकडे लिहिल्या आहेत. यांची भाषा प्रौढ परंतु अत्यंत संस्कृत-प्रचुर असून स्थळविशेषीं क्लिष्टही आहे. यांची कविता चांगली बोधपर व क्वचित् विनोदीही आहे.

[ सी. वा. पेंडसेकृत रसतरंगिणींतील मजकुराची वाढ करुन ]

**चिंतामण विनायक वैद्य** [१८६१ ]पुराणेतिहास संशोधक* कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म कल्याण येथें झाला. प्राथमिक शिक्षण कल्याण येथें व कॉलेजांमधील शिक्षण मुंबईस एलफिन्स्टन हायस्कूल व एलफिन्स्टन कॉलेजांत झालें. सन १८८४ त एल.

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण वर्ष १ लें.

एल. बी. झाल्यावर हे कांहीं दिवस कोल्हापूर व नंतर ग्वाल्हेर येथें सन १८८७ पासून सन १९०९ पर्यंत जज होते.

यांचा लेखनव्यवसाय दांडगा आहे व संस्कृत, प्राकृत, मराठी हिंदी, ऊर्दू, ह्या भाषांचा त्यांनी चांगला व्यासंग केला आहे. अगदीं आरंभी यांनीं 'माझा प्रवास' या नांवानें स. १८५७ सालच्या बंडाच्या धामधूमींत सांपडलेल्या वसई येथील एका भट-जीचा वृत्तांत दिलेलें पुस्तक प्रसिद्ध केलें. 'दुर्दैवी रंगू' ही यांची पानपत प्रकरणावर लिहिलेली ऐतिहासिक कादंबरी प्रसिद्ध व लोकप्रिय आहे. 'श्रीरामचरित्र' व 'श्रीकृष्ण चरित्र' हीं त्यांचीं पुस्तकें सर्वांस परिचित आहेत. यांच्या इतका महाभारतावरील व्यासंग महाराष्ट्रांत क्वचित्‌च कोणाचा असेल, असें यांच्या 'महा-भारताचा उपसंहार' या ग्रंथावरून वाटते. 'मध्ययुगीन भारताचीं तीन पुस्तकें ह्यांनी प्रसिद्ध केली आहेत व हीं पुस्तकेंही यांच्या संशोधनकार्याची उत्कृष्ट निदर्शक आहेत. 'संस्कृत वाङ्मयाचा त्रोटक इतिहास' या नांवाचेंही एक पुस्तक यांनीं लिहिलें आहे, त्यांचीं इंग्रजींतील 'रिडल ऑफ रामायण' वगैरे पुस्तकेंही त्यांच्या मराठी पुस्तकां इतकींच प्रसिद्ध आहेत. यांनी पुष्कळच लिहिलें आहे, व जें लिहिलें आहे तें मार्मिक, विद्वत्ताप्रचुर व सुंदर भाषेंत ग्रथिलें आहे. जुने विद्वान, मार्मिक संशोधक, निरलस व अखंड साहित्यसेवक या नात्यानें आज महाराष्ट्रांत यांची योग्यता मोठी आहे.

**रेव्ह. नारायण वामन टिळक** [१८६२–१९१९] महाराष्ट्रीय ख्रिश्चन. प. लो. कृष्णशास्त्री चिपळूणकर, कृष्णशास्त्री राजवाडे, बजाबा रामचंद्र प्रधान इत्यादि कवींच्या पश्चात् महाराष्ट्रांत जो एक अर्वाचीन कवींचा सांप्रदाय निर्माण झाला त्याचे अध्वर्यु रे. टिळक हे होते. रे. टिळकांचा कविता करण्याचा व्यासंग जवळ जवळ तीस चाळीस वर्षांचा होता. सन १८८९ सालीं सुप्रसिद्ध आंग्लकवि गोल्डस्मिथ याच्या 'डेझर्टेड व्हिलेज' नामक प्रसिद्ध काव्याचें मराठी कविताबद्ध भाषांतर करून तें यांनीं 'माझा ओसाड पडलेला गांव' या नावांने प्रसिद्ध केलें. तेव्हांपासून तो मरणकालपर्यंत त्यांनी अनेक काव्यें लिहिली; व तीं सर्व विद्वन्मान्य अशीं ठरून गेलीं आहेत रे. टिळकांच्या कवितेचा मोठा गुण ह्मटला ह्मणजे साधी भाषा व प्रसाद हे होत यांनी क्वचित् प्रसंगी चिन्तनपर काव्येंही लिहिली आहेत. परंतु तीं फार थोडीं आहेत. मराठी भाषेमध्यें वीणाकाव्यें रचण्याचा जो प्रघात पडला आहे त्याचा मान रे. टिळकांसच दिला पाहिजे. साधा विषय घेऊन त्या विषयाचें विवेचन तत्वज्ञानापर्यंत नेऊन पोहोंचविण्याची हातोटी जर कोणाला साधली असेल तर ती रे. टिळकांनाच होय. सृष्टीचें वर्णन करण्याची तर त्यांची हातोटी असामान्य होती. त्यांना 'फूल' हा विषय अत्यंत प्रिय असून त्यावर त्यांनी अनेक काव्यें रचिलीं असून 'वनवासी फूल' नामक

जें काव्य त्यांनी रचिलें, तें खरोखरीच महाराष्ट्रवाङ्मयांत चिरकालिक असें टिकणारें आहे. प्रेमविषयक उदात्त कल्पनासुद्धां त्यांच्या काव्यात उत्तम तऱ्हेनें दृष्टोत्पत्तीस येतात.

रे. टिळक नुसते कवि होते असें नसून, ते नाट्यशास्त्रज्ञ, अनेक भाषाकोविद व अनेक धर्मशास्त्रज्ञ होते. इ. स. १९१७ साली मुंबईस झालेल्या नाट्यसंमेलनाचे ते अध्यक्ष होते ते स्वतः जरी ख्रिस्तधर्मानुयायी होते, तथापि ते अत्यंत उदार होते. त्यांचा स्वभाव अत्यंत प्रेमळ असे. अनेक संस्थानांस त्यांचें उत्तम प्रकारचें साहाय्य असे व ज्या ज्या संस्थेंत त्यांचें अंग असे त्या त्या संस्था आज चांगल्या नांवारूपास आलेल्या आहेत. ज्ञानोदय नामक एका साप्ताहिक पत्राचें ते संपादक झाल्यापासुन जरी त्यांच्या हातून एखादा मोठा ग्रंथ बाहेर पडला नाहीं, तरी ज्ञानोदय पत्रांतील कांहीं स्फुट कविता, अभंगांजली व कांहीं स्वतंत्र लेख जर पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले तर त्यांची योग्यता सुद्धा महाराष्ट्र वाङ्मयात उत्तम प्रकारची गणिली जाईल. रे. टिळकांनी 'ख्रिस्तायन' नामक एक महाकाव्य लिहावयास घेतले होते. परंतु तें पूर्ण होण्या पूर्वीच त्यांना इहलोक सोडावा लागला.

'सीतानंदन'

रामचंद्र विनायक टिकेकर उर्फ 'धनुर्धारी' [१८६२-१९०७] कऱ्हाडे ब्राम्हण. धनुर्धारी यांचे वडील जरी मोंगलाईचे

रहिवाशी बनले होते तरी खुद धनुर्धारी यांचें शिक्षण धारवाड येथें झाले, व शाळेंत असतांना यांचा अभ्यासाकडे फारसा ओढा नसला तरी भाषा आणि इतिहास हे विषय त्यांच्या अत्यंत आवडीचे होते. डिबेटिंगसोसायटी काढणें, निबंध लिहिणें इत्यादि प्रकारही त्यांना मनापासून आवडत. लेखन व्यवसाय करावा ही त्यांची तेव्हापासून महत्वाकांक्षा होती.

परंतु घरची गरीबी आणि रामभाऊ हेच सगळ्यांत वडील चिरंजीव असल्यानें शाळा सोडून लवकरच त्यांना नोकरी धरणें प्राप्त झालें. ती कायमची टिकून रहाती व त्यांना आपल्या नोकरीचा राजीनामा लवकरच द्यावा लागला नसता तर रामभाऊ महाराष्ट्र-वाङ्मयक्षितिजावर ' धनुर्धारी ' या नावानें चमकलेही नसते !

' धनुर्धारी ' हें नांव धारण करण्यापूर्वी त्यांनी ' किरात ' व आणखी इतर टोपण नांवाखालीं लेख वगैरे लिहिलेले आहेत. केसरी वर्तमानपत्रांतून प्रथम ' धनुर्धारी ' या नावानें लिहिण्यास सुरुवात केली व धनुर्धारीच्या लेखणीचा जेव्हां जास्त बोलबाला होऊं लागला तेव्हां मात्र धनुर्धारी या नांवानेंच ते प्रसिद्धीस आले आणि या एकाच नांवाखालीं त्यांनी लेखणी चालविली.

धनुर्धारी यांचे लिहिणें सर्व विषयावर असे. परिस्थितीच्या अनुरोधानें त्यांचे वाग्बाण जरूर त्या विषयांवर सुटत. वर्तमान-

पत्रांतील त्यांचे असे लेख सोडून दिले तरी सुद्धां ही गोष्ट प्रत्ययास येण्यासारखी आहे 'वाईकर भटजी' 'पिराजी पाटील,' 'पश्चात्ताप्यांचा पांजरपोळ,' 'मृतांची मुलाखात' इत्यादि सामाजिक कादंबऱ्या त्यांनी लिहिल्या. 'महाराष्ट्रकुटुंब संग्राह्यपुस्तकावली' ही ग्रंथमाला त्यांनी सुरू करून तींत सुमारें १९ पुस्तकें त्यांनी लिहिलीं असून, तीं सर्व ऐतिहासिक विषयांवर लिहिलेलीं आहेत. स्वधर्मज्ञानप्रसारक पुस्तकमाला या धार्मिक पुस्तकमालेचा मिशनऱ्या प्रमाणें प्रसार करण्याच्या इराद्यानें पुस्तकांची किंमत केवळ १ पैसा ठेवून हें कार्य त्यांनी चालू केलें होते. 'मरेन पण बाटून ख्रिस्ती होणार नाहीं,' 'नागपंचमी' 'बाटुन व्यर्थ फसलो, सुखाला आंचवलो, माणुसकीला मुकलो!' इत्यादि त्यांचीं पुस्तकें या मालेतील होत. 'लहान मुलांचें पुस्तकालय' ही माला केवळ अल्पवयी विद्यार्थी करितां त्यांनी लिहिली असून 'नीतिपाठ,' 'अभ्यास,' 'स्वभाव,' 'आजोबानें नातवास सांगितलेल्या गोष्टी इत्यादि पुस्तकें यांत आहेत. 'शेत—शेतकी आणि शेतकरी' या नावाचें पाक्षिक वर्तमानपत्र मराठी व कानडी या भाषेंत सुरू करून याही विषयांत त्यांनी आपली पारंगतता दाखविली होती. 'व्यापार उदीम' या नांवाचें व्यापार विषयक मासिकही त्यांनी सुरू केलेंच होतें. 'व्यापारी वाचनपाठ' या नांवाचीं एक दोन पुस्तकेंही त्यांनीं लिहिलीं आहेत. 'हिन्दुस्थानचा व्यापारी भूगोल, हे बडोद्याच्या श्री सयाजी ज्ञानमंजूषा पुस्तक मालेपैकी अत्यंत उपयुक्त माहितीनें

भरलेलें पुस्तक धनुर्धारी यांनी लिहिलें. या पुस्तकास बडोदे सरकारानें ७०० रुपयांचे बक्षीस दिलें होतें. इंदूर प्रकरणीं 'इंदूर सरकारची दुसरी व खरी बाजू' हें पुस्तक लिहून त्यांनी या संस्थानची केलेली कामगिरी प्रसिद्धच आहे. स्त्रियांसाठीं 'कुलवधूंचा ज्ञानकोश' हें पुस्तक त्यांनी लिहिलें. 'आमचीं गळिताचीं धान्ये,' 'गुप्ते यांचें चरित्र,' 'तंट्या भिल्ल याचें चरित्र,' 'मराठ्यांचा मोडीपत्रबद्ध इतिहास' 'पैसा कसा मिळेल?' 'उपाशी महाराष्ट्रास उद्योग' इत्यादि बरींच पुस्तकें त्यांनी लिहून छापविलीं. सारांश, 'धनुर्धारी' हे सर्वांगीण लेखक होते. धनुर्धारींची भाषा इडियामेटिक व तसेंच अभिमानोत्तेजक आणि आपलेपणा उत्पन्न करणारी आहे, असा सरकारी शेरा आहे. मराठी भाषेवर आपलेपणाचा शिक्का मारून ठेवण्या इतकी स्वतंत्र, तेजस्वी आणि वळणदार भाषा धनुर्धारींचे लेखणींतून जशी दिसून येते तशी इतरत्र क्वचित्च आढळून येते.

[ वाईकर भटजींस जोडलेल्या चरित्राधारें ]

**एकनाथ गणेश भांडारे** [ १८६२ ] देशस्थ ब्राह्मण. ह्यांचा जन्म जुन्नर तालुक्यांतील उंब्रज गावीं झाला. ह्यांचे वडील हे चार वर्षांचे असतांच निवर्तले. सबब ह्यांचे मराठी शिक्षण आणि मॅट्रिकपर्यंतचें इंग्रजी शिक्षण अनुक्रमें पिंपळवंडी व जबलपूर येथें झालें. यांस कविता करण्याचा नाद अगदीं तरुण वयांतच लागला, व

रेल्वेची खडतर नोकरी संभाळून ह्यांनी लहानमोठीं मिळून दहा बारा काव्यें केलीं आहेत. किरकोळ पद्येंही बरीच आहेत. त्या पैकीं कित्येक काव्यरत्नावलींतून, महाराष्ट्रकोकिळांतून, राष्ट्रभक्तांतून आणि कित्येक स्वतंत्र रितीनें प्रसिद्ध झालीं आहेत. ह्यांची कविता साधी पण रसाळ असते.

[ चं. शि. गोऱ्हेकृत अर्वाचीन कविता ]

**शिवराम महादेव परांजपे** [ १८६४ ] वक्रोक्ति कुशलवक्ता * कोंकणस्थ ब्राह्मण. यांचें मूळगांव कुलाबा जिल्ह्यांतील महाड हें होय. प्राथमिक शिक्षण महाडास व इंग्रजी पांच इयत्तांपर्यंतचें शिक्षण रत्नागिरी येथें झालें. स. १८८० त हे पुण्यास आले व सन १८८४ त न्यू इंग्लिश स्कूलमधून मॅट्रिक झाले सन १८९० त हे डेक्कन कॉलेजांतून बी. ए. व लगेच २ वर्षांनीं ह्मणजे सन १८९२ एम. ए. झाले.

यानंतर ' भावेस्कूल ' च्या मंडळीनीं काढलेल्या महाराष्ट्र कॉलेजांत ते सुमारे दोन वर्षे प्रोफेसर होते. तें कॉलेज बंद पडल्यावर स. १८९८ त त्यांनीं प्रासिद्ध ' काळ ' पत्र सुरू केलें. हें वर्तमानपत्र १० वर्षे पर्यंत चालले होते. पण स. १९०८ सालीं

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्यापुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ लें.

यांच्यावर आक्षेपार्ह लेखांबद्दल खटला होऊन त्यांस शिक्षा झाल्या-मुळें ' काळ ' पत्र बंद पडलें. यानंतर बऱ्याच दिवसांनीं यांनीं ' स्वराज्य ' पत्र काढलें व तें सुमारें पांच वर्षे चालविलें.

यांनीं विविध विषयावर ग्रंथरचना केली आहे व यांचें मराठी भाषेवरील प्रभुत्व, वक्तृत्व, उपरोधिक भाषाशैली इत्यादि बाबतींत ह्यांचा हात धरणारा कोणी नाहींच ह्मटलें तरी चालेल. ' काळ ' व ' स्वराज्य ' या पत्रांतलि निवडक निबंधाखेरीज कादंबरी, मॅक्बेथ, रामदेवराव व भीमराव इत्यादि नाटकें, गोविंदाची गोष्ट विंध्याचल, इत्यादि कादंबऱ्या व तर्कसंग्रह, तर्कभाषा इत्यादि अन्य ग्रंथ प्रसिद्ध आहेत. हे चांगले कविही आहेत; पण यांच्या कविता फारशा प्रसिद्ध नाहींत.

[ मो. स. मोनेकृत मराठी भाषेचे व्याकरणकार या पुस्तकांतील माहितीच्या आधारें ]

**बिश्वनाथ काशिनाथ राजवाडे [ १८६४–१९२१ ]** कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म कोंकणांत वरसई येथें झाला. हे पुण्याच्या डेक्कन कॉलेजांतून सन १८९७ सालीं बी. ए. झाले. कॉलेजांत असतानाच त्यांच्या मनांत स्वदेशाच्या उध्वस्त इतिहासाचा उद्धार करण्याची स्फूर्ति उत्पन्न झाली व कार्याला अवश्य असलेले बौद्धिक व शारीरिक सामर्थ्यही त्यांनीं कॉलेजांतच

कमाविलें. कॉलेजच्या लायब्ररींतील बहुतेक ग्रंथांचे त्यांनीं परिशी-लन केलें आणि फारशी व फ्रेंच या भाषांचीही यांनीं ओळख करून घेतली. कॉलेजांतून बाहेर पडल्यावर पांच वर्षांनी त्यांनीं भाषांतर (१८९४) हे मासिक काढलें. परंतु पुढें ज्या ' विठ्ठल ' छापखान्यांत हे मासिक छापिलें जात होतें, त्याला आग लागून तो जळल्यामुळें त्यांत राजवाड्यांची सर्व प्रकाशिक-अप्रकाशित-ग्रंथसंपत्ति भस्मसात् झाली ? याच सुमारास त्यांची पत्नी वारल्या-कारणानें संसाराचाही पाश तुटून, महाराष्ट्राच्या इतिहासाच्या, उद्धारकार्याला त्यांनीं संन्यस्तवृत्तीनें स्वतःला वाहून घेतलें.

सन १८९८ पासून सन १९२६ पर्यंतच्या तीस वर्षांच्या कालांत त्यांनीं मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचे बावीस खंड व ' सुबंतविचार ' ( श. १८३४ ), ' संस्कृत भाषेचा उलगडा, ( श. १८४२ ) अनेक ग्रंथ प्रसिद्ध केले.

महाराष्ट्र व मराठी भाषा यांच्याविषयीं त्यांना अतोनात अभि-मान होता; व विद्यार्थीदशेपासूनच त्यांच्या अभ्युदयार्थ त्यांनीं आपल्या आयुष्याचा प्रत्येक क्षण अत्यंत निःस्वार्थ बुद्धीनें आम-रण खर्च केला. इंग्रजी भाषेंतून जर त्यांनीं आपले संशोधनात्मक ग्रंथ लिहिले असते, तर भांडारकर-टिळकाप्रमाणें त्यांचाही लौकिक जगांतील विद्वन्मंडळांत खात्रीनें झाला असता. पण राजवाड्यांचा मराठी भाषेविषयींचा अभिमान इतका उत्कट आणि उद्दाम होता

कीं, कीर्तीची यत्किंचितही चाड न बाळगितां, त्यांनीं आपला प्रत्येक ग्रंथ मराठी भाषेंतच लिहिला. आणि या अभिमानाच्या ऊर्मींत भांडारकर-टिळकांनीं आपले शोध इंग्रजी भाषेंत ग्रथित करून मायभाषेची वंचना केली, असेंही ह्मणावयाला ते चुकले नाहींत !

इतिहास संशोधनाच्या कार्याला संघटित स्वरूप देण्याच्या उद्देशानें त्यांनीं शके १८३२ सालीं पुण्यास 'भारत इतिहास संशोधक मडंळ' स्थापन केलें. तेव्हांपासुन शके १८३९ पर्यंत त्यांनीं मंडळापुढें अनेक विषयावर उत्कृष्ट निबंध वाचले. पण मंडळाच्या कार्याला व्यवस्थित स्वरूप येऊन, त्याचा व्याप वाढावयाला लागतांच त्याच्याही ममत्वाचा पाश राजवाड्यांनीं तोडला ! अलीकडे भाषाशास्त्राच्या दृष्टीनें मराठीं धातूंचें परीक्षण करून, वेदकालापर्यंत मराठी भाषेचे धागे जाऊन पोहोंचतात हें सिद्ध करण्याच्या उद्योगांत ते गुंतले होते; व जवळ जवळ ३० हजार मराठी धातूंची व्युत्पत्तीही त्यांनी लाविली होती ! परंतु हें प्रचंड कार्य हातावेगळे होण्यापूर्वीच राजवाड्यांचा अकस्मात् अंत झाला. आपल्या आयुष्याचीं सतत ३० वर्षे ऋषींचें ऋण फेडण्यांत खर्च करून महाराष्ट्राच्या विच्छिन्न इतिहासाचें पुनरुज्जीवन झालेलेंही राजवाड्यांनी आपल्या डोळ्यांनी पाहिलें. महाराष्ट्राला आपल्या पूर्वजांविषयीं वाटावी तितकी कृतज्ञता वाटत नाहीं, असे उद्गार त्यांनी आपल्या एका

लेखांत तळमळून काढिले आहेत. पण महाराष्ट्र किती कृतज्ञ आहे, हें सिद्ध करावयला खुद्द त्यांचे स्वतःचेंच चरित्र पुरे आहे!

[ मृत्युलेख, महाराष्ट्र ता. ९-१-१९२७ ]

**हरि नारायण आपटे** [ १८६४-१९१९ ] कोंकणस्थ ब्राम्हण. बुद्धिमान् कादंबरीकार, * यांचा जन्म वऱ्हांडात त्यांचा आजोळीं झाला. हरिभाऊंचे वडील नारायण चिमणाजी हे घरगुती अडचणीमुळें तरुणपणींच नोकरींत शिरले. व लवकरच चांगल्या हुद्याच्या जागेवर चढले. हरिभाऊंचे चुलते महादेव चिमणाजी यांचें नांव एक नामांकित वकील म्हणून सुप्रसिद्ध आहे. हरिभाऊंना चवथें वर्ष लागतें न लागतें तोंच त्यांच्या मातुश्री इहलोक सोडून गेल्यामुळें त्यांचा सांभाळ कांहीं दिवस त्यांच्या चुलत्या-चुलतीनें केला. परंतु पुढें त्यांची चुलतीही मरण पावल्यामुळें ते फिरून आपल्या वडिलाकडे पुण्यास आले. हरिभाऊ पुण्यास आले तेव्हां त्यांचें वय १४ वर्षांचें होतें. पुण्यास आल्यावर ते हाइस्कूल-मध्यें इंग्रजी ४ था इयत्तेंत शिकूं लागले. याच वेळेला हरिभाऊंची लेखनप्रवृत्ति हळूहळूं वाढत जाऊन, ती किरकोळ कवनें व लेख या स्वरूपांत प्रगट होऊं लागली. घरांतील किरकोळ प्रसंगावर कविता कराव्या, भांडणांची वगैरे हकीकत लिहावी, इंग्रजी कवितें-

---

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची भोजदाद, लोकशिक्षण, वर्ष १ लें

तील बारीक चुटक्यांचें कविताबद्ध भाषांतर करावे हा त्यांचा क्रम वृद्धिंगतच होत चालला. पुढें जीं आपल्या कादंबऱ्यांत त्यांनी अनेक प्रकाराच्या स्वभावाचीं व मनोव्यापाराचीं मनोज्ञ चित्रें रेखाटलीं आहेत, त्या पैकी कांहीं निकडक नमूने ते या वेळीं आपल्या विर्भाव करून दाखवीत.

हरिभाऊ सन १९७८ सालीं पुण्यास आल्यानंतर सुमारें दोन तीन वर्षांनीं ' न्यू इंग्लिशस्कूल ' स्थापन झालें. या शाळेंतील अगदीं आरंभीच्या विद्यार्थ्यांपैकी ते एक होते. न्यू इंग्लिशस्कूल निघण्यापूर्वी विष्णुशास्त्री हायस्कूलमध्यें शिक्षक होते. त्या वेळीं शास्त्रीबुवांच्या निबंधमोलनें सर्व समजांत खळबळ उडवून दिली होती. अशा गृहस्थाचा हरिभाऊ सारख्या बुद्धिमान् व प्रतिभासंपन्न तरुणावर विशेषपरिणाम व्हावा व आपल्यापुढें विष्णुशास्त्र्याचा आदर्श ठेवण्याची त्यांच्या ठिकाणीं इच्छा व्हावी हें स्वभाविक होते. विचारास थोडी प्रगल्भता आल्यावर हरिभाऊ रा. सा. रानडे यांचे कट्टे अनुयायी बनले; पण आरंभी त्यांच्या मनावर जर कोणाची विशेष छाप बसली असेल तर ती विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचीच होय.

हरिभाऊंची प्रवेश परीक्षा स. १८८३ साली पास झाली व नंतर ते डेक्कन कॉलेजमध्यें शिकावयास गेले. पण परीक्षेच्या अभ्यासाचा व हरिभाऊंचा बारावा बृहस्पति केव्हांच पालटला नाहीं.

कालेजांत त्यांचा बहुतेक वेळ अवांतर पुस्तकें वाचण्यांत गेला आणि अखेर परीक्षेचा निकाल व्हावयाचा तोच होऊन, ते दुसऱ्या वर्षी फर्ग्युसन कॉलेजांत पी. ई. च्या वर्गांत गेले. पण या वर्षींही त्यांचा परीक्षा पास होण्याचा नन्ना चुकला नाहीं व ते याच्या पुढच्या वर्षीं म्हणजे सन १८८६ सालीं पुनरपी डेक्कन कॉलेजांत गेले. प्रो. भानु, प्रो. विजापूरकर, ना. म. समर्थ वगैरे मंडळीं याच वेळीं या कालेजांत शिकत होती. याच वर्षीं या कालेजांत रीडिंगरूम व लायब्ररी स्थापन झाली होती, व या लायब्ररींतील कित्येक पुस्तकें त्यांनी एका वर्षांत वाचली, पण इंग्लिश व संस्कृत या शिवाय बाकींच्या विषयांचें त्यांना दर्शन न घडल्यामुळें येथेही परीक्षेचा निकाल जो व्हावयाचा तोच झाला या खेपेसही ते नापास झाले. याचें कारण त्यांचे गणित विषयाकडे पहिल्यापासूनच दुर्लक्ष होतें हें होय. हरिभाऊंना ' तुम्ही गणित कां करीत नाहीं. ? ' असा कोणी प्रश्न केला असतां ' गणित विषयांत अगणित अडचणी आहेत. ' असें ते विनोदानें म्हणत व या पुढें परीक्षेचा नादही त्यांनीं सोडून दिला.

हरिभाऊंनीं एल्. एल्. बी. व्हावे, निदान वकीलीची परीक्षा तरी द्यावी अशी त्यांच्या चुलत्याची व इतर आप्तेष्टांची फार इच्छा होती. परंतु जें कधींच घडावयाचें नव्हतें तें कसें घडून येणार ? आण्णासाहेबांच्या इच्छे प्रमाणें त्यांना एल् एल्. बी.

होता आले नाहीं व वकीलही होतां आले नाहीं. पण पुढें त्यांनी जी समाजाची वकीली करून त्यांत स्थित्यंतर घडवून आणण्याचा यशस्वी प्रयत्न केला तो पाहतां ते केवळ पैशाकरितां भाडोत्री वकील झाले नाहीत, हें सुदैवच समजलें पाहिजे.

वकिली नाहीं तर नाहीं, पण मुलाला कांहीं धंदा लावून द्यावा या हेतूनें आण्णासाहेबांनी हरिभाऊंना मुंबईस नेलें व तेथें जगदीश्वर छापखान्यांत छापखान्याचें काम शिकावयास ठेविलें. पण शिकणें म्हटलें म्हणजे त्याला कांहीं तरी नियंत्रण व शिस्त लागते. त्यांचें हरिभाऊंच्या ठिकाणीं असावें तितकें वास्तव्य नसल्यामुळें, त्यांच्या पूर्वपरंपरे प्रमाणेंच ते या छापखान्याचे परीक्षेंतही नापास झाले ! जगदीश्वर छापखान्यांतील शिक्षणाचा अशा तऱ्हेनें निकाल लागल्यानंतर त्यांच्या चुलत्यांनी हरिभाऊंस एक पुस्तक-प्रकाशनाची एजन्सी काढण्यास सांगितलें. पण हरिभाऊंनी ‘ माझ्याच्यानें तें काम होणार नाहीं व त्यांत नड येईल ’ असें स्पष्ट सांगितलें.

हरिभाऊंना परीक्षेच्या कामांत यश आलें नाहीं. तरी पण त्यांचा विद्याव्यासंग अखंडित रीतीनें चालल्यामुळें युनिव्हर्सिटीच्या पदवीची उणीव त्यांना केंव्हाही भासली नाहीं किंबहुना सतत परिशीलनानें त्यांना एवढा अधिकार आला होता कीं, युनिव्ह-

सिटीनें आपल्या अभ्यासप्रणालींतील अत्युच्च परीक्षेला त्यांना सतत दहा वर्षें परीक्षक नेमून त्यांच्याबद्दल आपला आदर व्यक्त केला. विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चररशिपची जी जागा प्रायः पदवीधरांच्या वाट्याला यावयाची तीही हरिभाऊंना सन १९१९ मध्यें मिळाली होती. हरिभाऊ वस्तुतः आजन्म विद्यार्थी होते. इतकेंच नव्हें तर विद्येचे मर्म संशोधन करणारे होते. त्यांची बुद्धि अष्टपैलू होती. त्यांच्या जवळील ग्रंथसंग्रह विविध प्रकारचा असे. कोणतेंही वाचनीय नवीन पुस्तक निघो, ते हरिभाऊंनी खरेदी करावयाचेंच. नवीन पुस्तकें कोणतीं झालीं हें साधारणतः त्यांना माहीत असे इतकेंच नव्हें, तर त्यांतील मुद्याचा भागहीं त्यांना अवगत असे.

हरिभाऊंच्या हातून जे सर्व प्रयत्न वीशी एकविशाच्याी आंत झाले त्यांत सर्वांत श्रेष्ठ व त्यांच्या अकालपरिपक्वतेची स्पष्ट जाणीव करून देणारा त्यांचा प्रयत्न म्हटला म्हणजे तो त्यांची ' मधली-स्थिति ' ( १८८५ ) ही कादंबरी होय. सुविख्यात आंग्ल कादंबरीकार रेनाल्डस याची ' ओल्डलंडन ' या नांवाची एक कादंबरी आहे. तिलाच मराठी पेहराव चढवून ती महाराष्ट्र वाचकां-पुढें ठेवावी असा त्यांचा प्रथम मनोदय होता. पण परक्याच्या कल्पनाशक्तीवर चरितार्थ चालविणें भूषणावह नाहीं असें वाटून कीं काय, हरिभाऊंनी तो नाद सोडून दिला व या पुस्तकाच्या

दुसऱ्याच प्रकरणापासून स्वतंत्र रीतीनें ग्रंथरचना करण्यास त्यांनी सुरुवात केली व त्यांत त्यांना अपूर्व यश आलें. ग्रंथाची कांहीं प्रकरणें तयार झाल्यावर त्यांनी तीं आपल्या कांहीं मित्रांना दाखविलीं. तीं पाहून त्यांचे स्नेही चकित होऊन गेले. मराठी भाषेंतील एक नवीन पण, मनोज्ञ मन्वंतराचा हा पायाच होय असें त्यांना वाटलें. पण हें पुस्तक छापून कसें निघावें ही विवंचना सर्वांपुढें येऊन उभी राहिली. शेवटीं त्यांच्या एका मित्रानें पुणेंवैभवाचे मालक प. वा. शंकरराव केळकर यांना त्याबद्दल विचारिलें. रा. केळकर हे जुन्या मताचे कट्टे अभिमानी होते. व या पुस्तकाचा प्रतिपाद्य विषय सुधारकीमताचा आहे हें समजूनही त्यांनी तें पुणेवैभवांत क्रमशः छापण्याचें कबूल केलें, ही एकच गोष्ट हरिभाऊंच्या रचनासौष्ठवाची साक्ष पटविते.

आपल्या हातून नियमित रीतीनें काम होऊन आपला लेखन व्यवसाय अव्याहत चालावा, व यासाठीं आपलें एक वर्तमानपत्र असणें जरूर आहे, असें वयाच्या पंचवीशीनंतर हरिभाऊंना वाटूं लागलें व सन १८९० अखेर त्यांनी 'करमणूक' पत्र सुरू केलें. 'करमणूक' सुरू होतांच त्यावर वाचकांच्या उड्या पडूं लागल्या व त्यांत प्रसिद्ध होणाऱ्या गोष्टी, चुटके व कादंबऱ्या यांनी महाराष्ट्रांतील स्त्रीपुरुष वाचकांना चटका लावून सोडला. आणि रिकाम्या वेळेंत 'करमणूक' ती खरोखरीच करमणूक होऊन बुद्धि वर्ध-

सोचही ती साधन झाली. ' करमणूक ' पत्रानें वाचनाकडे ज्यांची प्रवृति झाली अशा शेंकडो स्त्रिया महाराष्ट्रांत सांपडतील. शेंकडो शाळांनी जें कार्य कदाचित् झालें नसतें तें करमणुकीनें वर्षानुवर्ष बिनबोभाट कसें केलें हें सर्वविश्रुत आहे.

हरिभाऊंच्या आयुष्याच्या शेंवटच्या तीस वर्षाचे म्हणजे करमणुकीच्या जन्मपासून तों अखेरपर्यंतच्या काळाचे दहा दहा वर्षाचे असे तीन विभाग पाडले तर त्या प्रत्येक भागांत त्यांनी पुढील प्रमाणें ग्रंथरचना केलेली आढळते.

सन १८९० ते सन १९००

| | | |
|---|---|---|
| ' पण लक्षांत कोण घेतो ! ' | ( सामाजिक ) | १८९०–९३ |
| 'सगुणाबाईची व गोविंदरावाचीं पत्रें' | ,, | १८९१–९४ |
| ' यशवंतराव खरे ' | ,, | १८९२–९५ |
| ' मी ' | ,, | १८९३–९५ |
| ' जग हें असें आहे ' | ,, | १८९७–९९ |
| ' काळ तर मोठा कठिण आला ' | ,, | १८९९ |
| ' म्हैसूरचा वाघ ' ( अपूर्ण ) | (ऐतिहासिक) | १८९०–९१ |
| ' उष : काल ' | ,, | १८९५–९७ |
| ' केवळ स्वराज्यासाठी ' | ,, | १८९८–९९ |

सन १९०० ते सन १९१०

| | | |
|---|---|---|
| ' भयंकर दिव्य ' | ( सामाजिक ) | १९०१–१९०४ |

| | | |
|---|---|---|
| ' आजच ' ( अपूर्ण ) | ,, | १९०४–१९०६ |
| ' रूपनगरची राजकन्या ' | ( ऐतिहासिक ) | १९००–१९०१ |
| ' चंद्रगुप्त ' | ,, | १९०२–१९०४ |
| ' गडआला पण सिंह गेला | ,, | १९०३ |
| ' सूर्योदय ' | ,, | १९०५–१९०६ |
| ' मध्यान्ह ' ( अपूर्ण ) | ,, | १९०६–१९०८ |
| ' सूर्यग्रहण ( अपूर्ण ) | ,, | १९०८–१९०९ |

सन १९१० ते सन १९१९

| | | |
|---|---|---|
| ' मायेचा बाजार ' | ( सामाजिक ) | १९१०–१९१२ |
| ' कर्मयोग ' ( अपूर्ण ) | ,, | १९१३–१९१७ |
| ' कालकूट ' ( अपूर्ण ) | ( ऐतिहासिक ) | १९०९–१९११ |
| ' वज्राघात ' | | १९१३–१९१५ |

हरिभाऊंच्या लेखन व्यवसायाच्या प्रारंभीचा काल ह्मणजे आज पन्नास वर्षांपूर्वीचा काल होय. हा एका दृष्टीनें विशेष नाजुक होता. इंग्रजी राज्याच्या वैभवानें आपल्या लोकांच्या डोळ्यावर आलेलें झांपड अद्यापि अवशिष्ठ होतें, व लोकांमधील आत्मविश्वास नष्ट झाला होता. तो उत्पन्न करण्यास निरनिराळ्या प्रकारांनीं पात्र असलेले जे अनेक पुरुष या वेळीं झाले त्यांत हरिभाऊंची गणना करणें कसें जरूर आहे, हें त्यांच्या ग्रंथांचें ज्यांनीं परिशीलन केलें आहे, त्यांना वेगळे सांगावयास नको.

लोकांमध्यें आत्मविश्वास उत्पन्न करण्यास त्यांना त्यांच्या पूर्ववैभवाचें स्मरण करून द्यावें लागतें. त्याच प्रमाणें ज्या अवगुणामुळें व सामाजिक दुष्ट चालीरीतीमुळें आपली अवनति झाली आहे, ते अवगुण व त्या चाली रीती यांचा त्याग केल्याशिवाय आपल्याला पूर्ववैभवाचें पुनरुज्जीवन करतां यावयाचें नाहीं, हें सत्य लोकांच्या मनावर ठसविण्याची जरूर असतें. हरिभाऊंच्या सामाजिक व ऐतिहासिक कादंबऱ्यांनी ह्याच महत्वाचा कार्यभाग केला, आणि तो त्यांनी लोकांना समजेल अशा सुलभ व पटेल अशा मोहक रीतीनें केल्यामुळें विशेष यशस्वी ठरला.

त्यांचा दांडगा विद्याव्यासंग, त्यांची उज्वल प्रतिभा, मोठमोठे उदात्त विचारही अगदीं सोप्या भाषेंत व्यक्त करण्याची त्यांची हतोटी या गुणत्रयामुळें त्यांची पुस्तकें इतकीं लोकप्रिय झालीं. लोकजागृति करण्याच्या इतर शाखांत एकाला दोन किंवा दोहोंला तीन अशीं थोर माणसें सांपडतील, पण हरिभाऊंनी लोकजागृतीची जी विक्षितशाखा जी अगदीं अल्प वयापासून स्वीकारली व जिची कायावाचामनेंकरून त्यांनी आजन्म जोपासना केली, त्या शाखेंत मात्र त्यांना एकही जोडीदार मिळाला नाहीं. शाखेंत ते ‘ एकमेवाद्वितीय ’ च होऊन गेले.

[बा. मा. आंबेकरकृत ह. ना. आपटे यांच्या सं. चरित्राधारें संपादक]

कृष्णाजी केशव दामले उर्फ 'केशवसुत' [ १८६६–१९०५ ] कोंकणस्थ ब्राम्हण. यांचा जन्म मालगुंड गांवीं झाला. केशवसुतांचे वडील केसो विठ्ठल दामले हे सुमारे चाळीस पन्नास वर्षांपूर्वी रत्नागिरी जिल्ह्यांत एक करारी, निस्पृह आणि विद्यार्थ्यांवर कडक शिस्त ठेवणारे शिक्षक होऊन गेले असल्याबद्दलचे लोक सांगतात. कृष्णाजी केशव हे लहानपणीं अशक्त व किरकिरे असत. दांडगाईचे खेळ त्यांना सोसत नसत व हंसण्याखिदळण्याकडे अथवा अद्वातद्वा बोलण्याकडे त्यांची बालवयांतसुद्धा प्रवृत्ति नसे. कोठें तरी एकटेच बसावे, एकटेंच फिरावें, असा थोडा एककली, मुग्ध, एकलकोंडा, आणि वरवर पहाणारांस तरी मुखदुर्बळ भासणारा स्वभाव बालपणापासून त्यांच्या अंगीं दृग्गोचर होऊं लागला होता.

केशवसुतांचें मराठी शिक्षण पूर्वीच्या पद्धतीप्रमाणें चारपांच यत्तांचें कोंकणांत त्यांच्या वडिलांच्या हाताखालीं झालें. आणि पूर्वीचा चालीप्रमाणें त्यांचा विवाहही त्यांच्या वयाच्या १४ व्या वर्षी म्हणजे सन १८८० सालीं करण्यांत आला. नंतर सन १८८२ सालीं त्यांचे सर्वांत ज्येष्ठबन्धु कै. श्रीधर केशव दामले हे ग्रॅज्युएट होऊन बडोद्यास नवीनच स्थापन झालेल्या कालेजांत गणित व संस्कृत विषयाचे अध्यापक होऊन गेले, तेव्हां त्याच्याकडे पुढच्या शिक्षणासाठीं केशवसुत बडोद्यास गेले. केशवसुतांचे दुसरे धाकटे बन्धु मोरो केशव हे देखील या वेळीं बडोद्यास

श्रीधरपंताजवळ शिक्षणासाठीं गेले होते. परंतु श्रीधरपंताची नोकरी बडोद्यास जेमतेम वर्षभर देखील झाली नाहीं तोंच त्यांच्यावर मृत्यूचा घाला आला. श्रीधरपंतांच्या मृत्युमुळें बडोदें सुटलें व नंतर हे दोघेही बन्धु पहिल्यानें वर्ध्यास आपल्या मामाकडे व तेथून नागपूर येथें गेले. परंतु नागपूरचा कडक उन्हाळा सोसेनासा झाल्यामुळें 'केशवसुत परत आले व मोरोपंत हे उमरावतीस कांहीं स्कालरशिपांच्या आधारावर विद्यार्जनासाठीं गेले. पुढें पुण्यास अभ्यास करून अखेर सन १८९०-९१ सालीं केशवसुत मॅट्रिकची परीक्षा पास झाले. पुढें द्रव्याभावामुळें पुढील शिक्षणाचा नाद त्यांनी अजीबात सोडून दिला व यापुढें तें मुंबईस एखाद्या मिशनरी शाळेंत किंवा खासगी शाळेंत १५।२० रुपांयावर मास्तरची नोकरी धरून राहूं लागले. एखादे वेळीं नोकरी सुटली तर खासगी शिकवण्या शिकवीत. अशा प्रकारें सन १८९३ पर्यंत मुंबईस दोन तीन वर्षें काढली. परंतु पुढें स. १८९६-९७ सालीं मुंबईस प्लेगची भयंकर साथ सुरू झाल्यामुळें केशवसुतांना मुंबई सोडण्याची पाळी आली. यानंतर ते सहकुटुंब खानदेशांत गेले व तिकडे ते जवळ जवळ सन १९०१ पर्यंत होते. तरी या चार पांच वर्षांत त्यांचा पगार वीस रुपायांवर जास्त वाढला नाहीं. पुढें सरकारी शाळेंत प्रवेश झाल्यावर धारवाड येथील हायस्कूलांत त्यांची नेमणूक झाली व तेथें त्यांना ३०।३५ रुपये दरमहा मिळत असे.

वयाच्या १४–१५ वर्षांपासून केशवसुतांना श्लोक व आर्या चांगल्या रचितां येत असत. कविता करण्याचा नाद त्यांना इतका होता कीं, एकदां एखादी कल्पना डोक्यामध्यें घोळत असली कीं त्या कल्पनेबरहुकूम योग्य शद्बांनीं जर थोडक्या वेळामध्यें पद्यरचना झाली नाहीं तर ते रात्रभर जागरण करून ती कवितेमध्यें उतरविण्याचा प्रयत्न करीत. त्यांना कविता शीघ्रगतीनें करतां येत नसे. परंतु एखादे वेळीं ते स्वयंस्फूर्तीने एखाद्या कल्पनेला बोलतां बोलतांना चरणबध्द करून टाकीत. मुंबई येथें मिशनऱ्यांच्या शाळेंत नोकरी करीत असतां एक विविक्षित काल असा आला होता कीं, ते मिशनऱ्यांच्या सहवासामुळें ख्रिस्ति बनण्याचा मार्गास लागतात कीं काय अशी त्यांच्या मित्रांस भीती पडली होती. त्याच सुमारास ना. वा. टिळक हे हिन्दुधर्म सोडून ख्रिस्ति झाले होंते, व टिळकांची व केशवसुतांची विशेष सलगी असल्यामुळें टिळकांप्रमाणें 'केशवसुत' हे हिन्दुधर्मास मुकतात कीं काय अशी धास्ती त्यांच्या स्नेह्यांस पडली होती. परंतु त्यांच्या कित्येक मित्रांनी त्यांना या बिकट प्रसंगी सदुपदेश करून या अविचारापासून परावृत्त केलें.

केशवसुतांच्या ह्यातींत त्याच्या कवितेविषयीं कोणाही मोठ्या माणसानें चार स्तुतिपर शब्द काढले नाहींत, म्हणून महाराष्ट्रांतील वाचक वर्गामध्यें व टीकाकारांच्या व विद्वानांच्या अंगीं खरी गुणग्राहकता नाहीं, असा त्यांचा ग्रह होत चालला होता.

फक्त त्यांचे कांहीं विशिष्ठ मित्र त्यांच्या कवित्व शक्तीची खरी योग्यता ओळखून होते. केशवसुतानी अखेर पर्यंत इतक्या कविता लिहिल्या व त्यांच्या कवितांची वाहवा होऊं लागली तरी त्यांना कविता लेखनापासून एक पै देखील मिळाली नाहीं. सांपत्तिक दृष्ट्या ते नेहमी ओढाताणीमध्यें कसे तरी दिवस काढून रहात असत. त्यांच्याहून धाकटे बन्धु कै. मोरो केशव दामलें हे पुढें साधारण चांगल्या स्थितीमध्यें असल्यामुळें ते केशवसुतांस पैशाची मदत प्रसंगवशात् करण्याला तयार असत; परंतु आपल्या-पेक्षा धाकट्या बन्धूकडून मदत घेणें केशवसुतांच्या मानी स्वभावाला कमीपणाचे वाटल्यामुळें ते आपल्या बन्धूकडून ती घेण्याचे नाकारीत. मानी स्वभावमुळें केशवसुतांना सर्व आयुष्यक्रम अशाप्रकारें कष्टामध्यें काढावा लागला. व त्यांच्या कवितेमध्यें निराशेसंबंधी जे अनेक ठिकाणीं उद्गार निघालेले आहेत ते त्यांच्या स्वानुभवाचे द्योतक होत. त्यांचा अखेरचा जो अभंग आहे त्याच्यामध्यें त्यांनी.

‘ मिकार या जगीं । इच्छित न मिळे कांहीं ॥
म्हणुनि तुझें पायीं । भिक्षांदेहि ॥ ’

अशी परमेश्वराची करुणा भाकली आहे. या अभंगानंतर त्यांनी कोणतेच कवित्वलेखन केलें नाहीं असे त्यांच्या हातच्या वहीवरून समजतें. [ सीताराम केशव दामले ]

**गोविंद गोपाळ टिपणीस** [ १८६८–१९२९ ] कायस्थ प्रभु. हे महाराष्ट्र सारस्वताचे एकनिष्ठ सेवक व एल्फिन्स्टन कॉलेजांतील मराठी भाषेचे पहिले प्रोफेसर होत. यांच्या इतका मराठी भाषेचा आस्थापूर्वक अभ्यास फारच थोड्याजणांनी केला असेल. लेखणी आणि वाणी या दोहोंवरही त्यांचें प्रभुत्व विशेष असे. अनेक उपयुक्त ग्रंथ, लेखमाला, निबंध वगैरेच्या लेखनानें त्यांनी जशी आपली कीर्ति महाराष्ट्र वाङ्मयाच्या इतिहासांत कायम करून ठेविली त्याचप्रमाणें आपल्या मधुर रसवंतीच्या मोहनीनें श्रोत्यांच्या मनोभावना पूर्ण अंकित करून घेण्याची कलाही त्यांना पूर्ण साध्य होती. हे कट्टे सुधारक होते. पुष्कळ वर्षांपूर्वी आय्. सी. एस. च्या मराठी पेपरच्या परीक्षकांपैकींहीं ते एक होते. सुप्रसिद्ध महाराष्ट्र नाटक मंडळीच्या आद्यचालकांपैकी ते एक असून उत्तम नटही होते. काहीं वर्षांपूर्वीं ज्ञानप्रकाशपत्राचे ते संपादक होते. 'महाराष्ट साहित्य' या नांवाचें मासिक कांही वर्षे ते चालवीत होते. उपयोगांतून जवळ जवळ नष्ट झालेले बखरींतील सुंदर जुने मराठी शद्ब योग्य अर्थासह भाषेंत रूढ करण्याची त्यांची फार इच्छा होती. व अतींशय परिश्रम करून सुमारे ३००–४०० शद्बही त्यांनी नवीन कोश करण्यासाठीं काढून ठेविले होते. आमरण त्यांनी मातृभाषेची सेवा केली. अंतकाळापूर्वी एक तासपर्यंत त्यांचें लेखन चालू होते. त्याचा स्वभाव अत्यंत उदार आणि मनमिळाऊ असे. [ चित्रमय जगतांतील मृत्युलेख ]

**दत्तात्रय बळवंत पारसनीस** [ १८७०-१९२७ ] यजुर्वेदी ब्राम्हण. इतिहाससंशोधक* पारसनीस हे साताराचे रहिवाशी. यांचें अध्ययन प्रवेश परीक्षेपर्यंत होऊन, अपयशामुळें त्यांना विश्वविद्यालयांत मिळणाऱ्या उच्च शिक्षणाचा लाभ मिळाला नाहीं. हे मोठे उत्साही तरुण असून आपण राष्ट्रकार्यांत पडावें अशी त्यांना हौस होती. ते राष्ट्रीयसभेच्या अधिवेशनास हजर राहूं लागले व त्यांच्या मोठमोठ्या पुढाऱ्यांशीं गांठी पडूं लागल्या. न्या. रानडे यांच्या नजरेस हे जेव्हां पडले तेव्हां त्यांनी 'तुम्हीं आपला वेळ व श्रम राजकीय कार्यांत खर्च करण्यापेक्षां इतिहास लेखणाकडे लावावा' असा सल्ला त्यांना दिला व तो त्यांना पटून त्यांनी आपणास इतिहास संशोधनासारख्या रूक्ष विषयास वाहून घेण्याचें ठरविलें. प्रथम त्यांनी मोठ्या परिश्रमानें, चिकाटीनें व निरपेक्षपणानें रानड्यांच्या 'मराठ्यांच्या सत्तेच्या उत्कर्षा' करितां ऐतिहासिक कागदपत्रांची जळवाजुळव केली व नंतर 'झांशी संस्थानच्या महाराणी लक्ष्मीबाई' ( १८९४ ), 'मराठ्यांचे पराक्रम' ( १८९५ ), 'अयोध्येचे नवाब' ( १८९९ ), 'ब्रम्हेंद्रस्वामी धावडशीकर यांचे चरित्र' (१९००) 'मुसलमानी अमदानींतील मराठे सरदार'(१९००) श्री. बायजाबाई शिंदे यांचे चरित्र (१९०२) 'होळकर दरबारांतलि हिंगण्याची वकीली' (१९११),

* राजवाडेकृत महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची मोजदाद, लोकशिक्षण वर्ष १ लें.

'तंजावरचें राजघराणें ' ( १९०२ ), ' दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ ' ( १९१२ ), ' दिल्ली येथील मराठ्यांची कारस्थानें ' ( १९१३ ) ' भोसल्यांचें कुलाचार ' ( १९१९ ), ' जोधपुरचें राजघराणें ' ( १९१५ ), ' सवाई माधवरावांचा दरबार ' व ' महेश्वर दरबाराचीं बातमीपत्रें ' इत्यादि दहापंधरा मराठी, आणि Poona bygone days', ' The state Sangli ' ' Mahabaleshwar ' व किंकेड साहेबाच्या सहकारित्वानें ' History of the Maratha people ' इत्यादि चार पांच इंग्रजी ग्रंथ तयार करून यांनीं मराठ्यांच्या इतिहासाची अमूल्य कामगिरी केली. ऐतिहासिक जुनी कागदपत्रें वगैरे व्यवस्थित रितीनें प्रसिद्ध व्हावी ह्मणून त्यांनीं ' भारतवर्ष ' व ' इतिहाससंग्रह ' अशीं दोन नियतकालिकें चालविलीं होतीं. आपण आजपर्यंत जमविलेला ऐतिहासिक वस्तुसंग्रह एकत्र ठेवतां यावा म्हणून एक इमारत सरकारी मदतीनें बांधून त्यांनीं तो एकत्र ठेवण्याची व्यवस्था केली व आतां ते ग्रंथलेखनास लागणार तोंच त्यांच्यावर आपलें कार्य अर्धवट मागें ठेऊन जाण्याचा प्रसंग आला; हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय. !

[ चित्रमयजमतांतलि मृत्यु लेखांत ग्रंथांच्या माहितीची भर घालून ]

चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे [ १८७१ ] देशस्थ ( यजुर्वेदी ) ब्राम्हण. यांचा जन्म नाशिक येथें झाला. मराठी प्राथमिक शिक्षण

आटोपल्यावर यांनीं कांहीं वर्षे बडोद्यास व नंतर पुण्यास प्रवेश परीक्षेपर्यंत इंग्रजी अभ्यास केला. परंतु पुढें घरगुती अडचणींमुळें यांना नोकरी धरणें भाग पडलें. यांनीं संस्कृत भाषेचें चांगलें अध्ययन केलें असून, मराठी व संस्कृत काव्यांचें बरेंच परिशीलन केलें आहे. शिवाय यांना इंग्रजी व गुजराती या भाषाही चांगल्या अवगत आहेत. कविता देवींचे हे निःसिम भक्त आहेत व तिच्या प्रीत्यर्थ यांनीं काय काय केलें हें यांच्या 'कवितारति' या काव्यावरून चांगलें व्यक्त होतें. यांनीं 'सोमनाथ' 'खड्योंची लढाई,' 'कवितारति,' 'रंगराव हर्षे व चिंतोपंत उदास' व 'गोदागौरव' इत्यादि चारपांच मोठीं काव्यें केली असून शिवाय लहानमोठीं पन्नासावर काव्यें केलीं आहेत. यांची भाषा प्रौढ, संस्कृतशब्दप्रचुर असूनही सरळ, सुबोध व रसाळ आहे. यांच्या कवितेंत प्रसाद व औत्सुक्य हे गुण विशेष आहेत.

[ सी. वा. पेंडसेकृत रसतरंगिणी ]

लक्ष्मण गणेशशास्त्री लेले [ १८७१ ] कोंकणस्थ ब्राम्हण यांचें इंग्रजी शिक्षण प्रीव्हियसपर्यंत झालें असून संस्कृत भाषेचें यांनीं उत्तम अध्ययन केलें आहे. त्याचप्रमाणें जुन्या पद्धतीप्रमाणें अलंकारशास्त्राचा चांगला अभ्यास केला असून 'अलंकारप्रकाश' या नांवांचें एक पुस्तकही यांनीं प्रसिद्ध केलें आहे. काव्यनाटकांचा यांस दृढ परिचय असून यांनीं वैद्यकाचेही चांगलें परिशीलन केलें

आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हे बहुश्रुत, विद्वान व चांगले लेखक आहेत. यांनीं 'पद्यमंजरी' 'मेघदूतांचें समवृत्तभाषांतर' वगैरे स्वकृत कवितांची पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. यांची कविता रसालंकारमंडित व मधुर आहे. यांची भाषा प्रौढ असून विचारसरणी उदात्त व मार्मिक आहे.

[ सी. षा. पेंडसेकृत रसतरंगिणी ]

**वासुदेव गोविंद आपटे** [ १८७१ ] यांचा जन्म खानदेशांत धरणगाव येथें झाला. यांचा अभ्यास धुळें हायस्कूल, इंदूर मिशन कॉलेज व नागपूर 'हिस्लॉप कॉलेज ह्या ठिकाणीं झाला. हे कलकत्ता युनिव्हर्सिटीचे बी. ए. असून त्यांना बंगाली भाषा चांगली अवगत आहे. हे कांहीं दिवस पुणें येथें नूतन मराठी विद्यालयाचे असि. सुपरिंटेंडेंट होते. कांहीं दिवस इंदूर दरबारनें ह्यांची नेमणूक चंद्रावती महिला विद्यालयांत प्रथम शिक्षक म्हणून व नंतर 'मल्लारी मार्तंडविजय' हे होळकर स्टेटमधील वर्तमानपत्र चालविण्यासाठीं केली होती. हे जिकीरीचें व जोखमीचें काम यांनीं ९ वर्षें उत्कृष्ट तऱ्हेनें केलें. पुढें हे पुण्यास जाऊन तेथेंच स्थायीक झाले. हे दैनिक ज्ञानप्रकाशाचें पहिले संपादक होते. 'माणिक बाग', 'दुःखांतीं सुख', 'नवयुग', 'मूर्तिमंत देशाभिमान', 'त्रिवेणी', 'वाल्मिकीचा जय' इत्यादि कादंबऱ्या लिहिल्या असुन, 'संपूर्ण बंकिमचंद्र' संपादिला आहे. परंतु यांची प्रसिद्धी यांनी निर्माण

केलेल्या बालवाङ्मयासंबंधी विशेष आहे. 'आनंद' ह्या नांवाचें मुलांकरितां एक उत्कृष्ट मासिक आज वीस पंचवीस वर्षें यांनीं चालविलें असून, रामायण, महाभारत वगैरे पौराणिक ग्रंथांतील गोष्टींचीं लहान पुस्तकें, मुलांस करण्यायोग्य नाट्य-रामायण, नाट्य-भारत, इ. पुस्तकें, व 'मनीं आणि मोत्या', विलक्षण भोळेपणा' वगैरे किती तरी सुबोध व मनोरंजक वाङ्मय निर्माण केलें आहे 'मराठीशब्दरत्नाकर' व 'शब्दार्थचंद्रिका' ह्या नांवाचे दोन कोशग्रंथ तयार केले आहेत. या शिवाय बंगाली-मराठी शिक्षक, लेखनकला वगैरे मिळून ह्यांचीं एकंदर साठसत्तर पुस्तकें होतील.

**श्रीपाद कृष्ण कोल्हटकर** [ १८७१ ] कोंकणस्थ ब्राम्हण. यांचा जन्म नागपूर येथें झाला. मॅट्रिकपर्यंतचें इंग्रजी शिक्षण मिळवून यांचे वडील सरकारी नोकरींत शिरले व वऱ्हाडांत लवकरच चांगल्या हुद्यावर चढून तेथेंच स्थायिक झाले. श्रीपाद कृष्णांस लहानपणींच पौराणिक कथा व नाटकें वाचण्याची गोडी लागली. मराठी शाळेंत शिकत असतांना आपल्या सवंगड्यांच्या घरीं त्यांनी लहान नाट्य प्रयोग करावे,व नारायणरावांच्या मृत्यूच्या फार्सा-सारखे फार्स आपसांत करून पहावे. इंग्रजी शाळेंत असतानाही त्यांनी दोन लहान नाटकें रचिलीं. त्यांचे पुष्कळांस कौतुक वाटलें. त्या पुढें नाटकें पाहण्याचा, वाचण्याचा व लिहिण्याचा श्रीपाद कृष्णांस फारच नाद लागला. बडोद्याचे शंकर मोरो रानडे यांचा

नाट्याचार्य म्हणून त्या वेळीं लौकिक होता. श्रीपाद कृष्णांनीं त्यांच्या नाट्यकथार्णवाचें मंथन केलें व नाट्यरचनेच्या कामीं शंकर मोरो यांस आदर्श म्हणून पुढें ठेविलें. श्रीपाद कृष्णांच्या वडिलानांही संगीताची फार आवड होती, इतकेंच नव्हें तर आपल्या मुलांना तें शिकविण्याची त्यांनी व्यवस्था केली होती. यामुळें श्रीपाद कृष्णांस संगीताचा चांगला परिचय झाला व या वेळीं झालेल्या संगीताच्या अभ्यासाचा, पुढील संगीत नाटकें रचण्याच्या कामीं त्यांस मोठा उपयोग झाला.

हायस्कुलांत असतां कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे धाकटे बंधु लक्ष्मणराव चिपळूणकर ह्यांचा व श्रीपाद कृष्णांचा गुरु-शिष्य योग आला व गुरुजींच्या मार्गदर्शित्वामुळें श्रीपाद कृष्णांस निवडक इंग्रजी व मराठी पुस्तकें वाचण्याची संधि मिळाली. मॅट्रि-कच्या वर्गांत असतां शाळाखात्याच्या व्याकरण, कवितारचना व निबंध यावरील परीक्षेंत बसून श्रीपाद कृष्णांनी पहिलें स्थान मिळविलें व दहा रुपायांची शिष्यवृत्ति संपादन केली. सन १८८८ सालीं मॅट्रिक झाल्यावर श्रीपाद कृष्णांनीं डेक्कन कॉलेजांत प्रवेश केला व सन १८९१ साली ते बी. ए. झाले. कॉलेजांत असतां शंकर मोरो रानडे यांचे चिरंजीव रघुनाथ शंकर रानडे व रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर यांच्याशीं श्रीपाद कृष्णांचा विशेष स्नेह जुळला. रघुनाथ शंकर यांच्या ठिकाणीं त्यांच्या वडिलांची रसि-

कता व विद्वत्ता होती. त्यांच्या सारखा व्यासंगी व वाचनाचा व्यासंगी त्या वेळीं साऱ्या डेक्कन कालेजमध्यें दुसरा कोणी नव्हता. यांचीं वाचनाभिरुचि उच्च प्रतीचीं असे. यांच्या सहवासाचा परिणाम श्रीपाद कृष्णांवर विशेष प्रकारें झाला. त्यांना जी वाङ्मयदृष्टि लाभली ती रघुनाथ शंकर याजपासून मिळाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. असो.

बी. ए. झाल्यानंतर श्रीपाद कृष्ण कायद्याचा अभ्यास करण्याकरितां मुंबईस जाऊन राहिले व सन १८९७ सालीं एल्. एल्. बी. झाले. या अवधींत त्यांनी आपलें 'वीरतनय' (१८९४) हें पहिलें नाटक लिहिलें, व तें किर्लोस्कर संगीत मंडळीनें सन १८९६ सालीं रंगभूमीवर आणिलें. यानंतर 'मूकनायक' (१८९७), 'गुप्तमंजूष' (१९०१), 'मतिविकार' (१९०६), 'वधूपरिक्षा' (१९१४), 'जन्मरहस्य' (१९१८), 'सहचारिणी' १(९१८), 'प्रेमशोधन', 'परिवर्तन' 'जन्मरहस्य' व 'शिवपावित्र्य' इत्यादि नाटकें; 'श्यामसुंदर', व 'दुटप्पी कीं दुहेरी' या कादंबऱ्या; 'भारतीय ज्योतिर्गणित' हा शास्त्रीय ग्रंथ; व 'सुदाम्याचे पोहे' हा विनोदी लेखसंग्रह इत्यादि विपुल ग्रंथरचना श्रीपाद कृष्णांच्या हातून झाली आहे.

श्रीपाद कृष्ण वकील आहेत तरी ग्रंथकार याच नात्यानें त्यांची विशेष लौकिक आहे. काव्य, नाटक, कथा कादंबरी, निबंध

टीका, विनोदलेख या सर्वांत त्यांची गति अकुंठित आहे. विचारांची स्वतंत्रता, विनोदपरता, कल्पनेची रमणीयता व चमत्कृतिजनक कोटिक्रम या चार गोष्टी श्रीपाद कृष्णांच्या कोणत्याही कृतींत कमीजास्त प्रमाणांत दिसून येतात.

श्रीपाद कृष्णांचे टीकात्मक व चर्चात्मक लेखही विस्तृत व विविध आहेत. व यांत देखील त्यांची तर्कशुद्ध विचारसरणी प्रत्ययास येते.

[ गं. दे. खानोलकरकृत संक्षिप्त चरित्रधारें—संपादक ]

**विनायक लक्ष्मण भावे** [ १८७१–१९२६ ] कोंकणस्थ ब्राम्हण. यांचा जन्म पनवेल तालुक्यांतील पळस्पें गांवीं झाला. यांचे वडील जुन्या पिढींतले एक नांवाजलेले वकील होते व त्यांनी वकीलीच्या धंद्यांत मोठा लौकिक व पुष्कळ पैसा संपादन केला. विनायकरावांची मुंज त्यांच्या वयाच्या ८ व्या वर्षीं झाली व त्यानंतर त्यांचा मराठी शाळेंत प्रवेश झाला. शाळेंत असतांना जरी विनायकरावांचे अभ्यासाकडे असे फारसें लक्ष नसे तरी त्यांना वाचनाची गोडी फार लागली होती. त्यांचें लहानपणीं ठाण्यास अरुणोदय, जगत्समाचार, इन्दुपंच वगैरे दोन तीन वर्तमानपत्रें निघत. त्यांतील विविध विषयावर आलेली चर्चा ते वाचीत व त्यांत त्यांचें मन रमे. भावे यांचा स्वभाव लहानपणा पासून विनोदी

व थट्टेखोर होता. त्यामुळें हिन्दुपंचांतील ते हास्यरसोत्पादक व दुसऱ्यांच्या कुचेष्टांनी भरलेले लेख त्यांना फारच आवडत. त्या वेळीं हिन्दुपंचाचे मालक कोणी दाबक नांवाचे गृहस्थ होते. त्यांच्याशी विनायकरावांचा परिचय झाल्यावर ते हिन्दुपंच ऑफीस-मध्यें जाऊन तासाचे तास बसत व तेथें येणारीं वर्तमानपत्रें व मासिकें वाचीत. पुढें पुढें तर ते हिन्दुपंचांत लेखही लिहूं लागले. अशा रीतीनें त्याना मराठीची गोडी लागली.

विनायकरावांच्या सुदैवानें त्यांना कै. ज. बा. मोडक हे फारच चांगले मास्तर लाभले होते. अशा गुरूस विनायकरावा सारखा नादी शिष्य मिळाला व त्यानें गुरूजींचें आवडते काम हातीं घेतले. ते काव्यसंग्रहांतील जुन्या कविता वाचूं लागले व त्यामुळें त्यांस मराठी काव्याची गोडी लागून व त्यामुळें शाळेंतील अभ्यासाकडे साहाजिकच दुर्लक्ष होऊन, तीनचार वर्षांत संपणारा हायस्कूलांतील अभ्यासक्रम संपण्यास त्यांना सातआठ वर्षें लागली. तेव्हांपासूनच ते मराठी कवींच्या काव्याबद्दल व त्यांच्या चरित्रा-बद्दल बारीकसारीक निबंध लिहूं लागले व अशा रीतीनें त्यांचा मराठी वाङ्मयावरील व्यासंग वाढत गेला.

विनायकराव सन १८९१ साली मॅट्रीकची परीक्षा पास झाले व त्यांनी मुंबईच्या वुइलसन् कॉलेजमध्यें प्रवेश केला. कॉले-जांत असताना देखील विनायकरावांचे अनेक उद्योग चालत. त्यांत

नांव घेण्यासारखा पहिला उद्योग म्हणजे ठाण्याचें ' मराठीग्रंथ संग्रहालय ' स्थापन करणें हा होय. हें ग्रंथसंग्रहालय सन १८९३ त स्थापन झालें

विनायकरावांची बी. एससी. ची परीक्षा पास होऊन कॉलेजांतील विद्यार्थीदशा संपण्यापूर्वींची त्यांची दुसरी महत्वाची कामगिरी म्हणजे त्यांनी वेळोवेळीं निबंधरूपानें लिहून ठेविलेले 'महाराष्ट्र सारस्वत' या ग्रंथाचें प्रकाशन ही होय. हा ग्रंथ क्रमशः कै. वि गो. विजापूरकर यांच्या ' ग्रंथमाला ' नामक मासिकांतून प्रसिद्ध झाला. ठाण्याचें मराठी ग्रंथसंग्रहालय स्थापन करणें, 'महाराष्ट्र कवि' नांवाचें मासिक चालविणें व 'महाराष्ट्रसारस्वत' हा ग्रंथ तयार करणें वगैरे कामगिऱ्याप्रमाणें त्यांचे मनांत आपल्या देशांतील प्रसिद्ध असा ऐतिहासिक व्यक्तींचीं लाहान लाहान चरित्रें लिहावीं असें होते व त्याप्रमाणें त्यांनी या ग्रंथाचे १०० बंद लिहून ठेविले होते. परंतु त्यांच्या कोणी लबाड मित्रानें ते वाचावयास म्हणून नेले व ते तो दडपूनच बसला. पुढें भाऱ्यानीही तो नाद सोडून दिला. तथापि त्यांची ' चक्रवर्ति नेपोलियन ', ' शिवाजी व अफजलखान ' इत्यादि पुस्तकें त्यांच्या याच दिशेनें केलेल्या प्रयत्नांची फळें असावींत. भारतइतिहास संशोधक मंडळाचे ते कित्येक वर्षें कर्ते सभासद होते व त्या संस्थेला त्यांनी वेळोवेळीं साहाय्य केलें आहे.

[ सी. म. अभ्यंकर यांच्या मुमुक्षूंतील मृत्युलेखाधारें—संपादक ]

**विनायक जनार्दन करंदीकर** [१८७२-१९०९] कोंकणस्थ ब्राम्हण. यांचा जन्म धुळें मुक्कामीं झाला. याच्या वडिलांना एकंदर आठ आपत्यें झालीं. पैकीं पांच मुलगे व तीन मुली. ज्येष्ठ चिरंजीव बळवंतराव यांना ' बाळाभाऊ ' असें म्हणत. ते पुष्कळ दिवस ' खानदेश वैभव ' पत्राचे संपादक होते. त्यांनी कविताही बरीच लिहिली असून, ती ' बलवंत ', 'रमाकांत नागांवकर' व 'गंधर्व' या तीन नांवाखालीं प्रसिद्ध आहे. बलवंताची कविता सरस, शुद्ध व मार्मिक आहे. अशा प्रेमळ व रसिक बंधूकडूनच विनायकास कवितेचा 'श्रीगणेशा' मिळाला होता.

विनायकरावांचें सर्व शिक्षण धुळें येथेंच झालें. त्या वेळीं धुळें गरुड हायस्कुलात रा. ब. गणेश जनार्दन आगाशे हे मुख्याध्यापक असून, महादेव शिवराम आपटे हे उपशिक्षक होते. या दोघांही शिक्षकांची विनाकावर फार मर्जी असे. शाळेंत असतानांच त्यांनीं ' Greens ' Eairy Tales या पुस्तकांतील सरासरी शंभर गोष्टींचें कविताबद्ध भाषांतर केलें होतें. त्याचप्रमाणें त्यांनी ग्रे कवीच्या ' Elegy नामक प्रख्यात काव्याचेंही भाषांतर केलें होतें ' Principles of Morality ' या सुंदर ग्रंथाचें विनायकरावांनी भाषांतर केलें असून, तें ' नीतितत्त्वें ' या नांवानें प्रसिद्ध आहे. हे शाळेंत शिकत असतानाच लिहिलेलें पुस्तक त्यांनी मुंबईच्या ' निर्णयसागर ' छापखान्याला अवघ्या पन्नास रुपायांत सर्व

हक्कांसह विकत दिलेलें आहे. विनायकराव काव्यरचना इतकी जलद करीत कीं, त्यांना 'शीघ्रकवि' म्हणावयास कोणतीच हरकत नाहीं. वर्गांत शिक्षकांनी लिहावयास सांगितलेले निबंधही ते कवितेंतच लिहीत. मायभाषेवर त्यांचें प्रेम इतकें अलोट होतें कीं, त्यांनी आपल्या अभ्यासाचे खोलींत—

वाटे ज्या बाळगणें प्राकृत भाषाभिमान हें पाप ।
होवो न उंबरा हा चढण्याचा त्याजला कधीं ताप ॥

ही आर्या लिहून ठेविली होती. वाणी व कृति यांचा मेळ घालावयाचा म्हटलें तर विनायकराव लहानपणीं बरेच नियमितपणें व टापटिपीनें वागत असत असें म्हटलें पाहिजे असो.

तथापि गणित हा विषय त्यांचा अत्यंत नावडता होता, व म्हणून ते नेहमी म्हणत असत कीं, मला एका गणिताखेरीज अगणित विषय आवडतात. अशाप्रकारें अभ्यासाचा गाडा त्यांनी जेमतेम स्कूलफायनल पर्यंत ढकलत नेऊन ते सन १८९२ सालीं परीक्षेस बसले. सुप्रसिद्ध कवि 'केशवसुत' हे या वेळीं मुंबईस नोकरी करून असत. कर्मधर्मसंयोगानें केशवसुत विनायकरावांस भेटण्याकरितां म्हणून त्यांच्याकडे गेले असतां दोघेही बोलण्याच्या भरांत इतके गुंगले कीं, विनायकरावांस परीक्षेस जाण्याचें भान राहिलें नाहीं व केशवसुतांना नोकरीवर जाण्याची आठवण राहिली नाही.

अर्थात एक पेपर अशाप्रकारें अंतरल्यामुळें विनायकरावास परिक्षेंत नापास व्हावें लागलें या पुढें पुन्हा ते परीक्षेस बसले नाहीं. खऱ्या जातिवंत कवींचें वर्तन दिक्कालातीत कसें असतें यांचें हें एक उत्तम उदाहरण आहे.

विनायकरावांचे लग्न त्यांच्या वयाच्या २१ व्या वर्षीं झालें. लग्न होऊन विनायकराव संसारपाशांत अडकले खरे; परंतु त्यांचें गृहवर्तन अत्यंत बेफिकिरीचे असे. सरस्वतीबाईंचे अंगीं नवऱ्यास आपलेसें करून घेण्याची करामत नव्हती म्हणून म्हणा, किंवा विनायकरावास आपलें मन रंजविण्याइतकें काव्य आपल्या पत्नींत आढळलें नाहीं म्हणून म्हणा; परंतु एवढी गोष्ट खरी कीं, खरें संसारसुख उभयतांनाही लाभलें नाहीं सदर गोष्टीची कार्यकारण-परंपरा कोणी कशीही लावोत, प्रस्तुत लेखकाची अशी समजूत आहे कीं, काव्यरसापुढें विनायकरावाला इतर सर्व रस अगदी तुच्छ वाटत असत व म्हणूनच ते काव्याखेरीज बाकीच्या ऐहिक सुखांविषयीं निरासक्त असत. ‘ वेडा कोण ? ’ या नांवाची एक कविता विनायकरावांच्या ज्येष्ठ बंधूनीं लिहिली आहे. तींत विनायक-रावांचें चरित्रच त्यांनी यथातथ्य रेखाटलें आहे.

विनायकरावाची प्रसिद्धीस आलेली अगदीं पहिली कविता म्हणजे ‘ एक पोलीस अमलदार ’ ही होय. या कवितेंत एक गृहस्थ लांगुलचालनानें व क्रूरतेनें एक एक पदवी कसा पटकावीत

गेला व शेवटीं त्याच्या नांवापुढें ‘ साहेब ’ ही पदवी लागून तो लोकांत कसा मानमरातब पावला याचें मोठें मजेदार वर्णन केलें आहे. ही कविता धुळें येथें ‘ नारायणराव पेशवे ’ ह्मणून कोणी पोलीस इन्स्पेक्टर होते, त्यांच्यावर लिहिलेली आहे. सदर कवितेच्या काहीं ओळी उपलब्ध झाल्या आहेत, त्या अशाः —

ह्मणतां मज नानानानान्या । नारायण पडलें नांव,
नारायण कालगतीनें । झाला नारायणराव;
श्रीमत मोच म्हणतात,
सरकार मला म्हणतात,
बहुजन मज गणती तात,— इ०

ही कविता लिहिली त्या वेळीं इतकी लोकप्रिय झाली होती कीं, धुळें शहरांतलि अबालवृद्धांस ती तोंडपाठ झाली होती. संबंध कविता हातीं येण्यासाठीं पुष्कळ ~~खटपट~~ खटपट केली, पण ती व्यर्थ झाली.

वरील पद्यावरून विनायकरावांच्या मनांत पोलिस खात्याबद्दल किती आदर होता याची कल्पना सहज करतां येते. परंतु परिस्थिति अशी उत्पन्न झाली कीं, त्यांना प्रथम पोलिसांतच नोकरी धरावी लागली. पण हा जुलमाचा रामराम फार दिवस टिकला नाहीं. पोलिस खात्यांतलि नोकरीस लागणारी मनोरचना विनायकरावा

जवळ नसल्याकारणानें त्यांना ती नोकरी सोडून द्यावी लागली. सर्व आयुष्याची व संसाराची राखरांगोळी करणारी व्यसनें " वेश्या व वारुणी " ही त्यांना पोलीस खात्यांत नोकरी करीत असतानाच लागली असें कित्येकांचें ह्मणणें आहे. कोणी ह्मणतात एका असिस्टंट कलेक्टराला मराठी शिकविण्याला हे राहिले असतां त्याच्या शिरस्तेदारानें हा मंत्रोपदेश त्यांना दिला, व कोणाच्या मतें त्यांना हें बाळकडू घरांतच मिळालें. कांहीं कां असेना; ते या दोन्ही व्यसनांच्या तावडींत सांपडले होते ही गोष्ट निर्विवाद आहे व ती लपवून ठेवण्यांत तादृश फायदा नाहीं. पोलिस खात्यांतील नोकरी सुटल्यावर त्यांना फरारी होऊन कांहीं दिवस धार व देवास या संस्थानांत अज्ञातवासांत काढावें लागले होते, असें ह्मणतात.

पुढें कांहीं दिवस ते रिकामेच होते. नंतर धरणगांवच्या मिश॰ नरी बायांस पंडित ह्मणून बरेच दिवस राहिले. पण स. १९०७ सालीं त्यानी ही नोकरीही सोडून दिली व नंतर नगरदेवळे येथील जहागीरदाराकडे कारभाऱ्याची जागा पतकरिली. ही त्यांची शेवटची नोकरी त्यांनी जेतमेत दोन तीन वर्षें बजाविली. कारण सन १९०९ सालीं नाट्यकलाप्रवर्तक संगीत मंडळीनें त्यांचें ' प्रभावती ' नाटक रंगभूमीवर आणण्याचें नक्की करून तें बसवून देण्याकरितां पुण्यास बोलाविले असतां तेथें जाऊन चार पांच दिवस झाले नाहींत तोच त्यांना तापानें पछाडिले आणि त्यांतच त्यांचा अंत झाला !

विनायकरावांचें टोपणनांव 'बाबूराव' असें होतें. व त्यांची स्नेही मंडळी त्यांना या नांवानेंच संबोधीत. विनायकरावांचे स्नेही अमूकच होते असें नक्की सांगता येणार नाहीं. ज्यांच्यांत ते बराच काळ घालवीत त्यांना स्नेही म्हटलें तर ते सर्व चंगीभंगी, व्यसनाधीन व धनाढ्य असे लोक होते. शाळेंतील मित्र हे तर स्नेही होतेच; पण ज्याच्याशीं बोलतील त्याला 'विनायक' आपला मित्र आहे असे ह्मणावयास बिलकुल शंका वाटत नसे. याचे कारण ते वाणीनें रसाळ, व मनानें प्रेमळ व मोकळे होते. आनंद ही त्यांची सहजवृत्ति होती. दुर्मुखलेले ते कधींच दिसले नाहींत.

[ 'अनंत तनय' ]

काशिनाथ हरी मोडक उर्फ 'माधवानुज' [ १८७२–१९१६ ] कोंकणस्थ ब्राह्मण. यांचा जन्म सुधागड तालुक्यांतील पडघवली गांवीं झाला. हें पंतसचीवांच्या ताब्यांत आहे. माधवानुजांचे वडील हरिभाऊ हे कारकुनी पेशाचे गृहस्थ असून पूर्ववयांत आगाशीच्या बाजूला नोकर होते. पण त्यांस तेथील हवा न मानवल्यामुळें ती नोकरी सोडून घरी आले व नंतर पुणें येथें श्री रास्ते यांच्याकडे दरमहा पांच रुपायावर कारकन झाले. हे फार बाके कारकून असत. त्याचप्रमाणें त्यांस मोरोपंतादि जुन्या कवींचे ग्रंथ वाचण्याचा फार नाद असे.

माधवानुज जन्मत: चांगले सुदृढ होते. त्यांतून खेडेगावांतील शुद्ध हवा, साधी राहणी व प्रेमळ बंधुभागिनींचा सहवास यामुळें लहाणपणीं ते चांगले खेळकर व चपळ होते. यांची मुंज पुणें येथें वयाच्या आठव्या वर्षी झाली व नंतर ते रोहे येथें त्यांचे मातुल रामचंद्र चिंतामण डोंगरे यांच्याकडे इंग्रजी शिकण्याकरिता गेले. हे मामा उत्तम दशग्रंथी असूनही शिक्षक होते. ते चांगलेच बहुश्रुत कलाप्रेमी, व विद्याव्यासंगी होते. त्या मुळें माधवानुजांस त्यांच्या सहवासांत अनेक सुभाषितें, आख्यानें, व तत्कालीन मराठी कविता यांची ओळख झाली. ते मोठ्या हौसेनें व आस्थेनें नवीन ऐकलेलें सुभाषित किंवा कविताबद्ध कोडें आपल्या वहींत टिपून ठेवीत.

माधवानुजाच्या बंधूपैकी सर्वांत वडील माधवराव व कनिष्ठ काशिनाथपंत यांच्यामध्ये विलक्षण प्रेम होते. व हा वरिष्ट कनिष्ट बंधूमधील जिव्हाळ्याचा संबंध काशिनाथपंतांनी स्वनाम प्रसिद्धिचा मोह आवरून 'माधवानुज' हें नांव स्वीकारण्यानें चिरस्मरणीय करून ठेविला आहे. माधवराव त्या वेळीं पुणें येथें शिकत होते. ते ज्या ज्या वेळीं माधवानुज पडघवलीस सुट्टी निमित्त जात, त्या त्या वेळीं पुण्याहून मुद्दाम आपल्या छोट्या बंधूस भेटावयास जात. या सहोदरांमधील तत्कालीन पत्रव्यवहारांत बरीच पत्रें काव्य-रूपांत आहेत. एका पत्रांत तर मराठींत सर्व वृत्तांमध्यें एक एक कविता लिहिली आहे. ते एक चिमुकलें वृत्तदर्पणच आहे. तसेंच

या पत्रव्यवहारावरून असें ठळकपणें लक्षांत येतें कीं, माधवानुजास विद्याभिरुचि, मार्मिक भाषाज्ञान, व काव्यस्फूर्ति त्यांच्या वडील बंधूपासूनच प्राप्त झालीं. पडघवलीत पहिले सुशिक्षित माधवरावच हे स्वकष्टानें सन १८८८ सालीं बी. ए. झाले व त्यांनी माधवानुजास योग्य वळण दिलें.

पुढें माधवानुज हे पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिकूं लागले. त्यांचे त्या वेळचे सहाध्यायी ह्मणजे कृष्णाजी गोविंद किनरे हे होत. माधवानुज सन १८८९ सालीं मॅट्रिकला बसले. पण त्या वर्षीं गणितांत नापास झाले. या नंतर मॅट्रिकचा नाद सोडून मेडिकलस्कूलमध्यें जाण्याचें माधवानुजांनीं ठरविलें. आणि तिकडे मात्र त्याना यश आले. कारण या प्रवेशपरीक्षेंत सुमारे १०० विद्यार्थि बसलें होते. त्यात 'माधवानुज' पहिले आले व त्यांना पहिल्या वर्षीं ९ रुपायाची शिष्यवृत्ति मिळून ते स, १८९१ सालीं बी. जे मेडिकलस्कूलमध्यें दाखल झाले.

माधवानुजानी पुणें येथील स. १८९१ ते १८९४ या चार वर्षांत मराठी, संस्कृत व इंग्रजी काव्याचा चांगला अभ्यास केला. शेक्सपियर, बायरन, लॉंगफेलो, टेनिसन, वर्ड्सवर्थ, व बर्न्स यांच्या कविता त्यांनीं काळजीपूर्वक वाचल्या होत्या. मराठी कवींपैकीं मोरोपंत व वामनपंडित यांच्या कवितांचा त्यांचा व्यासंग बराच झाला होता. मेडिकल स्कूल मध्यें असतांना त्यांनीं एका गर्विष्ठ व

भावल्या मित्रावर इतकी उत्तम कविता रचिली कीं, ती ऐकून वसतिगृहांत रहाणारे सर्व विद्यार्थी पोटें धरधरून हंसत असत. माधवानुजास कोणताही जिन्नस दिसला कीं त्यावर कविता करण्याची स्फूर्ति होत असे व सुचलेली कल्पना ते एकदम कवितेंत ग्रथित करीत असत. मटीरिया मेडिका हा फार रूक्ष विषय. त्यांतील औषधांचीं नांवें व त्यांचे उपयोग लक्षांत ठेवणें कठिण. ह्मणून ते लक्षांत राहाण्याकरितां माधवानुजांनी त्यास कवितारूप दिलें होतें.

माधवानुज सन १८९४ सालीं हॉस्पिटल असिस्टंटची परीक्षा पास झाले व लागलीच त्यांची नेमणूक ठाणें येथें झाली. त्या वेळीं तेथील सिव्हिल सर्जन ले. कीर्तिकर होते. परंतु अशा रसिक अधिकाऱ्याचा सहवास त्यांना अधिक दिवस लाभावयाचा नव्हता कारण दोनच महिन्यानंतर त्यांची बदली झाली व तेंव्हापासूनच नोकरीची कटु फळें चाखावयास मिळूं लागली. यावेळीं त्यांचा वरिष्ठ हेडक्लार्क एक पारशी गृहस्थ होता. तो पडला पक्का सुतिप्रिय तर माधवानुज पक्के निस्पृह. तेव्हां या उभयतांमध्यें वारंवार खटका उडूं लागला. पण माधवानुजांच्या कामांत त्यास चूक काढता न आल्यामुळें त्यास गप्प बसावे लागे. पण यांचे उसने त्यानें माधवानुजांचीं बदली प्रत्येक वेळीं दुष्काळ किंवा प्लेगड्यूटीवर करून काढलें. यामुळें सरकारी नोकरीच्या पांच वर्षांच्या मुदतींत फार हाल आपेष्टा झाल्या. पण सरकारी मदत घेऊन हे शिकलेले अस-

त्यामुळें पांच वर्षेपर्यंत त्यांना नोकरी करणें भागच होतें. मुदतीच्या आंत नोकरी सोडावी तर दंडादाखल पांचशे रुपये भरावे लागणार.

नेहमी कोठे तरी रानावनांत, आप्तेष्टापासून दूर व दुष्काळ कामासारख्या जिकीरीच्या व दगदगीच्या कामावर रहावे लागत असल्यामुळें ते स्वतः फार निरुत्साही झाले होते व या मुळेंच त्यांनी लिहिलेल्या कवितांपैकीं अर्ध्याहून अधिक कविता दुष्काळासंबंधीं आहेत. शेवटीं नोकरीची मुदत पुरी होण्यास कमी असलेल्या दोन तीन महिन्यांची रजा घेतली व नंतर राजिनामा दिला, आणि स्वतंत्र धंदा करण्याच्या विचारानें सन १८९९ सालीं त्यांनीं कल्याण येथें दवाखाना उघडला. परंतु लवकरच पुढें प्लेग झाल्यामुळें ते त्यांचे बंधु माधवराव यांच्याकडे अलाहाबादेस गेले. तेथील निसर्गरमणीय शोभा, गंगायमुनेसारख्या पवित्र नद्यांचें सानिध्य व धंद्याच्या दगदगींतून सुटका यामुळें या ठिकाणी माधवानुजांना कवितादेवीची उपासना निर्वेधपणें करतां आली. तेथें त्यांनीं लिहिलेल्या कविता फार उच्चदर्जाच्या व अप्रतिम आहेत.

माधवानुज बंगाली शिकले होते. त्यानीं बंकिमचंद्राच्या ‘कृष्णकांतेर वुईल’ या कादंबरीचें ‘कृष्णकान्ताचें मृत्युपत्र’ या नांवाचें, भाषांतर केलें. ही कादंबरी वाचकवर्गास फार आवडल्यामुळें त्याच ग्रंथकाराची ‘कपालकुंडला’ ही कादंबरी माधवानुजांनी

मराठींत आणिली. मधुसूदनदत्त याच्या ' मेघनादवध ' या काव्याचें मराठी रूपांतर करण्यास प्रारंभ करून सुमारे १२०० आर्या तयार केल्या.

संपादकवर्गापैकीं करमणूकीचे हरिभाऊ आपटे यांचा माधवानुजांवर फार लोभ होता. माधवानुजांचा महाराष्ट्र वाचकवर्गास प्रथम परिचय करून देण्याचें सर्व श्रेय हरिभाऊसच आहे. माधवानुजांचा व करमणूकीचा संबंध इतका दृढ होता कीं, एकाचें नांव घेतल्याबरोबर वाचकवर्गास दुसऱ्याची आठवण होई. सन १२१२ सालच्या करमणूकीच्या दिवाळी अंकांतील ' शरत्काल ' ही कविता हीच त्यांची करमणूकींतील शेवटची कविता होय.

माधवानुजांचे प्रत्येक काम रेखीव व टापटीपीचें असे. पूर्ववयांत ते तापट होते, पण पुढें उत्तरोत्तर ते शांत होत गेले. खोटेपणाचा व नटवेपणाचा त्यांना तिटकारा असे. ते बोलण्यांत प्रेमळ, स्वभावानें उदार, वृत्तीनें समाधानी, वर्तनानें सरळ व सदा प्रसन्नमुख असत. ते आचारानें कर्मठ जरी नसले तरी शुचिर्भूत असत.

[ चिंतामण काशिनाथ मोडक यांच्या चारित्र लेखाचा संक्षेप ]

**भास्कर रामचंद्र तांबे** [ १८७४ ] कऱ्हाडे ब्राह्मण. यांचा जन्म ग्वाल्हेर संस्थानांत मुगावी मुक्कामी झाला. ग्वाल्हेर संस्थानचें शिक्षणखातें या वेळीं इतकें व्यवस्थित नसल्यामुळें भास्कररावाचें

प्राथमिक शिक्षण झांशीं व मुगावली येथें धुळपाटीवरून झालें. पुढें झांशीची सुभायत भांडेर मुक्कामीं गेल्यामुळें व तेथें शिक्षणाची सोय नसल्याकारणानें सन १८८८ त भास्करराव आपल्या आजोळीं देवास येथें गेले. व देवास हायस्कूलमध्येंच त्यांच्या शिक्षणाचा खरा आरंभ झाला. आणि सन १८९३ साली ते अल्लाहाबाद युनिव्हर्सिटीची प्रवेशपरीक्षा पहिल्या वर्गांत पास झाले.

भास्कररावांस शाळेंत असल्यापासूनचे इंग्रजी पुस्तकांतील कवितांचें भाषांतर करमणूकी खातर करण्याचा नादच असे. वर्ग चालला असतांना भाषांतर करावें व घरीं जातांना ते कागद चोळा-मोळा करून टाकून द्यावें. हा यांचा नेहमीचा क्रम असे. एकदां असाच चोळामोळा करून टाकलेला कागद लेले मास्तरांनीं पाहिला व त्यांनीं तो उचलून घेऊन पाहतात तों त्यावर पुढील ओळी लिहिलेल्या होत्या :—

**अहामति गती खुटे तव कृती परी ना कळे ।**
**बघूनी अशी ही स्थिती दुरभिमान सारा गळे ॥**

या ओळीं वाचून लेलेमास्तरांस विस्मय वाटला व त्यांनीं विचारिलें 'काय रे, या ओळी लिहिल्या?' त्यावर भास्कररावांनी भीतभीतच 'होय मास्तर मीच लिहिल्या.' भीतभीत दिलेलें हें उत्तर ऐकून मास्तरांस मोठें कौतुक वाटलें. या बालभा-स्कराचें हें काव्यतेज पुढें लेले मास्तरांनीं त्यांस कांहीं ना कांहीं

तरी कारणानें काव्यविषयक व इतर चांगली पुस्तकें बक्षिस म्हणून देऊन वाढविण्याचा प्रयत्न केला व प्रत्यक्ष साहित्यशास्त्राचा अभ्यास करवून घेण्यासाठीं कमलाकार याचा 'रसप्रबोध' आणि 'ध्वन्यालोक' हे ग्रंथ मुद्रित होण्यापूर्वींच भास्कररावांकडून वाचवून घेतले.

एकदां देवास येथें मोठ्या पातीच्या दिवाणसाहेबांकडे कथा होती. कीर्तनकारांचा एकेका श्लोकाचे दहा दहा अर्थ करण्यांत हातखंडा असे. इतर कवींचें असो पण, तुकारामासारख्या भोळ्या संताच्या उक्तींचेही जेव्हां कीर्तनकारांनी दोन दोन अर्थ करण्यास प्रारंभ केला तेव्हां कवितादेवीची ही ओढाताण भास्कररावांस खपली नाहीं 'मग ती कशाची माउली । तान्हे कशासाठीं व्याली,' याचा सरळ अर्थ सांगून, बुवांनीं नंतर 'कसा' शब्दावर श्लेष करून असाही अर्थ केला कीं, 'अशी आई म्हणजे पैशाच्या पिशवीची आई!'

दुसरे दिवशीं तांबे आपल्या नेहमीच्या क्रमाप्रमाणें लेले मास्तरांकडे गेले असतां बुवा व त्यांच्या चेल्यांचा घोळका तेथें आला. नमस्कार चमत्कार झाल्यावर बुवांच्या एक एक श्लोकाचे दहा दहा अर्थ लावण्याच्या कौशल्याबद्दल गप्पा सुरू झाल्या. त्यावेळीं तांबे यांस तें सहन न होऊन, ते कोपऱ्यांतून मोठ्यानें म्हणाले 'तें तर खरेंच; पण बुवांनीं जें ध्रुवपद लावलें होतें त्याचेही दोन अर्थ

होतात, हें त्यांच्या लक्षांत आलेसें दिसत नाहीं. " कथामृत संतत पान करी " याचा आणखी एक अर्थ असा होतो कीं, " कथा-मृत; संत तपा न करी " ' मग कथेकरी कितीही ओरडो ! ' हें ऐकून जमलेल्या मंडळींत एकच हंशा पिकला. गुरूजींनी डोळे वटा-रले व तांब्यानींही तेथून पळ काढला !

भास्कररावांना इंग्रजी, संस्कृत, उर्दू व हिंदी या भाषा चांग-ल्याच अवगत आहेत. साहित्यशास्त्राच्या नियमास धरून संस्कृत काव्यनाटकाचा परिचय करून देण्याचें काम त्याचे गुरूजी काशी-नाथपंत लेले यानीं केलेंच होते. भास्कररावांनी तुलसीदासकृत रामायण लहानपणींच पाठ केलें होतें व त्यामुळें हिन्दी वाङ्मयाची गोडी लागून तेंही त्यांनी बरेच वाचले आहे. भास्कररावांनी ' कवि-तेचे मूळ अथवा महाश्वेतेचें निवासस्थान ' वगैरे मोठे निबंध लिहिले आहेत. ' भयंकर प्रसाद ' नामक एक नाटकही त्यांचेजवळ लिहून पडलें आहे. ' गेली ज्योति विझोनिया मग फुका फुंका तयाला किती ' ही चतुर्दशपदी वाचून ' केशवसुत ' प्रसन्न झाले व रहाळ-करांजवळ ' भास्करराव हे जिवंतवाणीचे निसर्ग कवि आहेत ' अशा अर्थाचे उद्गार त्यांनी काढले.

भास्कररावांचा संसार सर्वांगसुंदर करण्याचें बरेंच श्रेय ज्या साध्वीस आहे त्या म्हणजे रतलाम येथील त्र्यंबकराव आळतेकर

यांची कन्या सौ. वारूबाई ह्या होत. भास्करराव हे आरंभीं देवासच्या श्रीमंत खाशेसाहेबांस शिक्षक होते. नंतर देवास, इंदूर, पिपळजा व प्रतापगड वगैरे संस्थानांत त्यांनी मोठमोठ्या हुद्यांचीं कामें केलीं आहेत.

[ वा. गो. मायदेवकृत ' तांबे यांची कविता ' ]

**बाळकृष्ण अनंत भिडे** [ १८७४ ] कोंकणस्थ ब्राम्हण. मुंबई युनिव्हर्सिटीची बी. ए. ची पदवी संपादन केल्यावर यानी नोकरी पतकरली व मुरुड ( जंजिरा ) येथील हायस्कूलचे हेडमास्तर झाले. यांनी संस्कृत व मराठी काव्याचें व विशेषतः मोरोपंताच्या काव्याचें चांगलें परिशिलन केलें आहे, असें दिसतें. हे माजी काव्यसंग्रहाचे संपादक होते. यानी विपुल काव्यरचना केली असून नुकतेंच यांनी ' फुलांचे झेले ' या नांवाचे स्वकृत काव्यांचे छोटेंपुस्तक प्रासिद्ध केलें आहे. यांची कविता संस्कृतशद्धप्रचुर असूनही सुबोध व सुरस आहे.

[ सी. वा. पेंडसेकृत ' रसतरंगिणी ' ]

**दत्तात्रय कोंडो घाटे** [ १८७४–१८९९ ] मराठे. आधुनिक कविमंडळांत हें एक सुंदर कविरत्न चमकून गेलें. हे मुंबई युनिव्हर्सिटीचे बी. ए. होते व यांनी पुष्कळ लहान लहान काव्यें केलीं आहेत. यांची भाषा सुरस व प्रौढ आहे. यांच्या कवितेंत

प्रसाद विशेष असून, करुणरस व उद्विग्नता यांची छटा ठिक-ठिकाणीं आढळते. निघृण काळानें यांच्या रसाळ वाणीचा मराठी वाङ्मयास अधिक लाभ होऊं दिला नाहीं, ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट आहे.

**कृष्णाजी पांडुरंग लिमये.** [ १८७५ ] कोंकणस्थ ब्राम्हण. हे कोंकणांत दापोली तालुक्यांतील पाडलें गावीं जन्मले. हे प्रथम पुणें येथें न्यू इंग्लिशस्कूलांत शिक्षक होते. परंतु नंतर हे दापोलीस मिशनस्कूलांत शिक्षक झाले. हे ‘ राधारमण ’ या नांवानें प्रसिद्ध आहेत. यांचीं ‘ कालचक्र ’ ( १९०९ ) इत्यादि काव्यें प्रसिद्ध असून यांनी ‘ काव्यदोहन ’ ( १९०७ ) संपादिलें आहे. यांची भाषा प्रौढ परंतु बरीच संस्कृतशद्बप्रचुर आहे.

[ सी. वा. पेंडसेकृत ‘ रसतरंगिणी ’ ]

**सीताराम केशव दामले** [ १८७६–१९२७ ] हे बी. ए., एल. एल. बी. झाल्यावर कांहीं दिवस फर्ग्युसन कालेजमध्यें प्रोफेसर होते. स. १९०६ सालापासून स्वदेशी बहिष्कार ही चळवळ महाराष्ट्रांत जोरानें सुरू झाल्यावर हे लो. टिळकांच्या पक्षास मिळाले. १९०८ सालीं लोकमान्य टिळक ह्यांजवरील खटला सुरू होण्यापूर्वी राष्ट्रीय पक्षाचें ‘ राष्ट्रमत ’ नांवाचे मराठी दैनिक सुरू करण्याची सर्व व्यवस्था लो. टिळक यांनीं केली होती.

आणि दे. दामले यांना राष्ट्रमतचे संपादक नेमलें होतें. दे. दामले यांनीं ' राष्ट्रमत ' दैनिक सदर खटला चालु असतांना मोठ्या धैर्यानें व कौशल्यानें सुरु केलें आणि त्यांच्या लेखनकौशल्यामुळें अल्पावधींत राष्ट्रमताचा प्रसारहि चांगला झाला. सरकारी दडपशाहीमुळें ' राष्ट्रमत ' बंद पडल्यावर १९१० सालीं ' राष्ट्रोदय ' नांवाचें मासिक त्यांनीं सुरू केलें. त्यानंतर चित्रमयजगतांत त्यांच्या कादंबऱ्या व महत्वाचे राजकारणाचे लेख येऊं लागले. १९१८ सालीं ' राजकारण ' नावाचें स्वतःचें आपलें साप्ताहिक सुरू केलें. मुळशीच्या सत्याग्रहांत आपल्या करारी स्वभावास अनुसरून दे. दामले यांनीं कारागृहवास स्वीकारला व नंतर ' राजकारण ' साप्ताहिक बंद पडलें. मुळशीच्या सत्याग्रहाचे वेळीं प्रकृती चांगली नसतांहि आजारीपणांतच त्यांनीं शिक्षा भोगली, व त्यानंतर त्यांचीं प्रकृती हलके हलके ढांसळत गेली. वाढत चाललेल्या अशक्तपणामुळें शेवटीं पंडुरोग होऊन त्यांतच त्यांचा अंत झाला.

लो. टिळक ह्यांच्या राष्ट्रीयपक्षांत पुढारी या नात्यानें दे. दामले यांनीं महाराष्ट्राची चांगलीं सेवा केली. पुणें शहर कांग्रेस कमिटीचे अध्यक्ष या नात्यानें खादीच्या बाबतींत पुणें शहरांत त्यांनीं विशेष चळवळ करतांना फार श्रम घेतले आहेत. शिवाय टिळक महाविद्यालयांतही अत्यंत दक्षतेनें काम केलें आहे. चळवळीचें पुढारी ह्या नात्याच्या योग्यतेपेक्षांही ग्रंथकार व लेखक ह्या नात्याची दे.

दामले यांची योग्यता फार अधिक आहे. ' चित्रमय जगतां'तील आणि ' नवाकाळ ' मधील त्यांचे निरनिराळ्या विषयांवरचे लेख सर्वांच्या परिचयाचे आहेतच. ' जग हें त्रिविध आहे, ' ' न्याय कीं अन्याय, ' ' दोनशें वर्षांपूर्वीं, ' वसईचा रणसंग्राम, इत्यादि त्यांच्या कादंबऱ्या प्रसिद्ध असून, त्यांच्या घराण्यांतील प्रतिभा-शक्तीची चांगली ओळख सर्वांना करून देणाऱ्या आहेत. ' कार्लाइलचें चरित्र ' व ' महात्मा गांधीचें चरित्र ' अशीं दोन चरित्रें त्यांनीं लिहिलीं ' घरचा कायदा, ' ' सभा अध्यक्ष व सभासद ' इत्यादि नेहमीं उपयोगीं पडणारीं पुस्तकें त्यांनीं लिहिलीं आहेत.

**वामन मल्हार जोशी.** देशस्थ ब्राम्हण. यांचा जन्म माणगांव तालुक्यांत ( जि. कुलाबा ) तळें येथें त्यांच्या आजोळीं झाला. त्यांचें मूळ गांव, त्याच तालुक्यांतील गोरेगांव हें होय. तेथें प्राथमिक शिक्षण झालें. त्या नंतर हे पुण्यास गेले; व ' न्यू प्रिपरेटरी क्लासेस ' मध्यें त्यांचें इंग्रजी सहाव्या इयत्तेपर्यंत शिक्षण झालें. सन १९०० त हे नगर हायस्कूलमधून मॅट्रिक व सन १९०४ सालीं पुण्याच्या डेक्कन कॉलेजांतून बी. ए. झाले. या अवधींत त्यांस दर वर्षीं वरच्या नंबरच्या स्कॉलर्शिप्स मिळत. हे सन १९०६ मध्यें एम. ए. झाले; व १९०७ च्या जून महिन्यांत कोल्हापुरास प्रो. वि. गो. विजापूरकर ह्यांनीं काढिलेल्या ' समर्थविद्यालया ' स जाऊन मिळाले; आणि त्याचे ते आजन्म

सेवकहि झाले. पुढें समर्थविद्यालय तळेगांवास आल्यावर, त्यांनीं 'विश्ववृत्त' नांवाच्या मासिकाचें सहसंपादकत्व पत्करिलें. सन १९०८ च्या आगस्टमध्यें कोल्हापुरास विश्ववृत्तावर खटला भरण्यांत आला; आणि त्या वेळीं प्रो. विजापुरकर यांस ३ वर्षें साधी कैद व वामनराव जोशी यांस ३ वर्षें सक्तमजूरीची कैद, याप्रमाणें शिक्षा झाल्या. सन १९११ सालीं सुटका झाल्यानंतर यांनीं २—३ वर्षें मराठा ऑफीसमध्यें काम केलें व त्यानंतर मुंबईस अ. ब. कोल्हटकर यांच्या 'मेसेज' मध्येंही त्यांनी १–१॥ वर्षे असि. एडिटरचें काम केलें. सन १९१८ पासुन हे हिंगणे येथील महिलापाठशाळेमध्यें प्रोफेसर म्हणून काम करूं लागले व सन १९२० सालीं अनाथबालिकाश्रमाच्या मंडळीचे 'लाइफ मेंबर' झालें. वामनरावांनीं रागिणी, नीतिशास्त्रप्रवेश, नलिनी, आश्रमहरिणी, नवपुष्पकरंडक, सात्रेटिसाचे संवाद इ. पांच सात सुंदर पुस्तकें लिहिलीं आहेत. यांपैकीं रागिणी, नलिनी व आश्रमहरिणी ह्या कादंबऱ्या आहेत; आणि नीतिशास्त्रप्रवेश व साक्रेटिसाचे संवाद हीं उच्चतम तात्विक विचारांचीं पुस्तकें आहेत. ह्यांचें भाषाप्रभुत्व अप्रतिम आहे व त्यांची 'रागिणी' ह्याच भाषा कौशल्यामुळें सर्वमान्य होऊन, सरकारी परीक्षांसही नेमली जात असते.

---

# चरित्रसूचि.




अमोलिक, ही. १२

आगरकर, गो. ग. ८४

आठल्ये, कृ. ना. ७५

आपटे, म. चि. ३९

आपटे, वा. गो. १३३

आपटे वि. गो. ७३

आपटे ह. ना. १७६

ओक, वि. कों. २५

ओक, वा. दा. ३६

कँडी, मेजर टी. ३

करंदीकर, वि. ज.

कर्वे, धों. के. ९९

कानिटकर, गो. वा. ८०

कानिटकर, ना. बा. ७४

किर्तने. वि. ज. २६

किर्तीकर. का. र. ४७

किर्लोस्कर, ब. पां. ३१

कुंटे, आ. मो. ३३

कुंटे, म. मो. १७

कुरुंदवाडकर, श्रीमंत बा. २३

केशवसुत १२५

केळकर, वा. बा. १०४

कोल्हटकर, म. १६

कोल्हटकर, श्री. कृ. १३४

खरे. बा. वा. ९८

खांडेकर, ना. धों. ४२

गाडगीळ. कृ. प. ४३

गायकवाड, सी. रा. ९६

गुंजीकर, रा. भि.

गोखले, वि. भि. १०

गोडबोले, कृ. १४

गोडबोले, प. ब. २

गोळे, म. शि. १०२

गोऱ्हे, चं. शि. १३१

घाटे द. कों. १५४

चिटणीस, म. खं. १०३

चितळे, म. बा. ५५

चिंतामणिपेठकर, पां. व्यं. ७२

चिपळूणकर, कृ. ७

चिपळूणकर, ल. कृ. ७३

चिपळूणकर, वि. कृ. ५९

चौधरी, जा. दा. २४

छत्रे, के. ल. ७

छत्रे, स. का. १

जांभेकर, बा. गं. ४
जोशी, आ. मा. ४४
जोशी, पु. बा. ९३
जोशी, रा. भि. ९४
जोशी, वा. म. १५७
टिपनीस, गो. गो. १२९
टिळक, गं. रा. ८
टिळक, ना. वा. १०७
टिळक, बा. गं. ८९
डुकले, मा. चं. ९
डोंगरे, पु. भा. ७६
डोंगरे, वा. ना. [illegible]७
तर्खडकर, दा. पां. ४
तांबे, भा. रा.
त्रिलोकेकर, सो. बा.
दामले, सी. के. १५५
दामले, ह. कृ. ८२
दीक्षित, शं. बा. ७८
देव, वि. सी. १०३
देऊळ, गो. ब. ९२
देशमुख, गो. ह. ६
धनुर्धारी. १०८
नाडकर्णी, पु. गो. ३३
नातू, का. गो. २९
नित्सुरे, शि. रा. ५३
पंडित, वि. प. ११
पंडित, शं. पां. २७
पंडित, ह. मा. ५६
पडवळ, तु. ता. [illegible]१
परांजपे, शि. म. ११२
पारख, ब. ख. ६९
पारखी, पां. गो. ३५
पारसनीस, द. ब. १३०
पावगी, ना. भ. ८३
पाळंदे, भा. दा. १३
प्रधान, ब. रा. २२
फुले, जो. गो. ११
बर्वे, आ. स. ३८
बाबा पदमजी १२
बापट, गो. श. ३४
भंडारे, ए. ग. १११
भागवत, ना. ह. ४९
भागवत, भा. ह. १७
भागवत, रा. रा. ६५
भागवत, रा. ह. १७
भावे, वि. ल. १३५
भिडे, बा. अ. १५४
भिडे, वि. वा. १०६
मडलिक, वि. ना. १४
महाजनी, वि. मो. ६६

महात्मे, सू स. २२
माडगांवकर, गो. ना. ६
माधवानुज ३७
मोडक, ज. बा. ३७
मोडक, बा. प्र. ४१
मोरमकर, रा. र. ९७
राऊत, स. अ. २५
राजवाडे, कृ. के. ५
राजवाडे, वि. का. ११३
राधारमण, १५५
रानडे, बा. बा. ८१
रानडे, शं. मो. ५५
लेंभे, वि. भ. ५४
लेले, ग. स. ९
लेले, ल. ग. १३२
लोखंडे, ना. मे. ४५
लोंढे, मो. ग. ७९
वॉकर, सी. बें. ४८
विजयकर, मो. का. ४
वैद्य, गो. शि. २९
वैद्य, चिं. वि. १०५
साने, ना का. ६४



# શ્રી સયાજી સાહિત્યમાળા

| છપાએલાં પુસ્તકો. | કિંમત. | |
|---|---|---|
| | કાચી | પાકી. |
| ૧. વિજ્ઞાન-ગુચ્છઃ— | | |
| ૨. ભૂપૃષ્ઠવિચાર ( બીજી આવૃત્તિ ) | | ૦-૧૨-૦ |
| ૧૧. દેહધર્મવિદ્યાનાં તત્ત્વો. | ૦-૧૪-૦ | ૧- ૦-૦ |
| ૧૨. વિજ્ઞાનપ્રવેશિકા. | ૦-૧૦-૦ | ૦-૧૧-૦ |
| ૧૩. જીંદગીનો વીમો. (બીજી આવૃત્તિ) | | ૦-૧૪-૦ |
| ૧૭. ઉદ્ભિજ્જવિદ્યાનું રેખાદર્શન | | ૧- ૦-૦ |
| ૧૮. કરોળીઆ ( સચિત્ર). | ૦-૧૩-૦ | ૦-૧૪-૦ |
| ૨૨. પ્રાણીવિદ્યાનું રેખાદર્શન (સચિત્ર). | ૦-૧૪-૦ | ૧- ૦-૦ |
| ૨૫. મનુષ્યવિદ્યાનાં તત્ત્વો. | ૦-૧૫-૦ | ૧- ૦-૦ |
| ૩૫. જીવવિદ્યા (સચિત્ર) | ૦-૧૪-૦ | ૧- ૦-૦ |
| ૩૮. તુલનાત્મક ભાષાશાસ્ત્ર. | ૧- ૨-૦ | ૧- ૪-૦ |
| ૪૬. રાજનીતિનો સંક્ષિપ્ત ઇતિહાસ. | | ૧- ૪-૦ |
| ૪૭. સમાજશાસ્ત્રપ્રવેશિકા. | | ૦-૧૪-૦ |
| ૪૮. બાળઉછેર. | | ૧- ૮-૦ |
| ૫૦. બાળસ્વભાવ અને બાળઉછેર. | | ૧- ૮-૦ |
| ૫૧. શરીરયંત્રનું રેખાદર્શન (સચિત્ર). | | ૧- ૪-૦ |
| ૬૩. વિદ્યુત (સચિત્ર) | | ૧- ૪-૦ |
| ૬૪. સુપ્રજનશાસ્ત્ર. | | ૦-૧૩-૦ |
| ૬૭. પ્રાણીસૃષ્ટિ ( સચિત્ર ) | | ૧- ૮-૦ |
| ૭૦. રસાયનપ્રવેશિકા ( સચિત્ર ) | | ૧- ૩-૦ |
| ૭૫. વડોદરાનું અર્થશાસ્ત્ર. | | ૦-૧૨-૦ |
| ૮૧. સત્યમીમાંસા. | | ૧- ૧-૦ |
| ૮૪. सनईवादन पाठमाला पु. ३. (मराठी) | | ૧- ૨-૦ |

८५. सदर सदर पु० ४ ( मराठी ) ०-१२-०
८६. अवतार रहस्य ( हिन्दी ) ०-१४-०
८८. सजीव सृष्टीची उत्क्रांति ( मराठी ) ( सचित्र ) २-११-०
९१. यांत्रिक प्रदीप ( प्रथम भाग ) ( मराठी ) (सचित्र) २- ६-०
९२. સહકાર્ય અને રાષ્ટ્રીય જીવન. ૦-૧૩-૦
૯૫. મલ્લવિદ્યા ( સચિત્ર ) ૧- ૦-૦
૯૬. નૃકુળવિદ્યા. ૦-૧૫-૦
૯૭. મનોધર્મવિજ્ઞાનનાં મૂળતત્ત્વો. ૦-૧૧-૦
૯૯. સૃષ્ટિની બાલ્યાવસ્થા (સચિત્ર) ૧- ૨-૦
૧૦૦. આયુર્વેદનો સંક્ષિપ્ત ઇતિહાસ. ૧- ૦-૦
૧૦૨. સામર્થ્યનું વિજ્ઞાન. ૧- ૪-૦
११२. तत्त्वज्ञानातील कूटप्रश्न ( मराठी ) १- ०-०
११४. सुप्रजाजननशास्त्र ( मराठी ) ०-१२-०
૧૧૬. સરોવરના જીવો. ૦-૧૩-૦
૧૧૭. સૂર્ય. ૦-૧૨-૦
૧૨૨. પરિવર્તનવાદ. ૦-૧૦-૦
૧૨૪. નૌકાબળ. ૦-૧૧-૦
૧૨૫. અર્વાચીન આર્ય ભાષાઓની તુલના. ૧- ૩-૦૦
૧૩૦. આપણું પ્રાચીન રાજ્યતન્ત્ર અથવા રાજાપ્રજાના ધર્મો ૧-૪-૦
૧૩૧. ધનવિદ્યા. ૦-૧૧-૦
૧૩૪. સમાજશાસ્ત્રના સિદ્ધાંતો ૦-૧૨-૦
૧૩૬. ગર્ભવિદ્યા ૦-૧૨-૦
૧૪૦. કેટલાક રોગો, ભાગ ૧ લો ०- ८-० ૦-૧૨-૦
૧૪૨. નાણું ૦-૧૨-૦
૧૪૩. મધુમક્ષિકા અને ભ્રમર. ૦-૧૧-૦
૧૪૬. ખેતીના ઉપદ્રવો. ૦-૧૪-૦
૧૪૭. કેટલાક રોગો, ભાગ ૨ જો ૦-૧૩-૦
૧૪૮. બાળ અને ભવિષ્યની માતા ૧-૧-૦
१५५ अर्वाचीन मराठी वाङ्मय. १-१०-०

| | કાચી | પાકી |
|---|---|---|
| **૨. ચરિત્ર-ગુચ્છ:—** | | |
| ૮. પ્રેમાનંદ (સચિત્ર) | ૦–૧૨–૦ | ૧– ૦–૦ |
| ૧૪. દયારામ. | ૦–૧[illegible] | ૦–૧૧–૦ |
| ૨૦. મીરાંબાઇ | ૦–૧૦–૦ | ૦–૧૧–૦ |
| ૩૦. ગિરધર. | ૦–૧૦–૦ | ૦–૧૪–૦ |
| ૩૩. ભાલણ (સચિત્ર). | ૦–૧૫–૦ | ૧– ૦–૦ |
| ૪૦. તુકારામ (સચિત્ર). | | ૧– ૦–૦ |
| ૪૧. महाराजा शिवाजी (मराठी) सचित्र | १– ०–० | ૧– ૬–૦ |
| ૪૫. વિષ્ણુદાસ. | | ૧– ૦–૦ |
| ૪૯. વીર શિવાજી (સચિત્ર). | | ૧– ૦–૦ |
| ૫૩. મણિશંકર કીકાણી (સચિત્ર) | | ૧– ૬–૦ |
| ૬૨. દલપતરામ (બીજી આવૃત્તિ). | | ૧– ૨–૦ |
| ૭૨. સમુદ્રગુપ્ત (સચિત્ર). | | ૦–૩–૧૦ |
| ૭૪. मीरांबाई ( मराठी ) | | ૦–૧૫–૦ |
| ૭૭. ચક્રવર્તી અશોક. | | ૦–૧૪–૦ |
| ૭૮. समुद्रगुप्त (हिन्दी) (सचित्र). | | ૦–૧૨–૦ |
| ૯૮. अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें (मराठी) | | ૧– ૦–૦ |
| ૧૦૪. શેક્સપિયર. | | ૦–૧૧–૦ |
| ૧૦૭. અકબર (સચિત્ર) (બીજી આવૃત્તિ) | | ૦–૧૪–૦ |
| ૧૨૭. पंडित जगन्नाथराय चरित्र आणि संगित गंगालहरी (मराठी) | | ૧–૦–૦ |
| ૧૩૨. પ્રેમાનંદસુત વલ્લભ | | ૧– ૦–૦ |
| ૧૩૯. ચંદ્રગુપ્ત મૌર્ય | | ૦–૧૧–૦ |
| ૧૪૧. નેલ્સનનું જીવનચરિત્ર | | ૧–૦–૦ |
| **૩. ઇતિહાસ ગુચ્છ:—** | | |
| ૧. संस्कृत वाङ्मयाचा इतिहास. (मराठी) | ०– ८–० | २– ८–० |

| | કાચી | પાકી |
|---|---|---|
| ૯. જગતનો વાર્તારૂપ ઇતિહાસ, ભાગ૧લો.(બીજી આવૃત્તિ) | | ૩-૦-૦ |
| ૧૯. બ્રિટિશ રાષ્ટ્રીય સંસ્થાઓ. | ૦-૧૨-૦ | ૦-૧૩-૦ |
| ૨૪. પેલેસ્ટાઇનની સંસ્કૃતિ. | ૦-૧૧-૦ | ૦-૧૨-૦ |
| ૨૬ જગતનો વાર્તારૂપ ઇતિહાસ, ભાગ ૨જો.(બીજી આવૃત્તિ) | | ૩-૦-૦ |
| ૩૧ પાર્લામેન્ટ. | ૧-૨-૦ | ૧-૪-૦ |
| ૩૪ ઇતિહાસનું પ્રભાત. | ૧-૨-૦ | ૧-૪-૦ |
| ૪૩. નવીન જાપાનની ઉત્ક્રાંતિ. | | ૧-૦-૦ |
| ૫૫ ચીનની સંસ્કૃતિ. | | ૧-૦-૦ |
| ૫૬. નેપોલીઅન બોનાપાર્ટ, ભાગ પહેલો | | ૨-૧૦-૦ |
| ૫૭ નેપોલીઅન બોનાપાર્ટ, ભાગ બીજો | | ૨-૧૦-૦ |
| ૫૮ નેપોલીઅન બોનાપાર્ટ. ભાગ ત્રીજો | | ૨-૧૨-૦ |
| ૫૯ નેપોલીઅન બોનાપાર્ટ, ભાગ ચોથો | | ૩-૮-૦ |
| ૬૦ ઉન્નતિવિચાર (પૂર્વાર્ધ). | | ૧-૧૦-૦ |
| ૬૧ પ્રાચીન હિંદુસ્તાનમાં સ્થાનિક સ્વરાજ્ય. | | ૧-૧-૦ |
| ૬૫. हिंदुस्थानचां अर्वाचीन इतिहास (मराठी) रियासत (मध्यविभाग) भा. १ (मराठी) (द्वितीयावृत्ति) | | २-१२-० |
| ६६. सदर भा. २ | | २-१२- |
| ६८. सदर भा. ३ | | २- ४-० |
| ૬૯ હિંદુસ્તાનની સંસ્કૃતિ | | ૧-૧૨-૦ |
| ૮૨ રોમનો ઇતિહાસ | | ૧- ૦-૦ |
| ८३. पार्लमेंट ( मराठी ) | | १- ८-० |
| ९०. मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया ( मराठी ) | | ३- ०-० |
| ૧૦૧ અશોકના શિલાલેખો. | | ૧- ૬-૦ |
| ૧૦૩ હિંદુસ્તાનના લોકો અને પ્રશ્નો. | | ૧- ૦- |
| ૧૦૮ સ્થાનિક સ્વરાજની સંસ્થાઓ. | | ૦- ૯- |

| | કાચી | પાકી |
|---|---|---|
| ૧૦૯ વડોદરા રાજ્યનો ઇતિહાસ. | | ૧-૧૦-૦ |
| ૧૧૧ ઇટાલીનું જીવનપ્રભાત. | | ૧-૧૨-૦ |
| ૧૧૫ ઇંગ્લાંડ અને હિંદુસ્તાન | | ૧-૧૫-૦ |
| ૧૨૧ હિંદુસ્તાનના લોકો. | | ૦-૧૧-૦ |
| १२३. हिंदुस्थानच्या इतिहासांतील गोष्टी ( मराठी ) | | ०-१३-० |
| ૧૨૬. મરાઠી રિયાસત, મધ્ય વિભાગ, ભાગ પહેલો | | ૨- ૧-૦ |
| १२८ चीन देशांतील सुधारणा ( मराठी ) | | १- ४-० |
| १३७. जर्मन साम्राज्याची पुनः स्थापना ( मराठी ) | | २-१८-० |
| १४४. चीनकी संस्कृति ( हिंदी ) | | १-६-० |
| ૧૪૫. ઉત્તરહિંદુસ્તાની સંગીતનો ઇતિહાસ. | | ૦-૧૪-૦ |
| ૧૪૬. હિંદનો ઇતિહાસ | | ૦-૧૧-૦ |
| **૪ વાર્તા-ગુચ્છ:—** | | |
| ૩ અંગ્રેજ બાલજીવન-આપણા લઘુબન્ધુ અંગ્રેજ(બી.આ.) | | ૦-૧૫-૦ |
| ૪ અલકાનો અદ્ભુત પ્રવાસ (સચિત્ર-બીજી આવૃત્તિ) | | ૧- ૪-૦ |
| ૧૬ વીર પુરૂષો. | | ૦-૧૨-૦ |
| ૧૦૫ જાતિસ્વભાવશતક ( પૂર્વાર્ધ ) | | ૦-૧૫-૦ |
| ૧૦૬ જાતિસ્વભાવશતક (ઉત્તરાર્ધ) | | ૦-૧૩-૦ |
| ११३. सुबोधकथामाला (मराठी) | | ०-१५-० |
| **૫ ધર્મ-ગુચ્છ:—** | | |
| ૬. હિંદુસ્તાનના દેવો ( સચિત્ર) | | ૪- ૦-૦ |
| २३. दीघनिकाय भाग १ ला ( मराठी ) | | १- ८-० |
| ૩૨. તુલનાત્મક ધર્મવિચાર | ૦-૧૨-૦ | ૦-૧૩-૦ |
| ૩૬. ધર્મનાં મૂળતત્ત્વો | ૦- ૯-૦ | ૦-૧૦-૦ |
| ૪૨. વિવિધ ધર્મોનું રેખાદર્શન | | ૦-૧૨-૦ |
| ૪૪. ઉત્તર યુરોપની પુરાણકથા | ૦-૧૨-૦ | ૦-૧૪-૦ |
| ६०. तुलनात्मक धर्मविचार ( हिन्दी ) | | १- ०-० |
| ૧૧૮. સિદ્ધાંતદર્શન | | ૧- ૮-૦ |

## ૬ નીતિ-ગુચ્છઃ—

| | | |
|---|---|---|
| ૫ માબાપને બે બોલ ( ત્રીજી આવૃત્તિ ) | | ૦- ૬-૦ |
| ૭ નીતિશાસ્ત્ર | | ૦-૧૪-૦ |
| ૨૭ નીતિવિવેચન ( બીજી આવૃત્તિ ) | ૧-૦-૦ | ૧- ૨ ૦ |
| ૨૯ ફ્રૉબેટનો ઉપદેશ ( બીજી આવૃત્તિ ) | | ૦-૧૫-૦ |
| ૩૭ નૈતિક જીવન તથા નૈતિક ઉત્કર્ષ. | ૦-૧૪-૦ | ૧- ૦-૦ |
| ૭૧ ઉદાસીપંથનાં નીતિવચનો. | | ૦-૧૦-૦ |
| ७६ नीतिविवेचन ( हिन्दी ) | | १- ७-० |

## ૭ શિક્ષણ-ગુચ્છઃ—

| | | |
|---|---|---|
| १० बालोद्यानपद्धतींचे गृहशिक्षण (सचित्र)(मराठी) | ०-९-० | ०-१०-० |
| ૨૮ બાળોદ્યાનપદ્ધતિનું ગૃહશિક્ષણ (સચિત્ર). | ૦-૧૨-૦ | ૦-૧૪-૦ |
| ૫૨ શાળા અને શિક્ષણપદ્ધતિ. | | ૦-૧૫-૦ |
| ૮૯ પ્રાચીન હિંદમાંની કેળવણી. | | ૦-૧૩-૦ |
| ११९ मुक्या मुलांचे गृहशिक्षण ( मराठी ) | | ०-१४-० |
| ૧૩૨ શ્રીમદ્ ભગવદ્ગીતા ( શંકરાનંદી ટીકા સહિત ) પ્રથમ ભાગ. | | ૩-૪-૦ |
| ૧૩૫. રુદ્રી અષ્ટાધ્યાયી. | | ૧-૮-૦ |

## ૮ પ્રકીર્ણ-ગુચ્છઃ—

| | |
|---|---|
| १५ सुधारणा आणि प्रगति (द्वितीयावृत्ति) ( मराठी ) | ३- ०-० |
| २१ शिस्त ( मराठी ) | १- ०-० |
| ३९ हिंदुस्तानचा लष्करी इतिहास व दोस्तराष्ट्रांच्या फौजा ( मराठी ) | २- ८-० |
| ૫૪ સંસ્કૃતિ અને પ્રગતિ. | ૨- ૮-૦ |
| ७३ जबाबदार राज्यपद्धति ( मराठी ) | ०-११-० |

| | | |
|---|---|---|
| ७९ | इंग्रजी शिष्टाचार ( मराठी ) | ०-१४-० |
| ८७ | नागरिकांचीं कर्तव्यें ( मराठी ) | ०-१४-० |
| ८३ | હિન્દુસ્તાનમાં ક્ષયરોગ. | १- ०-० |
| ९४ | बडोद्याचें मराठी साहित्य ( मराठी ) | ०-११-० |
| ११० | લંડનનિવાસીની કેળવણી. | ०- ९-० |
| १२० | कादंबरीची गोष्ट ( मराठी ) | ०-१४-० |
| १२९ | જુવાનોની ચાવી | २- ०-० |
| १३८ | मुंबई इलाख्यांतील जाती ( मराठी ) | २- ०-० |

# શ્રી સયાજી બાળજ્ઞાનમાળા.

| છપાયેલાં પુસ્તકો:— | કિંમત |
|---|---|
| ૧ ગિરનારનું ગૌરવ ( બીજી આવૃત્તિ ) ( સચિત્ર | ૦—૬—૦ |
| ૨ ઋતુના રંગ ( બીજી આવૃત્તિ ). | ૦—૬—૦ |
| ૩ શરીરનો સંચો ( બીજી આવૃત્તિ ) ( સચિત્ર ). | ૦—૬—૦ |
| ૪ મહારાણા પ્રતાપ ( બીજી આવૃત્તિ ) (સચિત્ર). | ૦—૬—૦ |
| ૫ કોયલની કથા ( બીજી આવૃત્તિ ) ( સચિત્ર ) | ૦—૬—૦ |
| ૬ પાટણ–સિદ્ધપુરનો પ્રવાસ ( બીજી આવૃત્તિ ). | ૦—૬—૦ |
| ૭ પાવાગઢ ( બીજી આવૃત્તિ ) | ૦—૬—૦ |
| ૮ ઔરંગઝેબ ( બીજી આવૃત્તિ ) ( સચિત્ર ). | ૦—૬—૦ |
| ૯ મધપુડો ( બીજી આવૃત્તિ ) ( સચિત્ર ). | ૦—૬—૦ |
| ૧૦ રણજીતસિંહ ( બીજી આવૃત્તિ. ). | ૦—૬—૦ |
| ૧૧ સુખી શરીર ( બીજી આવૃત્તિ ). | ૦—૬—૦ |
| ૧૨ શ્રી હર્ષ ( બીજી આવૃત્તિ ). | ૦—૬—૦ |
| ૧૩ સૂર્યકિરણ ( બીજી આવૃત્તિ ) ( સચિત્ર ). | ૦— —૦ |
| ૧૪ વાતાવરણ ( બીજી આવૃત્તિ ). | ૦—૬—૦ |
| ૧૫ ગ્રહણ ( બીજી આવૃત્તિ ) ( સચિત્ર ). | ૦—૬—૦ |
| ૧૬ બાનાપાર્ટ નેપોલીઅન ( બીજી આવૃત્તિ ). | ૦—૬—૦ |
| ૧૭ कोयलकी कथा ( सचित्र ) ( हिन्दी ) | ૦—૮—૦ |
| ૧૮ લોહીની લીલા. | ૦—૬—૦ |
| ૧૯ श्री हर्ष ( हिन्दी ) | ૦—૮—૦ |
| ૨૦ સિકંદરની સ્વારી. | ૦—૬—૦ |
| ૨૧ સુરત | ૦—૬—૦ |
| ૨૨ એશિયાની ઓળખાણ, ભાગ પહેલો. | ૦—૬—૦ |

| | |
|---|---|
| ૨૩ ભૂસ્તરની કથા. | ૦—૬—૦ |
| ૨૪ લૉર્ડ વિલિયમ બેન્ટિન્ક. | ૦—૬—૦ |
| ૨૫ નાના ફડનવીસ. | ૦—૬—૦ |
| ૨૬ ચંદ્ર. | ૦—૬—૦ |
| ૨૭ વડોદરાનો વૈભવ. | ૦—૬—૦ |
| ૨૮ મહાદજી સિંધિયા. | ૦—૬—૦ |
| ૨૯ ઘરધણી. | ૦—૬—૦ |
| ૩૦ ચાંચડ. | ૦—૬—૦ |
| ૩૧ પાચનક્રિયા અને દૂધ. | ૦—૬—૦ |
| ૩૨ એશિયાની ઓળખાણ, ભાગ બીજો. | ૦—૬—૦ |
| ૩૩ અર્ભની કથા. | ૦—૬—૦ |
| ૩૪ બાલ બાબર. | ૦—૬—૦ |
| ૩૫ નાડીતંત્ર. | ૦—૬—૦ |
| ૩૬ બૌદ્ધ ગુફાઓ. | ૦—૬—૦ |
| ૩૭ મહાબળેશ્વર. | ૦—૬—૦ |
| ૩૮ હિંદુસ્તાનનું વહાણવટું. | ૦—૬—૦ |
| ૩૯ જાતિ અને જ્ઞાતિ, ભાગ પહેલો. | ૦—૬—૦ |
| ૪૦ જાતિ અને જ્ઞાતિ, ભાગ બીજો. | ૦—૬—૦ |
| ૪૧ વિલિયમ યુવર્ટ ગ્લૅડસ્ટન. | ૦—૬—૦ |
| ૪૨ શૂરવીર શિવાજી ( સચિત્ર ). | ૦—૬—૦ |
| ૪૩ आरोग्यता ( हिन्दी ). | ૦—૮—૦ |
| ૪૪ દરિયાકાંઠો ( સચિત્ર ). | ૦—૬—૦ |
| ૪૫ બરફ અને પાણી. | ૦—૬—૦ |
| ૪૬ અર્થશાસ્ત્રની ઓળખાણ. | ૦—૬—૦ |
| ૪૭ सभाजी महाराज ( मराठी ) | ૦—૬—૦ |
| ૪૮ महाराणा प्रताप ( मराठी ) | ૦—૬—૨ |
| ૪૯ કોયલાની કથા. | ૦—૬—૦ |

૫૦ જઠરની કથા. ૦—૬—૦
૫૧ ડયુક ઑાફ વેલિંગ્ટન. ૦—૬—૦
૫૨ માકણ અને જૂ. ૦—૬—૦
૫૩ પાણીનાં પરાક્રમ, ભાગ પહેલો. ૦—૬—૦
૫૪ પાણીનાં પરાક્રમ, ભાગ બીજો. ૦—૬—૦
૫૫ રસાયનપ્રવેશ. ૦—૬—૦
૫૬ બાળપૃથ્વી. ૦—૬—૦
૫૭ હવા અને પાણી. ૦—૬—૦
૫૮ કોયલાની ખાણ. ૦—૬—૦
૫૯ ઉત્સર્ગતંત્ર. ૦—૬—૦
૬૦ कोबाचे वर्णन ( मराठी ) ૦—૬—૦
૬૧ રાષ્ટ્રીય કેળવણી. ૦—૬—૦
૬૨ ફેફસાંની કથા. ૦—૬—૦
૬૩ ઇંગ્લાંડનું વહાણવટું. ૦—૬—૦
૬૪ औरंगजेब ( हिन्दी ) ૦—૮—૦
૬૫ કરકસર. ૦—૬—૦
૬૬ ચક્રવર્તી અશોક. ૦—૬—૦
૬૭ बाल्बाबर ( मराठी ) ૦—૬—૦
૬૮ ખડકની કથા. ૦—૬—૦
૬૯ પાણી. ૦—૬—૦
૭૦ ઉષ્મા. ૦—૬—૦
૭૧ विलियम एवर्ट ग्लॅडस्टन ( मराठी ) ૦—૬—૦
૭ संपत्ति व भांडवळ ( मराठी ) ૦—૬—૦
૭૩ કરોળિયાનાં કાવતરાં. ૦—૬—૦
૭૪ આર્યોનું આદિનિવાસસ્થાન. ૦—૬—૦
૭૫ યકૃતની કથા. ૦—૬—૦
૭૬ મંગળ. ૦—૬—૦
૭૭ જીવનરસાયનવિદ્યા. ૦—૬—૦
૭૮ બાલભાગવત ૦—૮—૦